एकमेव विक्रेते
**कुलकर्णी ग्रंथागार**
१८४ शनिवार, पुणें २



प्रकाशन ३१ वें



मुखपृष्ठ चित्रकार
**र. श. मुळगांवकर**



प्रकाशक
**पंडित अनंत कुलकर्णी**
मु. पो. लोहारा (पायगा)
जि. उस्मानाबाद



मुद्रक
**अमरेन्द्र लक्ष्मण गाडगीळ**
अग्रणी मुद्रणालय
आनन्द चेम्बर्स, आंबराई पुणें ४

**पंचेचाळीस** सालच्या ऑगस्ट महिन्यांत महायुद्ध समाप्त झालें. या युद्धाच्या काळात हिंदी स्वातंत्र्याची चळवळ जवळजवळ स्थगितच झालेली होती. कॉंग्रेसचे नामवंत नेते कारागृहांत खितपत पडलेले होते. देशाच्या राजकीय क्षितिजावर दडपशाहीच्या धूसर मेघांचा मलिन थर सांचून राहिलेला होता. युद्ध संपताच थोड्या दिवसांनीं देशामधील स्वातंत्र्याच्या राजकारणांत हालचाल सुरू झाली गांधीजी मुंबईला आले आणि त्यांनी जनाब जीनांशीं तडजोडीचीं बोलणीं सुरू केलीं. तथापि हीं बोलणीं निष्फळ ठरलीं. नंतर लॉर्ड वेव्हेल यांनीं हिंदी स्वातंत्र्याची आपली योजना देशापुढें मांडली. त्या योजनेचा कारागृहांतून सुटलेल्या कॉंग्रेसनेत्यांनीं मोठ्या उत्साहानें सत्कार केला. स्वातंत्र्यवादी जनतेच्या आशेला या योजनेमुळें अपरंपार भरती चढली. पण जनाब जीनांनीं खालून सुरुंग लावून ती योजना उडवून टाकली. पुढें इंग्लंडमधल्या निवडणुका होऊन महायुद्ध जिंकणारे इंग्लंडचे पंतप्रधान चर्चिल आपल्या खुर्चीवरून उडाले आणि त्यांच्या जागीं मजूर पक्षाचे पंतप्रधान ॲटली येऊन बसले. त्यानंतर लौकरच प्रांतिक आणि मध्यवर्ति कायदेमंडळाच्या निवडणुका करण्याबाबत ब्रिटिश सरकारनें फर्मान काढलें या निवडणुका लढवण्याचा कॉंग्रेसनें निर्धार केला. आणि त्या मनःस्थितींत देशातील सर्व कॉंग्रेस कार्यकर्ते मुंबईच्या गोवालिया रणक्षेत्रावर एकत्र जमले. येथपासून या ‘स्वराज्याच्या अरुणोदया’चा आरंभ झालेला आहे. यापुढच्या एक वर्षाच्या काळांत देशामध्यें ज्या ज्या महत्त्वाच्या राजकीय घडामोडी झाल्या. त्यांवर वेळोवेळीं ‘नवयुग’ मध्यें मीं जे जे अभिप्राय व्यक्त केले त्यांपैकीं कांहीं ठळक लेखांचा या लहानशा पुस्तकांत समावेश केलेला आहे. २ सप्टेंबर १९४६ रोजीं पंडित जवाहरलाल नेहरू यांच्या नेतृत्वाखालीं जनतेच्या मध्यंतर सरकारची दिल्ली येथें स्थापना झाली. या ‘स्वराज्याच्या अरुणोदया’चें स्वागत करतांना मी जे उद्गार काढले होते त्याची या ठिकाणीं पुनरावृत्ति करण्याचा मोह आवरत नाहीं. त्या वेळीं मी असें म्हणालों होतों कीं—“ स्वातंत्र्ययुद्धाचा एक मोठा टप्पा आज आपण गांठला

या भावनेनें हिंदी जनतेच्या नेत्रामध्यें कृतार्थतेचे आनंदाश्रु उभे राहतील यात संशय नाहीं. तथापि देशाचें मध्यवर्ति राज्ययंत्र कॉंग्रेसच्या हाती आलें याचा अर्थ देशाला स्वातंत्र्य मिळालें असा मात्र कोणी करूं नये. जनतेचें खरें स्वातंत्र्य अद्यापहि यावयाचें आहे. देशामधल्या दारिद्र्याचा आणि अन्नाचा प्रश्न मिटवण्याचें सामर्थ्य जनतेच्या अंगीं ज्या दिवशीं येईल त्या दिवशी देशाला स्वातंत्र्य मिळालें असें म्हणावयाला हरकत नाहीं. चाळीस कोटी जनतेमध्यें चैतन्य उत्पन्न करणारा तो स्वातंत्र्याचा सूर्य या स्वराज्याच्या अरुणोदयामधून लौकर उदय पावावा हीच आमची उत्कट इच्छा आहे." असा 'स्वराज्याच्या अरुणा'ला आशेचा आणि हर्षाचा अर्घ्य दिलेला या पुस्तकाच्या शेवटच्या लेखांत आढळून येईल. तो 'स्वराज्याचा अरुणोदय' होत असतांना आमच्या अन्तःकरणांत उत्साहाच्या ज्या भावना होत्या आणि कॉंग्रेसनेत्यांच्या भविष्यकालीन कर्तृत्वाकडे आम्ही ज्या आशेनें बघत होतों त्यामधला एक अंशहि या क्षणीं उरलेला नाहीं हें वाचकांना सांगतांना माझें अंतःकरण शतशः विदीर्ण होत आहे. स्वराज्याचा अरुण ज्या वेळीं क्षितिजावर आला त्या वेळीं स्वातंत्र्याचा सूर्य प्रकट होण्याच्या आधीं देशाच्या फाळणीची भयंकर वीज कडकडून डोक्यावर कोसळून पडेल अशी कुणाचाहि अपेक्षा नव्हती. गेल्या वर्षामध्यें या देशांत ज्या कांहीं अनन्वित गोष्टी झाल्या त्याला जगाच्या इतिहासांत तुलना नाहीं जें कधींहि आपल्या ध्यानीमनी वा स्वप्ना नव्हतें तें घडलेलें पाहण्याचें आपल्या नशीबीं आलें हजारों वर्षे उराशी प्राणापेक्षांहि अधिक आत्मीयत्वानें जतन करून ठेवलेलीं जीवनांतील मूल्यें कोसळून चक्काचूर झालीं. स्वराज्य मिळाल्याचा आनंद मानावा का देशाची फाळणी झाल्याबद्दल शोक करावा हेंच कळेनासें झालेलें आहे. मनाच्या अशा व्याकुळ अवस्थेंत असलेल्या वाचकांच्या हातीं हें पुस्तक ठेवतांना आनंदापेक्षां मला विषादच अधिक वाटत आहे. तथापि या स्फुट लेखांमध्यें वेळोवेळीं मी प्रकट केलेले विचार वाचकांपुढें पुन्हां मांडण्याचा धीर मला एकाच गोष्टीमुळें होतो आहे. आणि ती गोष्ट म्हणजे ही की ज्या सोळा मे च्या ब्रिटिश शिष्टमंडळाच्या योजनेच्या खडकावर कॉंग्रेसनेत्यांच्या मुत्सद्दीगिरीचें जहाज आदळून फुटलें

त्या खड्काच्या घातुकतेची सूचना मी त्याच वेळी त्यांना देऊन ठेवलेली होती. ब्रिटिश साम्राज्यशाहीशीं झगडा न करतांना किंवा रक्ताचा एक थेंबहि न गाळतांना देशाचें स्वातंत्र्य मिळवण्याची कॉंग्रेसनेत्याना घाई झालेली होती. सोळा मे च्या योजनेचें देशातील निरनिराळ्या पक्षांनीं आणि आमच्या अनेक व्यवसायबंधूनीं मोठ्या उत्साहानें स्वागत केलें. पण ही योजना म्हणजे स्वातंत्र्याच्या मधाचें बोट तोंडाला लावून पाकिस्तानच्या खड्यांत देशाला ढकलण्याचें ब्रिटिशांचें एक धूर्त कारस्थान आहे असें महाराष्ट्रांत ज्या कांहीं थोड्या मडळींनीं तळमळून सांगितलें त्यापैकी मी एक होतों ही गोष्ट हें लेख वाचणारांच्या सहजच लक्षात येईल. सोळा मे च्या योजनेबाबत कॉंग्रेसनेत्याची वृत्ति अत्यत धरसोडीची होती. त्यानी त्या योजनेचा धड स्वीकारहि केला नाहीं आणि तिला पूर्ण विरोधहि पण केला नाहीं. उलट त्या योजनेंतल्या कांहीं दोषांची जाहीर वाच्यता करून त्यांनीं जनाब जीनांना सावध केलें आणि देशाच्या डोक्यावर पाकिस्तानची कुऱ्हाड पाडून घेतली. हा जुना इतिहास पुन्हा पुन्हा उगाळीत बसण्यांत मला आनद होत नाहीं किंवा कॉंग्रेसनेत्यांपेक्षां मी स्वतः अधिक शहाणा आहे असें भासवण्याची भावनाहि यामध्यें नाहीं. कॉंग्रेसच्या राजकारणाशीं निष्ठेनें आणि कर्तव्य बुद्धीनें जखडलेले सर्वच कॉंग्रेस भक्त कांहीं गाफील नव्हते एवढा बोध जरी हे लेख वाचून वाचकांना झाला तरी पुष्कळच झालें !

—प्रल्हाद केशव अत्रे

## पुन्हां काँग्रेसची सिंह-गर्जना : : : १

**तीन वर्षांनंतर**—हो बरोबर तीन वर्षानंतर गेल्या शुक्रवारी दुपारीं तीन वाजतां गवालिया तलावाच्या विस्तीर्ण आणि ऐतिहासिक रणक्षेत्रावर कॉंग्रेसच्या अखिल भारतीय समितीची बैठक सुरू झाली. या बैठकीचा आरंभ ज्या वातावरणांत झाला त्याच्या स्वरूपाचें आणि वैभवाचें वर्णन काय करावें? पुण्याला कॉंग्रेस वर्किंग कमिटीची बैठक गेल्या पंधरवड्यात सुरू झाल्यापासून पुण्या-मुंबईचें सारें वातावरण कॉंग्रेसच्या जयजयकारांनें गर्जून गेलेलें आहे. तीन वर्षें बंदिवासांत राहिलेल्या जनतेच्या पूज्य पुढाऱ्यांचें आतां आपल्याला पुन्हां दर्शन होणार या कल्पनेनें आणि हर्षानें लोकांना जवळ जवळ वेड लागावयाची पाळी आलेली आहे. राष्ट्राध्यक्ष आझाद आणि पंडित जवाहरलाल नेहरू यांच्यावरील प्रेमाला पुण्यामध्यें तर एवढा महापूर आला की, जणू काय मुळशी पेट्याचें धरण फुटून सारें पुणें शहर जळबंब झालेलें आहे असेंच कोणालाही वाटलें असेल. कॉंग्रेसच्या प्रेमाच्या महापुराचा पुण्यामध्यें उसळलेला हा लोंढा पुढाऱ्यांच्या बरोबर अधिक उसळ्या मारीत आणि गर्जना करीत मुंबईला येऊन पोहोंचला आणि त्यानें मुंबईकर जनतेच्या आधींच प्रक्षुब्ध झालेल्या भावनांचे सारे बधारे आभाळांत भिरकावून दिले! शुक्रवारी सकाळपासून सारें मुंबई शहर अंतर्बाह्य कॉंग्रेसमय होऊन गेलें! डोक्यावर गांधी टोपी, अंगांत जवाहर जाकिट आणि हृदयांत कॉंग्रेसप्रेम धारण करून जो तो गवालिया तलावाच्या मंडपाकडे धांवत सुटला!

**भारतीय** समितीची बैठक तीन वाजतां सुरू होण्याच्या आधीं कित्येक तास सहस्रावधि लोक मंडपाच्या भोंवतीं गराडा घालून होते. आजूबाजूच्या साऱ्या रस्त्यांची रहदारी संपूर्णपणें थांबली होती. रस्त्याच्या दुतर्फा प्रचंड

जनसमुदाय उभा राहिलेला होता. या जनसमुदायांत कोण होते ? हिंदु होते, मुसलमान होते, पार्शी होते, ख्रिस्ती होते, पुरुष होते, स्त्रिया होत्या, तरुणांनीं आणि मुलांनीं तर कहर करून सोडलेला होता ! गवालिया मैदानाच्या आजूबाजूला असलेल्या सान्या उत्तुंग इमारतींच्या सौधभागावर आणि वातायना-मध्यें कॉंग्रेस त्या अथांग सागराचें वैभव पाहण्यास नागरिक स्त्रीपुरुषांचे थवेच्या थवे जमलेले होते ! कॉंग्रेसचे हजारों तिरंगी झेंडे बैठकीच्या मंडपावर, आणि सभोंवार मोठ्या डौलानें फडकत होते. मंडपाकडे जाणाऱ्या रस्त्यावरील घराघरां-मधून फडकणारे शेंकडों छोटे मोठे तिरंगी ध्वज कॉंग्रेस पुढाऱ्यांच्या स्वागता साठीं सिद्ध होते.

**मंडपामध्यें** एकंदर तीस हजार श्रोते बसण्याची सोय केलेली होती. तथापि या संख्येच्या पांच सहा पट प्रचंड जनसमुदाय मंडपात प्रवेश न मिळाल्यामुळें मंडपाबाहेर जेथें जागा मिळेल तेथें उभा किंवा बसलेला होता. या समितीसाठीं सान्या हिंदुस्थानामधून जसे निरनिराळे प्रतिनिधी आले होते, तसेच या अलौकिक बैठकीचें वैभव स्वतःच्या डोळ्यांनीं पाहण्यासाठीं देशाच्या कानाकोपऱ्यामधून सहस्रावधि कॉंग्रेसजन आलेले होते. हिंदुस्थानांतील एकेका जिल्ह्यामधून किंवा शहरामधून दोन-दोनशें, चार-चारशें लोक जमावानें आलेले होते. तथापि त्यापैकीं फारच थोड्यांना, म्हणजे जवळ जवळ शेंकडा पांच सहांनाच प्रवेशपत्रिका मिळूं शकल्या. तथापि त्यामुळें ही मंडळी निराश झाली नाहींत. हप्त्याहप्त्यानें आणि गटागटानें ही मंडळी त्याच त्या प्रवेशपत्रिका वापरून आंत येत असत आणि राष्ट्रनेत्यांना डोळे भरून पहाण्याची उत्कट क्षुधा शांत करीत असत.

**अशा तऱ्हेनें** हिंदी जनतेचें कॉंग्रेसवर केवढें अमर्याद प्रेम आहे याचा प्रचंड पुरावा शुक्रवारीं गवालिया मैदानावर सान्या मुंबईकरांना स्वतःच्या डोळ्यांनी पहावयास मिळाला ! राष्ट्रामध्यें कॉंग्रेस हें एक केवढें अमोघ सामर्थ्य आहे याची मुंबईकरांना त्या वेळीं पुन्हां खात्री पटली ! सारी मुंबईकर जनता ही अनेक वर्षांपासून कॉंग्रेसवर प्रेम करते. कॉंग्रेस हें नांव घेतल्यावर तिचें डोकें हर्षानें

फिरून जातें. साऱ्या मुंबईकरांच्या अंतःकरणावर कॉंग्रेसच्या हुकमतीचा शिक्का-मोर्तब कित्येक वर्षांपासून केलेला आहे. याबद्दल कोणाच्याहि मनांत कधींच संशय नव्हता. गेल्या तीन वर्षांमध्यें कॉंग्रेसनें जो वनवास भोगला आणि कॉंग्रेस-पुढाऱ्यांनीं ज्या नरकयातना सहन केल्या त्यांमुळें कॉंग्रेसवरचें जनतेचें प्रेम कमी होण्याचेऐवजीं सहस्र पटीनें वाढलेलें आहे ! सरकारी दडपशाहीच्या अग्निदिव्यामधून सहीसलामत बाहेर पडल्यामुळें कॉंग्रेसचें तेज किती देदिप्यमान् झालेलें आहे हें भाग्यशाली दृश्य लक्षावधि मुंबईकरांना गेल्या शुक्रवारीं पहावयाला सांपडलें !

**सुप्रसिद्ध** दिग्दर्शक शांताराम यांनीं मंडपाबाहेर उभारलेल्या उत्तुंग महाद्वारामधून सहस्रावधि लोक जेव्हां आंत जात होते त्या वेळीं तें दृश्य स्वर्गस्थ देवांनीं क्षणभर खालीं उतरून पहाण्यासारखें होतें ! मंडपाचा विस्तार आणि शोभा काय वर्णन करावी ? सबंध मैदान म्हणजेच मंडप ! मंडपाच्या एका द्वारांत प्रवेश करून समोर नजर टाकली तर ती मंडपाच्या दुसऱ्या सीमेपर्यंत पोंहोंचणें कांहीं शक्य नव्हतें ! जेथें पहावें तेथें माणसेंच माणसें ! जशी कांहीं अखंड रीघ लागून राहिली होती त्याची ! शेंकडों स्वयंसेवक आणि स्वयंसेविका श्रोत्यांना आपापल्या स्थानापर्यंत व्यवस्थितपणें पोहोंचवीत होती ! श्रोत्यांच्या डोक्यावर सहस्रावधि विजेचे पंखे गरगरत होते, आणि विजेचे दिवे प्रकाशत होते. छे, छे, ती भारतीय समितीची बैठक कसली ? तें कॉंग्रेसचें जणूं कांहीं वार्षिक अधिवेशनच होतें ! एवढा प्रचंड मंडप, एवढे सहस्र श्रोते आणि एवढी विराट बैठक आम्हीं आमच्या आयुष्यांत आतांपर्यंत कधींच पाहिलेली नव्हती. आमचे डोळे निवले, आमचे कान विसावले आणि आमचा अंतरात्मा तृप्त झाला ! धन्य ते श्रोते आणि धन्य ते सभाजन कीं, ज्यांना कॉंग्रेसप्रेमानें पवित्र झालेल्या या तीर्थामध्यें अवगाहन करावयाला मिळालें !

**मंडपांत** शिरून आसनस्थ होतां क्षणींच साऱ्या प्रेक्षकांचें अवधान एकदम व्यासपीठाकडे वळत होतें ! ज्या दैवताची पूजा सारी हिंदी जनता सकाळ संध्याकाळ आपल्या अंतःकरणांमध्यें करते, तीं सारीं दैवतें प्रत्यक्ष डोळ्यांसमोर

मूर्तिमत वावरतांना बघून प्रेक्षकांच्या भावना स्तिमित झाल्यावांचून कशा बरें राहतील ! अहाहा, त्या वेळीं या साऱ्या दैवतांना डोळे भरून किती किती पहावें आणि अतःकरणामध्यें किती किती भरून घ्यावें असेंच सर्वांना झालें ! ती राष्ट्रसभापति मौलाना आझादांची धीरगंभीर आणि सामर्थ्यवान् गौरवर्णाकृति, कुरुक्षेत्रावर विजेप्रमाणें चमकणाऱ्या अर्जुनासारखी व्यासपीठावरून खालीं आणि खालून व्यासपीठावर तळपणारी पंडित जवाहरलालची ती तेजस्वी आणि चपळ मूर्ति, सरहद्दीवरच्या चालत्या बोलत्या डोंगराच्या एकाद्या कड्याप्रमाणें वावरणारे ते धिप्पाड सरहद्द गांधी; अर्धवट झोंपेमधून उठून एकादा सिंह जसा गुहेंतून बाहेर यावा तसा सत्रस्त आणि हिंस्र मुद्रेनें ब्रिटिश नोकरशाहीकडे बघणारे ते वल्लभभाई आणखी दुसरेहि अनेक प्रभावी कॉंग्रेस नेते ! या सर्वांना पुन्हां एकत्र पाहिल्या-वर प्रेक्षकांचीं अंतःकरणें हर्षानें उचंबळल्याखेरीज कशीं राहतील ! या सर्वांच्या प्रतिमाचें चित्रण करतां करता बिचारे स्थिरचित्रक आणि चलच्चित्रक अगदीं थकून गेले !

**तथापि** या बैठकीच्या आरंभीं प्रेक्षकांना जें एक अपूर्व रोमहर्षक चित्र पहावयाला सांपडलें, तसें चित्र या आयुष्यात पुन्हा त्यांना पहावयाला सांपडेल किंवा नाही याची शंका आहे. हें चित्र म्हणजे स्वातंत्र्यवीर सुभाषबाबू बोस यांचे ज्येष्ठ बंधु शरच्चंद्र बोस आणि सरदार वल्लभभाई पटेल यांच्या आलिं-गनाचें ! वाघ वाघाला कसा भेटतो, सिंह सिंहाला कसा भेटतो, वीर वीराला कसा भेटतो, मर्द मर्दाला कसा भेटतो, हें दृश्य त्या वेळीं आमच्या डोळ्यांना पहा-वयाला मिळालें ! शरद् बाबू आधीं एकटेच व्यासपीठावर आले. त्याबरोबर साऱ्या मंडपात ‘ आझाद हिंद की जय ’ च्या प्रचंड गर्जना उठल्या आणि टाळ्यांचा कडकडाट झाला. क्षणार्धात खालून वल्लभभाई वेगानें धांवत आले आणि जवळजवळ शरद्बाबूंच्या अंगावर आपलें अंग फेंकून दिलें. दोघांनीं आपले बाहुपाश एकमेकांच्या भोंवतीं घालून अशी कांहीं घट्ट मिठी मारली—किती वेळ झाला तरी तशाच बेभान स्थितींत दोघेही व्यासपीठावर उभे होते ! मंडपामधील असंख्य प्रेक्षकांच्या अंगावर त्या वेळी रोमांच उभे राहिले. कांहीं काळ सर्व सभाजन आपलें भानच जणू कांहीं विसरून गेले ! बऱ्याच वेळानें

शरद्‌बाबूंनी आपली मान वल्लभभाईंच्या खांद्यावरून उचलली आणि दोघेही उपरण्यांनीं आपल्या गालावरचे अश्रू पुसूं लागले. तें दृश्य बघून साऱ्या प्रेक्षकांचीं अंतःकरणें गहिंवरून गेलीं आणि त्यांच्या नेत्रांतही अश्रू उभे राहिले!

**स्वातंत्र्यवीर** सुभाषचंद्र बोस यांच्या ज्येष्ठ बंधूचें वल्लभभाईंच्या हस्तें कॉंग्रेसनें केलेलें हें हर्षनिर्भर स्वागत हें केवळ शरच्चंद्र बोस या एका व्यक्तीचें स्वागत नव्हतें! सुभाषचंद्र बोस यांच्या ज्या 'आझाद हिंद' विचारसरणीच्या मागें सारा बंगाल आहे, तो क्रांतिकारक बंगाल आज शरद्‌चंद्राच्या रूपानें कॉंग्रेसमध्यें प्रविष्ट होत आहे, त्या बंगालचें हें स्वागत आहे! सुभाषचंद्राच्या शौर्याचें, धैर्याचें आणि त्यागाचें तें दिव्य तेज कारागृहामधून बाहेर पडलेल्या शरद्‌बाबूंच्या या नव्या अवताराचें स्वागत हजारों कॉंग्रेसजनासमोर वल्लभभाईंनीं करून सुभाषचंद्राच्या लोकोत्तर राष्ट्रसेवेचा कॉंग्रेसच्या व्यासपीठावर गौरवच केला असें आम्ही समजतों!

**आणि** राष्ट्रसभापति मौलाना आझाद यांनीं जेव्हां आपल्या अध्यक्षीय आसनावर बसून आपल्या आरंभींच्या भाषणाला सुरुवात केली, तेव्हां एकादा मेघ आभाळांत गडगडावा आणि त्याचा गंभीर प्रतिध्वनि आकाशाच्या साऱ्या कानाकोपऱ्यापर्यंत गडगड करीत जावा तसें सर्वांना वाटलें! मौलाना आझादांच्या आवाजाचें आणि शब्दांचें सामर्थ्य केवढें जबरदस्त आहे त्याची खूण प्रत्येकाच्या अंतःकरणामध्यें त्या वेळीं पटली! एकाद्या तोफेमधून एकामागून एक लाल रसरशीत गोळे जसे आभाळांत फेंकले जातेत, तसे आझादांचे सामर्थ्यवान् उर्दू शब्द प्रेक्षकांच्या अंतःकरणावर जाऊन धडाधड धडकत होते! आझाद बोलूं लागले म्हणजे छातीवर दडपण पडल्यासारखें वाटतें! भावनांना जबरदस्त पीळ पडूं लागतो. वाटतें कीं, राष्ट्राचीं सूत्रें हातीं धरण्याचें आणि सांभाळण्याचें सामर्थ्य खरोखरच या जबरदस्त विभूतीमध्यें आहे!

**मौलाना** आझाद म्हणाले, "तीन वर्षांपूर्वीच्या त्या ऐतिहासिक सभेनंतर आज त्याच शहरांत आणि अगदीं त्याच जागेवर आपण पुन्हां एकत्र जमत आहोंत!" हे शब्द त्यांच्या तोंडून निघतांच सर्व प्रेक्षकांच्या डोळ्यांसमोर

आठ ऑगस्ट १९४२ चा तो क्रांतिकारक दिवस आणि त्या दिवशीं महात्मा गांधींनीं केलेली सिंहगर्जना उभी राहिली ! त्या गोष्टीला आज तीन वर्षें होऊन गेलीं ! आठ ऑगस्टच्या महात्माजींच्या क्रांतिकारक संदेशानें जागें झालेलें सारें हिंदवी राष्ट्र ठेचून हतबल करण्यासाठीं सरकारनें आपल्या जुलुमी दडपशाहीची पराकष्ठा केली ! अन्यायाच्या आणि बेकायदेशीरपणाच्या अग्निकुंडांत सहस्रावधि स्वातंत्र्यवीरांच्या प्राणांचें बलिदान झालें. गेल्या तीन वर्षांत राष्ट्राच्या स्वातंत्र्या-साठी जनतेनें जो विलक्षण त्याग केला त्याला तुलना नाहीं, त्याला मर्यादा नाहीं ! मौलाना आझाद असें म्हणाले कीं, " आगीच्या भट्टीमधून सोनें जसें तावून सुलाखून निघतें तसें सारें हिंदी राष्ट्र हालअपेष्टांच्या भयकर भट्टीमधून आज तावून सुलाखून बाहेर निघालेलें आहे ! तें होरपळलेलें असेल, पण तें मेलें नाहीं ! तें जिवंत आहे, पूर्वीपेक्षां अधिक जिवंत आहे ! '

**आणि** शुक्रवारीं गवालिया तलावाच्या मैदानावर त्या विस्तीर्ण मंडपा-मध्यें आणि मांडवाबाहेरील प्रचंड परिसरामध्यें हेंच सामर्थ्यवान् दृश्य प्रत्येकाला आपल्या डोळ्यांनीं पहावयाला मिळालें. तीन वर्षांच्या नरकयातना सोसूनहि हिंदी राष्ट्र अद्यापि मेलेलें नाहीं. एवढेंच नव्हे तर आपल्या पारतंत्र्याच्या शृंखला तोडून टाकण्याचा त्याचा वज्रनिर्धार पूर्वीपेक्षांही जास्त कठोर झालेला आहे ! तीन वर्षांपूर्वी महात्मा गांधीं यांनीं ' करेंगे या मरेंगे' हा जो क्रांतिकारक संदेश राष्ट्राला दिलेला होता तो संदेश राष्ट्राच्या अंतःकरणामध्यें अद्यापिही सळसळत आहे. याचा निर्वाळा त्या दिवशीं कॉंग्रेसच्या झेंड्याखाली आणि मंडपामध्यें जमा झालेल्या त्या प्रचंड जनसमुदायानें निःसंशय दिला यांत शंका नाहीं. देशाच्या स्वातंत्र्यासाठीं आपल्या सर्वस्वाची आहुति करण्यास राष्ट्र अद्यापिही सिद्ध आहे ! गेल्या तीन वर्षांत स्वातंत्र्ययुद्धाचं नेतृत्व ज्या महान् नेत्यांकडे होतें त्यांच्यावर जनतेचें निस्सीम प्रेम आहे आणि त्यांच्या मागून बेधडक जाण्यास राष्ट्र तयार आहे, हें त्या दिवशीं सर्वांना पटल्यावांचून राहिलें नाही. देशाचें स्वातंत्र्ययुद्ध अद्यापि संपलेलें नाहीं. लौकरच तें सुरू होणार आहे. कदाचित् हें स्वातंत्र्ययुद्ध शेवटचें देखील ठरण्याचा संभव आहे. म्हणून हें युद्ध यशस्वी करण्यासाठीं लागणारें नवें सामर्थ्यवान् आणि क्रांतिकारक नेतृत्व कॉंग्रेसची ही अखिल भार-

तीय समिति या प्रसंगीं राष्ट्राला दिल्यावांचून राहणार नाहीं, असा आम्हांला विश्वास आहे.

## करूं नाहीं तर मरूं !

**हिंदी** स्वातंत्र्याच्या इतिहासांत ऑगस्ट १९४२ रोजीं भरलेलें कॉंग्रेसचें अखिल भारतीय समितीचें अधिवेशन जेवढें क्रांतिकारक ठरेल तेवढेंच २१ सप्टेंबर १९४५ रोजी भरलेलें तिचें अधिवेशनहि क्रांतिदर्शक झाल्या-वांचून राहणार नाहीं. तीन वर्षांपूर्वीच्या त्या अधिवेशनाचें वातावरण या अधिवेशनापेक्षां अगदीं निराळें होतें. त्या वेळीं महायुद्धाच्या भेसूर ज्वालांनीं सारें जग धूसर झालेलें होतें. कोण जिंकणार आणि कोण हरणार,या संशयानें सारी मानवजात भयाकुल होऊन गेलेली होती. शत्रुराष्ट्राच्या जबरदस्त आघातांनीं ब्रिटिश साम्राज्यशाहीचे डोळे जवळ जवळ पांढरे पडण्याची पाळी आली होती. तशाहि परिस्थितींत चाळीस कोटी जनतेच्या छातीवर पाय ठेवून साम्राज्यलोभी ब्रिटन स्वतःला वांचविण्याची केविलवाणी धडपड करीत होतें. स्वातंत्र्यप्रेमी हिंदी राष्ट्र ब्रिटिश सरकारवर त्या वेळीं अगदीं चिडून गेलें होतें! चालते होता कीं नाहीं या देशांतून!' असें ब्रिटिशांना खडसावून बजावण्यापर्यंत देशांतील जनतेच्या संतापाचा पारा वर चढलेला होता!' 'कांहीं तरी करू, नाहींतर एकदाचे मरू तरी' अशा त्वेषानें आणि आवेषानें जनतेची डोकीं त्या वेळीं अगदीं भडकून गेलेलीं होतीं! खरोखरच त्या वेळच्या भारतीय समितीच्या अधिवेशनाचें वातावरण गभीर होतें, धूसर होतें आणि भेसूर होतें! ब्रिटिश सत्तेवर आतां निकराचा आघात केल्यावांचून देशाला दुसरा मार्गच नाहीं असा क्रांतिकारक निर्णय घेण्यासाठीं राष्ट्राचे पुढारी त्या वेळीं गवालिया मैदानावर जमलेले होते.

## वनवास संपल्यानंतर

**पण** या वेळच्या अधिवेशनाचें वातावरण अगदींच निराळें होतें! तीन वर्षांपूर्वीं ऐन कळसाला पोंहोंचलेला महायुद्धाचा वणवा आतां विझून गेलेला

होता. त्यामुळें समाधानाचा आणि शांततेचा थोडासा तरी निःश्वास टाकायला मानवजातीला अवसर मिळालेला होता. तीन वर्षे तुरुंगांत खितपत पडलेले जनतेचे आवडते नेते बंदिवासांतून बाहेर आलेले होते, आणि सरकारनें आपली पूर्वीची मगरुरी आणि उद्दामपणा क्षणभर बाजूला ठेवून त्यांच्याशीं सामोप चाराची आणि तडजोडीची भाषा करण्याचा अयशस्वी कां होईना, पण प्रयत्न तरी केलेला होता. इंग्लंडमधील पार्लमेंटच्या निवडणुका होऊन गेलेल्या होत्या. आणि ब्रिटिश साम्राज्यशाही संरक्षणासाठीं प्रधानपदावर आरूढ झालेल्या चर्चिल साहेबाच्या टोरीपक्षाला ब्रिटिश मतदारांनी आपल्या शिंगावर घेऊन धुळींत फेंकून दिलेलें होतें. आणि त्यांच्या जागीं हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याशीं आतापर्यंत निदान शाब्दिक सहानुभूति दाखविणाऱ्या मजूरपक्षाला प्रस्थापित केलें होतें. अर्थात् नव्या मजूर पक्षाकडून हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचा प्रश्न सुटेल अशी आपली फसवणूक हिंदी जनतेनें कधीच करून घेतली नसली तरी देखील हिंदी स्वातंत्र्याच्या प्रश्नावर शाब्दिक घोषणा करावयाला मजूर सरकारनें प्रारंभ केल्यापासून देशांतील सर्वसामान्य निराशेचे काळेकुट्ट ढग हळूहळू वितळू लागलेले होते! त्यांत कायदेमंडळाच्या निवडणुकांचा पुकार झाल्यापासून देशांतील राजकीय निष्क्रियतेमध्यें एक नवीनच हालचाल सुरू झालेली होती. सरकारी दडपशाहीचे निर्बंध भराभर सैल होऊं लागले होते. बेचाळीसच्या बंडांतले शेंकडों बंदिवान सैनिक कारागृहांतून बाहेर पडूं लागलेले होते आणि तीन वर्षें वनवासांत गेलेली कॉंग्रेस पुन्हां आपल्या सिंहासनावर येऊन प्रतिष्ठित झालेली होती. हिंदी स्वातंत्र्याची नवीन योजना आणण्यासाठीं व्हॉइसराय वेव्हेल इंग्लंडला गेलेले होते; आणि या अधिवेशनाच्या आधीं दोनच दिवस अगोदर ती घोषणा ते जाहीर करणार असल्याचें प्रसिद्ध झालें होते.

## हिंदी राष्ट्राचा विजय

**त्यामुळें** या अधिवेशनाच्या आधींपासून देशामध्यें एक प्रकारचें नवीन आशेचें, हर्षाचें, उत्साहाचें आणि चैतन्याचें वातावरण पसरूं लागलें होतें. जर्मनांचा पराभव होऊन आणि जपान जमिनदोस्त होऊन देखील देशाचें स्वातंत्र्य

पूर्वीइतकेंच दूर आहे हें कळून आल्यानें हिंदी जनता ब्रिटिश सरकारविरुद्ध पूर्वीपेक्षां या वेळीं अधिक चिडून गेली होती हें खरें. तथापि जर्मनी, जपानसारख्या बलाढ्य, शस्त्रसंपन्न राष्ट्रांना नेस्तनाबूद करणारें इंग्रज सरकार तीन वर्षें कॉंग्रेसशीं निकरानें लढूनही तिच्या स्वातंत्र्य–सैनिकांना जिंकू शकलें नाही किंवा पराभूत करूं शकलें नाही, या जाणिवेनें जनतेमध्यें एक जबरदस्त आत्मविश्वास निर्माण झालेला होता. ‘ चले जाव ’ म्हणून ब्रिटिशाना बेडरपणें सांगणारे जनतेचे शौर्यसागर नेते कारागृहांमधून जिवत बाहेर येतील आणि पुन्हां आपल्या दृष्टीस पडतील, असें कोणाला खरें वाटलें होतें ? ‘ दांती तृण धरून शरण या ’ तरच सुटाल, नाहीं तर तुरुंगांत झिजून कुजून मराल ’ असेंच तीन वर्षे सरकार त्यांना दांतओंठ खाऊन सागत नव्हतें का ? आधीं साम्राज्यसरकारची माफी मॉंगा, मग देशाच्या राजकारणाच्या गोष्टी पुढें बोलूं, अशा एकसारख्या धमकावण्या तीन वर्षे सरकार या नरशार्दुलांना देत नव्हते का ? तथापि जनतेच्या आणि सरकारच्या या युद्धांत शेवटीं सरकारच जनतेला शरण गेलें आणि जर्मनी, जपानवर विजय मिळविणाऱ्या बलाढ्य सरकारचा अहिंसावादी कॉंग्रेसनें पराजय केला ! देशाचें राजकीय किंवा आर्थिक स्वातंत्र्य अद्यापि दूर असलें तरी या तीन वर्षाच्या युद्धानतर जनतेचे नेते पुन्हां बधमुक्त होणें आणि जनतेला फिरून भेटण्याचें आणि तिच्याशीं मोकळेपणानें बोलण्याचें स्वातंत्र्य त्यांना मिळणें हा हिंदी राष्ट्राचा एक अपूर्व विजयच आहे असें म्हणावयाला नको काय ! या विजयाच्या हर्षपूर्ण वातावरणांत हें अधिवेशन भरत असल्यामुळें जनतेच्या आनंदाला आणि उत्साहाला सीमाच राहिली नाहीं !

## आमचा ‘ व्हि–वी ’ दिन

“ **आम्हांला** ठार मारण्याचा आम्हांला चिरडून टाकण्याचा, आम्हांला नेस्तनाबूद करण्याचा तीन वर्षे तुम्हीं प्रयत्न केलात ! पण आम्ही मेलों नाहीं ! आम्ही हरलों नाहीं ! आम्ही डरलों नाहीं ! आम्हीं जिवंत आहोंत ! ठणठणीत जिवंत आहोंत ! एवढेंच नव्हे तर फिरून तुमच्याशीं जोरानें लढायला दंड थोपटून आम्हीं तयारच आहोंत ! ” हें ब्रिटिश सरकारला छाती ठोकपणें

गर्जून सांगण्याकरिता कॉंग्रेसची भारतीय समिती गोवालिया मैदानाच्या रण-क्षेत्रावर उभी राहिली ती जाणीव प्रारंभापासून जनतेला होती. म्हणूनच या अधिवेशनाला एवढें विराट स्वरूप प्राप्त झालें. युरोपच्या युद्धात विजय मिळाल्यामुळें जसा दोस्तांनीं ' व्ही. ई. ' दिन साजरा केला, किंवा जपानच्या युद्धांत यश मिळाल्यामुळें जसा त्यानीं ' व्ही. जे. ' दिन पाळला, तसा हिंदी स्वातंत्र्य युद्धामधल्या पहिल्या त्रैवार्षिक लढाईत कॉंग्रेसला ब्रिटिश सरकारवर अपूर्व जय मिळाला, म्हणून ' व्ही. बी ' दिनाचा विजयोत्सव करण्यासाठींच जणू काय हिंदी राष्ट्राचे सर्व नेते आणि प्रातीनिधि त्या ठिकाणीं एवढ्या उत्साहानें जमलेले होते, अशीही कल्पना कोणाच्या डोक्यांत आल्यावाचून राहिली नाही.

## ब्रह्मानंदी लागतां टाळी

**तीन** दिवसपर्यंत गवालिया मैदानावर आनंदाचा आणि हर्षाचा एक प्रचंड राष्ट्रीय उरूसच भरला होता ! तीस हजार प्रनिनिधी मंडपामध्यें बसलेले होते, तर दोन लक्ष लोक मंडपाबाहेर पावसामध्यें, चिखलामध्यें, झाडांवर, भिंतीवर जेथें जेथें जागा सांपडेल तेथें तेथें मंत्रमुग्ध होऊन बसलेले होते. वास्तविक सप्टेंबर महिन्याच्या तिसऱ्या आठवड्यांत मुंबईमध्यें एवढी प्रचंड पर्जन्यवृष्टि होण्याचें कांहींच कारण नव्हतें. तथापि या तीन दिवसांत पावसालाही असा कांहीं जोर चढला होता कीं, विचारूच नका ! वरतून एकसारखा धो धो पाऊस पडतो आहे आणि खाली इकडे नेत्याच्या मुखामधून स्वातंत्र्याची रसवंती गंगेच्या प्रवाहाप्रमाणें एकसारखी घों घों वाहाते आहे ! आणि लक्षावधि लोक या गंगेच्या महापुरात बेभान होऊन डुबत आहेत, पोहत आहेत, अवगाहन करीत आहेत ! कोणाला कशाचीच शुद्ध नव्हती ! पावसानें कपडे ओले चिंब झालेले असोत, गुडघ्या गुडघ्यापर्यंत पाय चिखलानें भरलेले असोत, आठ आठ तास एका जागी दाटीवाटीनें बसल्यामुळें किंवा उभें राहिल्यामुळें पायाचे आणि पाठीचे अगदीं तुकडे पडण्यापर्यंत पाळी आलेली असो, अथवा ध्वनियंत्रें बिघडल्यामुळें व्यासपीठावरील वक्तृत्व कधींमधीं धडपणें ऐकूं येवो वा न येवो ! त्याचें यत्किंचित् देखील कोणाला भान नव्हतें ! कोणाची कशाबद्दल तक्रार

नव्हती ! कोणी हू का चूं देखील करीत नव्हतें ! तहान आणि भूक याची आठवण देखील तीन दिवस लोक विसरून गेले होते ! प्रत्येकाच्या डोक्यांत 'स्वातंत्र्य—स्वातंत्र्य' हाच एक निनाद घुमत होता ! स्वातंत्र्याच्या ब्रह्मानंदांत ज्याची त्याची टाळी लागून राहिलेली होती ! अशा वेळीं कोण आपल्या देहाला अन् कपड्याला संभाळतो आणि कोण आपल्या छत्र्यांची अन् जोड्याची काळजी घेतो ?

## ही कॉंग्रेसची शिस्त !

**एवढी** अमर्याद गर्दी, एवढा असंख्य समुदाय, एवढी प्रचंड सभा आम्ही आमच्या आयुष्यांत पूर्वी कधीहि पाहिली नव्हती. राष्ट्रीय सभेच्या वार्षिक अधिवेशनाशींच या बैठकीची तुलना करतां येईल असे सांगणारे सांगतात. आणि कॉंग्रेसच्या भारतीय समितीची अशी सार्वजनिक बैठक पुन्हां भरणार नसल्याचें राष्ट्रपतींनीं जाहीर केलें असल्यामुळें आता हें अधिवेशन म्हणजे 'न भूतो न भविष्यति' अशाच स्वरूपाचें झालें असें म्हणावयास हरकत नाहीं. बैठक सुरू होण्यापूर्वी कित्येक तास आधींपासून लोकांच्या झुंडीच्या झुंडी गवालिया मैदानाकडे जाऊं लागत. जवळ जवळ पाव मैलाच्या परिघापासून आंत मंडपापर्यंत माणसांचे थवेच्या थवे एकसारखे उभे असत. त्यामुळें मोटारवाल्यांची तर अशी त्रेधा उडत असे कीं, कांहीं विचारूं नका. त्यांना मोटारी कुठें आणि कशा उभ्या कराव्यात आणि पुढें कसें जावें हेंच कळत नसे. पायीं जाणाऱ्या प्रतिनिधींना तर आपण एवढी प्रचंड गर्दी ओलांडून मंडपापर्यंत सहीसलामत कसें पोंहोचू शकू याची दुरूनच शंका वाटत असे. पण एवढें असूनही या तीन दिवसांत कोठें गडबड नाहीं, आरडाओरड नाहीं, धक्का बुक्की नाहीं, दंगामस्ती नाही कीं कांहीं नाहीं. प्रत्येकजण शिस्तींत वागत होता, शिस्तीनें चालत होता, शिस्तीनें हलत होता, दुसऱ्याला शांतपणें वाट करून देत होता आणि आपापल्या जागेवर व्यवस्थितपणें जाऊन बसत होता किंवा उभा राहात होता ! कॉंग्रेसच्या झेंड्याखालीं जमा होणाऱ्या जनसमुदायांत अहिंसात्मक

सामर्थ्याची केवढी जबरदस्त शिस्त निर्माण झालेली आहे हें त्या तीन दिवसांत प्रत्येकाला डोळ्यांनीं पहावयाला मिळालें !

## स्वतःच्या गळ्यांत तंगड्या

**जी** शिस्त मंडपाबाहेरच्या अफाट जनसमुदायांत दिसून येत होती, तिच शिस्त मंडपामधल्या आसनस्थ सभाजनांमध्येंही आढळून येत होती. तीस हजार सभासदांच्या बसण्याची समाधानकारक व्यवस्था करणें ही कांहीं सामान्य गोष्ट नव्हती. अधिवेशनाच्या व्यवस्थापकानीं या कामीं आटोआट श्रम आणि काळजी घेतली होती, त्याबद्दल कांहीं प्रश्नच नव्हता. तथापि तक्रार करण्या-सारखीं पुष्कळच स्थळें तेथें होती. पुष्कळ ठिकाणीं छतांमधून डोक्यावर पाणी गळत होतें, त्यामुळें खुर्च्या आणि कोंच भिजून चिंब झालेलीं असत. तथापि सभाजनांनीं त्याची मुळींच पर्वा केली नाहीं. सद्यावर आणि कोटावर नाना तऱ्हेचे रंग लागत होते, धोतराचे आणि विजारींचे पार्श्वभाग तर बघण्यासारखे किंवा न बघण्यासारखेच झालेले होते; पण त्याची कोणी लाज बाळगली नाहीं. जेथें पाय ठेवावा, तेथें वीत वीत चिखल झालेला होता. जोडे, बूट, वहाणा यांच्यासकट सर्वांचे पाय चिखलानें अगदीं लडबडून गेले होते. सभा सुरू झाल्यानंतर आपली जागा सोडून बाहेर येणें किंवा बाहेरून येऊन आपल्या जागेपर्यंत पोंहचणें हें तर जवळ जवळ अशक्यच होतें. कारण, सर्वच आसनें इतक्या दाटीवाटीनें मांडलेली होतीं की, एकदां माणसें आपापल्या जागेवर बसलीं म्हणजे इकडून तिकडे जाणाऱ्या येणाऱ्यांचा मार्ग अजीबात बंद होत असे. तथापि, तशाहि परिस्थितींत कोणी सभासद नाइलाजानें आपल्या अगा-वरून जाऊं लागला म्हणजे त्याला वाट देण्यासाठीं स्वतःच्या तंगड्या जवळ-जवळ स्वतःच्याच गळ्यांत अडकवून घेण्याचा जो अवघड व्यायाम दर दहा दहा किंवा पंधरा पंधरा मिनिटांनीं पुष्कळांना करावा लागत असे त्याबद्दल कोणीहि शब्दांनीं किंवा मूकाभिनयानें तक्रार व्यक्त केली नाहीं.

## चहाच्या सुट्टींत

**वरच्या** वर्गाच्या सभासदांना फक्त पहिल्या दिवशींच काय तें आपापल्या तिकिटाच्या नंबराप्रमाणे, आसनावर बसावयाला मिळालें, पण त्यानतर तो धरबद कांही राहिला नाहीं. ज्याला जी खुर्ची मिळेल तेथें त्याला बसतां येई. त्यामुळें आधीं येणाऱ्याची उत्तम सोय होई. आणि उशीरां येणाऱ्यांना मात्र लांब बसावें लागे. पांच साडेपांचच्या सुमारास चहासाठीं अर्धा तास सुट्टी देण्यांत येत असे. अर्थात् चहाची व्यवस्था व्यासपीठावरील नेत्यांसाठीं किंवा कार्यकर्त्यांसाठी विशेषेकरून असल्यामुळें केवळ त्यांच्या दृष्टीनेंच ती चहाची सुट्टी होती. बाकीच्या सभाजनांना ती केवळ ' बाहेर ' जाण्याचीच सुट्टी असे; पण बाहेर गेलें तर आपली चागली सोयीस्कर जागा गमाविण्याचें भय असल्यामुळें पुष्कळ लोक गंभीर चेहरे करून तसेंच धैर्यानें आपल्या जागेवर मुक्काम करून बसत आणि आपली जागा सांभाळीत.

## वैतरणी ओलांडतांना

**सर्व** मंडपांत जागोजाग शेंकडों पखे लावलेले होते. तरी पहिल्या दिवशीं उकाडा विलक्षण असल्यानें त्या पंख्याचा फारसा उपयोग न होतां सर्वांच्या अंगांतून घामाच्या धारा वाहूं लागल्या आणि तोंडाला वारंवार कोरड पडूं लागली सभाजनांना पाणी मिळण्याची सोय व्यवस्थापकांनीं केलेली होती. तथापि, मुख्य मार्गाच्या कडेला जे लोक बसलेले होते त्यांनाच विनासायास पाणी मिळू शकलें. दूरवर जो श्रोतावृंद पसरलेला होता त्याला पाणी पुरविणें स्वयंसेवकाना शक्यच नव्हतें तथापि दुसऱ्या दिवसापासून ही गैरसोय पावसानें दूर करून टाकली आणि मंडपातलें सारें वातावरण त्यानें एकदम गारेगार करून टाकलें रात्रों आठ साडेआठच्या सुमारास सभा सपल्यानंतर मडपाबाहेर पडणें हें एक भयंकर दिव्यच होतें. जवळ जवळ अर्धा तास पाऊण तास पर्यंत सभाजनांना रांगेमध्यें उभें राहून मुगीच्या पावलानें सरकत सरकत बाहेर यावें लागे. मंडपाबाहेर पडावें तों असा मुसळधार पाऊस लागलेला असे कीं, विचारता

सोय नाहीं. आणि त्यात बाहेर चिखलाची चांगली डांबरी रबडी झालेली ! एक पाय टाकला कीं, तो जवळ जवळ चिखलांत रुतूनच बसे. तो कसाबसा बाहेर उपसून दुसरा पाय टाकावा तर तो पहिल्या पेक्षांहि अधिक खोल जाई ! तीन दिवसांतून किती जोड वहाणा, आणि बूट त्या 'वैतरणी' मध्यें बेपत्ता झाले असतील तें कांहीं सांगता येत नाहीं. पण या साऱ्या हालअपेष्टांची कोणालाही शुद्ध नव्हती ! स्वातंत्र्याच्या विचारानें जो तो धुंद झालेला होता ! कोठल्या तरी दिव्य आणि अद्भुत स्वप्नसृष्टींत आपण वावरत आहोंत असेंच ज्याला त्याला वाटत होतें.

## तारा कोणी कापल्या ?

**शुक्रवारीं** ध्वनियंत्राच्या अपघातामुळें समितीचें कांहींच कार्य होऊ शकलें नाहीं. म्हणून एवढा मोठा श्रोतृवृंद व्यवस्थापकांवर चिडून गेला म्हणतां कीं काय ? छे छे, मुळींच नाहीं ! बाहेर त्याबद्दल इतर लोकांनीं काय वाटेल त्या बातम्या पसरविल्या असोत ! म्हणे, श्रोत्यांची त्या दिवशी अत्यंत निराशा झाली, त्यांना फार वाईट वाटलें, सभेच्या कामाचा सत्यानाश झाला ! खरें सांगायचें म्हणजे तसें त्या दिवशी कांहीं एक झालेलें नाही. श्रोत्यांची धिम्मी आणि प्रशांत वृत्ति अगदीं होती तशी कायम असल्यामुळें वक्त्याचें भाषण ज्या विभागांत ऐकूं येत नसे, त्या विभागातले श्रोते आपापले हात करून 'ऐकू येत नाहीं' असें ओरडून सागत असत. पण तें प्रकरण तेवढ्यावरच थांबत असे. राष्ट्रपतीचें प्रास्ताविक भाषण कुठें ऐन रंगांत येत होतें, त्याच्या उर्दू भाषेचा विलास कुठ भराला येऊं लागला होता, तोंच ध्वनियंत्रानें दगा दिला ! पं. जवाहरलालच्या भाषणाच्या प्रारंभीं पुन्हां त्याच गोष्टीची पुनरावृत्ति झाली ! तथापि श्रोत्यांपेक्षां राष्ट्रपति आणि पंडितजी यांचीच अत्यंत निराशा झालेली दिसली. पण त्याला कांहीं इलाज नव्हता. ध्वनियंत्राच्या चार ठिकाणीं तारा तोडलेल्या पंडितजींनीं स्वतः आपल्या डोळ्यांनीं पाहिल्या ! हा कांहीं केवळ अपघात म्हणतां यावयाचा नाहीं. ही कोणा तरी पंचमदळी लोकांची हरामखोरी होती हें उघड उघड आहे ! राष्ट्रद्रोही लालूभाईचा याच्यामध्यें खात्रीनें हात

असला पाहिजे अशीच ज्यानें त्यानें आपआपल्या मनामध्यें खूण गांठ बांधली ! पण उघडपणें तसें कोणीच कोणाला बोलून दाखविलें नाहीं. सहा वाजावयाच्या सुमारास राष्ट्रपतींनीं सभा बरखास्त झाली असें जाहीर करतांच हजारों सभासद् शांतपणें आपापल्या जागेवरून उठले आणि प्रसन्न वृत्तीनें मंडपामधून चालू लागले.

## पाक मुसलमान कोण ?

**पहिल्या** दिवशी सभेचें काम झालें नाहीं म्हणून काय झालें ? राष्ट्राचे सारे परमपूज्य कर्णधार आणि कार्यकर्ते तर डोळे भरून सर्वांना पहावयाला मिळाले ! मग आणखी काय पाहिजे ? मौलाना अबुल कलम आझाद् हे खरोखरच राष्ट्रसभापति होण्यास सर्वस्वीं लायक आहेत, याबद्दल त्या दिवशीं प्रत्येकाची खात्री पटली. त्यांचें व्यक्तिमत्व अत्यत आकर्षक आणि प्रभावी आहे. त्यांचा आरक्त गौरवर्ण आणि मोहक चेहरा, त्यांच्या शरीराचा सडपातळ, पीळदार आणि ऐटबाज बांधा त्यांच्या बोलण्याचालण्यातला सरदारी रुबाब आणि खानदानी कुर्रा आणि त्यांचें विलक्षण भाषाप्रभुत्व आणि जबरदस्त वक्तृत्व यामुळें हा माणूस लक्षावधि लोकांवर हुकमत चालविण्यासाठींच जन्माला आला असावा असें वाटतें. दोन तीनशें वर्षांपूर्वी जर मौलाना आझाद् जन्माला आले असते तर ते कोठल्या तरी मुलुखाचे किंवा रियासतीचे बादशहा किंवा वझीरच झाले असते, याविषयीं आम्हांला तिळमात्र सशय नाहीं. पाक मुसलमान कसा असावा असें आम्हांला कोणीं विचारलं तर आम्ही एकदम आझादांचें नांव घेऊ ! नाही तर तो पण जाऊं द्या ! अशा चांगल्या गोष्टी बोलतांना कशाला त्याचें नाव घ्या !

## अबुल कलम म्हणजे काय ?

**राष्ट्रपति** मौलाना आझाद् यांच्या बुद्धिमत्तेबद्दल आणि कर्तृत्वाबद्दल सर्वसामान्य जनतेमध्यें एवढें अज्ञान पसरलेलें असावें या विचारानें मात्र आम्हांला त्या दिवशी अत्यंत वाईट वाटलें. सिमला परिषदेपासून मात्र एकाद्या

माणसाचा शोध लागावा, तशा दृष्टीनें सारें राष्ट्र आतां त्यांच्याकडे आदरभावानें पाहूं लागलेलें आहे. आझाद यांना इंग्रजी येत नाही, कॉंग्रेसनें बनविलेला एक 'गुळाचा गणपति' आहे, असा धादांत खोटा प्रचार मुस्लिम लीगनें त्यांच्याविरुद्ध आतांपर्यंत करून त्यांजविषयीं जनमत कलुषित करून ठेविलेलें होतें. 'अबुल कलम आझाद' या नांवापैकीं 'आझाद' हें लेखनासाठीं त्यांनीं धारण केलेलें टोपण नांव असून 'अबुल कलम', म्हणजे 'भाषाप्रभु' ही त्यांना वयाच्या सतराव्या वर्षी मिळालेली एक पदवी आहे, हें किती जणांना माहीत आहे बरें ? गेल्या महायुद्धाच्या काळात सरकारनें त्यांना विनाचौकशी अटकेंत ठेवलेलें होतें यावरून त्यांचा स्वातन्त्र्यवाद तीस वर्षांपूर्वी देखील किती जळजळीत होता हें कोणालाही कळून येण्यासारखें आहे. वर्किंग कमिटीच्या एका सदस्याला आम्हीं विचारलें कीं, 'काय हो कॉंग्रेसमध्यें आज सर्वांत श्रेष्ठ वक्ता कोण आहे ?' त्याबरोबर, त्यानें एका क्षणाचाहि विलंब न करतां 'आझाद !' यांचेंच नांव उच्चारलें ! आझाद यांना इंग्रजी भाषा येत असूनहि डी व्हॅलेराप्रमाणें केवळ स्वाभिमानामुळें ते इंग्रजीमध्यें बोलूं इच्छित नाहींत, हें या तीन दिवसांच्या अधिवेशनांत पुष्कळ वेळां प्रत्ययाला आलें. कांहीं कांहीं वक्ते त्यांच्याशीं इंग्रजींत बोलत असूनहि ते त्याला उर्दूमधून उत्तरें देत असत. मधून मधून एखाद दुसरें वाक्य ते इंग्रजीमधून बोलत, पण लागलींच ते आपली चूक दुरुस्त करीत ! एकदा मात्र 'Those who are in favour of this amendment should raise up their hands !' असें सफाईदार इंग्रजीमधून ते झटकन् बोलून गेले तेव्हां साऱ्या सभागृहांतून कौतुकयुक्त स्मिताची एक मंद लकेर उठली !

## कारवाई शुरू होगी !

**मौलाना** आझाद व्यासपीठावर ज्या तऱ्हेनें वावरत होते आणि बोलत होते, त्यामुळें साऱ्या सभागृहामध्यें एकदमच त्याचा दरारा आणि दबदबा प्रस्थापित झाला. त्यांचा आवाज अगदीं खणखणीत आणि बोलण्याची

पद्धत करडी आहे. ध्वनियंत्राच्या प्रमुखाशीं बोलतांना ' ॲ ! म्हणून कधीं कधी ते जो दीर्घ प्रश्नार्थक उद्गार काढीत तो साऱ्या सभासदांच्या कानात खणखणल्यावांचून राहत नसे. ' अब जलसेकी कार्रवाई शुरु होगी ! ' असें जाहीर करतांना ' र् ' चा उच्चार ते असा काही कुर्र्यानें करीत असत कीं, ऐकणाराच्या काळजांत काहीं तरी ' टर् ' वाजल्यासारखें वाटे ' कार्रवाई ' म्हणजे ' कामकाज ' ' तजवीज ' म्हणजे ' ठराव ' ' तरमीम ' म्हणजे, ' उपसूचना ' आणि ' तकरीर ' म्हणजे ' अनुमोदन ' हे त्यांच्या तोंडून वारंवार निघणारे वजनदार उर्दू शब्द थोड्या अवकाशातच उर्दू न समजणाऱ्या श्रोत्याच्याही परिचयाचे होऊन बसले. अशा तऱ्हेनें पहिल्या दिवशीं श्रोत्यांना कांहीं ऐकावयाला मिळालें नसेल तरी पाहावयाला पुष्कळच मिळालें. विशेषें-करून ' सुभाषबाबू ' हे आता जनतेचे कसे जीव कीं प्राण होऊन बसले आहेत याचा त्या दिवशीं प्रत्यक्षच पुरावा पहावयाला मिळाला.

## सुभाषबाबू झिंदाबाद

गेल्या वर्षांतील मृत व्यक्तींविषयीं शोक व्यक्त करण्याचा जो ठराव आरंभी सभेपुढें आला त्यामध्यें ' सुभाषबाबू ' चें नांव कसें नाहीं, असें एकानें ओरडून विचारलें. त्याबरोबर ' ते जिवत असावेत असें मला वाटतें ! ' असें आझाद यांनीं ताडकन् उत्तर दिल्याबरोबर, ' सुभाषबाबू झिंदाबाद ' च्या प्रचंड आरोळ्या साऱ्या मंडपामधून उठल्या आणि हजार सभासदांच्या अंगावर हर्षाचे रोमांच उभे राहिले ! सुभाषबाबूंचे थोरले बंधू शरद् बोस हे व्यासपीठावर आले तेव्हां पुन्हां साऱ्या मंडपामध्यें तोच जयनाद निनादला ! आणि सरदार वल्लभभाई यांनीं धांवत जाऊन शरद्बाबूंना जी कडकडून मिठी मारली, त्या मिठीत तीस हजार काळजें चिरडून ठार झाली आणि तें दृश्य बघून साठ हजार डोळ्यांमध्यें सरसरून अश्रू उभे राहिले ! गुजरातच्या सिंहाचें आणि बंगालच्या वाघाचें हें आलिंगन पाहून ज्यांचे कंठ त्या दिवशीं गद्गदून आले ते खरोखरच धन्य होत ! वल्लभभाईनंतर शरद्बाबूंना दुसऱ्या अनेक नेत्यांनीं

आलिंगनें दिलीं, पण छे, पहिल्याची ती अजब जादू पुन्हां कांहीं अनुभवावयाला मिळाली नाहीं !

## सत्तावनी बंडाची पुनरावृत्ति !

**शनिवारीं** सभेच्या प्रारंभालाच पंडित जवाहरलाल नेहरू यांनीं आपल्या वक्तृत्वाची तेजस्वी गोलंदाजी जवळ जवळ एक तासभर केली आणि सारा मंडप दणाणून सोडला ! गेल्या तीन वर्षांमध्यें सरकारनें जनतेवर अनन्वित अत्याचार आणि जुलूम केले. देश स्वतंत्र करण्याच्या आणि पारतंत्र्य झुगारून देण्याच्या जनतेच्या आकांक्षा चिरडून टाकण्याचा सरकारनें आटोकाट प्रयत्न केला. तथापि, सरकारच्या या दडपशाहीचा जनतेनें मोठ्या धैर्यानें प्रतिकार केला ! हा प्रतिकार करताना जनतेच्या हातून जर कोठें अहिंसात्मक वर्तन झालें नसेल तर त्याची जबाबदारी केवळ सरकारवरच पडते ! जनतेच्या पूज्य पुढाऱ्यांना अकस्मात् पकडून तिच्या शांततामय चळवळी दडपून टाकण्याचा प्रयत्न सरकारनें जर केला नसता, तर देशामध्यें एवढा प्रचंड लोकक्षोभ होण्याचें कांहींच कारण नव्हतें ! १९४२ च्या बंडांत सातारा, मिदनापूर, बिहार, बालिया या ठिकाणीं पराक्रमाच्या ज्या तेजस्वी गोष्टी घडून आल्या, त्या स्वातंत्र्याच्या इतिहासांत खरोखरच सुवर्णाक्षरांनीं लिहिण्यासारख्या आहेत, अशी जवाहरलालनीं जेव्हां गर्जना केली, तेव्हां टाळ्यांच्या कडकडाटानें सारा मंडप खालीं कोसळतो आहे किंवा काय असेंच वाटलें. या वेळीं पंडितजींच्या अंगांत जो विलक्षण आवेश संचारला होता तो आम्ही कधींही विसरणार नाहीं. ते उसळून म्हणाले, " त्या वेळीं सारे पुढारी तुरुंगांत होते. जनतेला मार्ग दाखवावयाला कोणीही बाहेर नव्हते. त्या वेळीं जनतेनें स्वयंस्फूर्तीनें जें जें कांहीं केलें तें तें योग्यच केलें ! मी त्या वेळीं बाहेर असतों तर काय केलें असतें हें मला देखील सांगतां येत नाहीं ! आतां इथें शांतपणें बसून जनतेच्या नांवानें खडे फोडण्यांत काय अर्थ आहे ! त्या वेळीं जनतेचें आत्मिक बल एवढें प्रखर झालें होतें कीं, जवळ जवळ सत्तावनी बंडाची ती पुनरावृत्ति असेंच म्हणावयाला हरकत नाही ! "

## म्हणजे काँग्रेसचे वजन घटलें !

"**कोण** म्हणतो देशावरील कॉंग्रेसचें वजन घटलें ? " असा जेव्हां जवाहरलालनीं बुभुःकार केला तेव्हां सर्वांच्या अंगावर हर्षाचे रोमांच उभे राहिले. 'जेथें जेथें मी जातों तेथें तेथें काँग्रेसच्या झेंड्याखालीं लक्षावधि लोक जमा झालेले मला दिसतात. हें काय कॉंग्रेसचें वजन कमीं झाल्याचें चिन्ह आहे होय ? या ठिकाणीं हा जो प्रचंड जनसमुदाय एकत्र जमलेला आहे तो काय कॉंग्रेसचें वजन कमी झालें आहे असें दाखवितो ! असा पुकार पंडितजींनीं करताच पुन्हा टाळ्यांचा गगनभेदी निनाद चोंहींकडून उठला, ' हीं चिन्हें काय दाखवतात ? हीं चिन्हें असें दाखवितात कीं, सरकारी दडपशाहीनें जनता घाबरली नाहीं. उलट तीं आधिक जोरानें कॉंग्रेसच्या मागून येऊ लागली आहे ! परकी राजसत्ता झुगारून देऊन देश स्वतंत्र करण्याची तिची इच्छा अधिकच प्रबळ झालेली आहे ! लढाई संपली तरी जगांतला साम्राज्यवाद अजून मेला नाहीं ! पण लक्षांत ठेवा, हिंदुस्थान स्वतंत्र झाल्याशिवाय, आशियांतील सारीं परतंत्र राष्ट्रें स्वतंत्र झाल्याशिवाय जगात स्वातंत्र्य आणि शांतता प्रस्थापित होणें अशक्य आहे ! " पंडितजींचें भाषण संपताच त्यांच्या नांवाचा साऱ्या सभागृहामध्यें एवढा प्रचंड जयघोष झाला कीं, तो अजूनही आमच्या कानात घुमतो आहे !

## बोलून चालून आम्ही माणसेंच !

**नायडूंच्या** मागून देवधर बॅटिंगला यावेत तसें पंडितजींच्या मागून वल्लभभाई व्यासपीठावर जेव्हां उभे राहिले तेव्हां श्रोत्यांच्या आनंदाला पारावारच राहिला नाहीं. वल्लभभाईंच्या नावाचा प्रचंड जयघोष चहूकडे उठला ! आणि एकदम सभा स्तब्ध झाली ! काँग्रेसच्या आंदोलनाला सरकारनें 'काँग्रेसचें बंड' असें नांव दिलेलें आहे. त्याचा उल्लेख करून वल्लभभाई म्हणाले, "या नांवाचा मी मोठ्या आनंदानें स्वीकार करतों. सत्तावन सालच्या बंडाप्रमाणेंच बेचाळीस सालचें देखील हें बंडच होतें. त्यावरून हीच गोष्ट सिद्ध होत नाहीं काय, कीं,

या देशांतील लोकांना स्वतंत्र होण्याची इच्छा आहे ? मला वाईट एवढेंच वाटतें कीं, या बेचाळीसच्या बंडाची आम्हीं तयारी केली नव्हती ! तयारी करून जर कां आम्हीं हें बंड केलें असतें तर आमच्या स्वातंत्र्याचा प्रश्न या घटकेला आज शिल्लकच उरला नसता ! " हें वाक्य उच्चारतांच साऱ्या सभेनें जवळ जवळ वल्लभभाईंना वरच्यावर उचलून घेतलें ! आंतल्या आत एकादें यज्ञकुंड धुमसावें असा आवेशाचा अंगार या वेळीं वल्लभभाईंच्या डोळ्यांमधून भडकूं लागला. ते गर्जून म्हणाले, ' या बंडाचे वेळी जनतेनें जें कांहीं केलें तें स्वतःच्या संरक्षणासाठीं केलें ! यांत वाईट काय झालें ? जनावरें देखील स्वत.चें रक्षण करण्यासाठीं दुसऱ्याच्या अंगावर धांवून जातात, तर आम्ही बोलून चालून माणसेंच होतों ! सरकारी दडपशाहीचा आम्हीं प्रतिकार केला. यांत बिघडलें कोठें ? " या वेळीं सभेच्या भावना इतक्या प्रक्षुब्ध झाल्या कीं, त्याला सुमारच नव्हता !

## आशियांतून चालते व्हा !

**बंगालच्या** दुष्काळांत लक्षावधि लोक मेले असूनसुद्धां ती जबाबदारी सरकार आपल्या अंगावर घेत नाही ! इतकें बेजबाबदार सरकार जगाच्या पाठीवर कोठें तरी असू शकेल काय ? एवढेच नव्हे तर दुष्काळग्रस्त भागाला साधी भेट देण्याची माणुसकी देखील लॉर्ड लिनलिथगो यांनीं दाखविली नाहीं ! या गोष्टीचा उल्लेख करून एखाद्या विद्युल्लतेप्रमाणें वल्लभभाई कडाडले की, " अशा नालायक सरकारला या देशावर राज्य करण्याचा हक्क नाहीं ! " खलास ! खलास ! वल्लभ-भाईंच्या क्रोधाचें तें दैदिप्यमान स्वरूप पाहून जो तो त्या क्षणीं आपल्या खुर्चीवर अगदीं खलास झाला ! त्या मूर्च्छेमधून श्रोतृवृंद पुन्हां जरा कुठें शुद्धीवर येतो तोंच वल्लभभाईंनीं खवळलेल्या सिंहाप्रमाणें पुन्हां विक्राळ गर्जना केली कीं, " लक्षांत ठेवा ! आठ ऑगस्टच्या आमच्या ' चले जाव ' च्या ठरावांतला एक स्वल्पविराम देखील मागें घ्यावयाला आम्ही तयार नाहीं ! उलट हिंदुस्थानांतून चालते व्हा असें तुम्हांला सांगण्याऐवजीं आतां साऱ्या आशिया खंडांतून तुम्ही चालते व्हा असें आम्ही तुम्हांला बजावून सांगतों ! " वल्लभभाईंच्या त्या गर्जनेंत

चाळीस कोटी लोकांच्या आवाजाचें सामर्थ्य एकत्रित झालेलें होतें असेंच सर्वांना वाटतें.

## आम्ही स्वातंत्र्य मिळविणार

**प्रत्येक** वाक्यावाक्याबरोबर वल्लभभाईंचा आवेश वाढत चाललेला होता आणि त्यांच्या गर्जना अधिकाधिक रौद्र आणि गंभीर होत चाललेल्या होत्या. श्रोत्यांकडे नीट न्याहाळून पाहून पुन्हां त्यांनीं सवाल केला, “आठ ऑगस्टचा ‘चले जाव’ ठराव आम्हीं केला म्हणून सरकार आमच्यावर खटले भरून आम्हांला न्याया-सनासमोर उभें करणार होतें! मी विचारतों, आम्हांला न्यायासनासमोर येण्याची आधिक इच्छा होती. चौकशी न करतां त्यांनी आम्हांला तुरुगात काय म्हणून ठेवलें आणि आज काय स्थिति झाली आहे? आम्ही याच्या न्यायासनासमोर उभें राहण्याच्या ऐवजी याच लोकांना आज जगाच्या न्यायासनासमोर उभें रहावें लागलें आहे! यांच्याच न्यायबुद्धीची आतां खरी कसोटी लागणार आहे. पुष्कळ लोक म्हणत असत कीं, हें ‘लोकयुद्ध’ आहे! हें जर खरोखरच लोक-युद्ध असतें तर तें संपल्यानतर आतां आम्हांला स्वातंत्र्य मिळालें नसतें काय? मग कुठें आहे तें आमचें स्वातंत्र्य? सर सिकंदर हयातखान म्हणाले होते कीं, या युद्धानतर जर आपला देश स्वतत्र झाला नाही, तर मी कॉंग्रेसच्या झेंड्या-खालीं सरकारशीं लढेन! बिचारे शिकंदर मरून गेले! त्यांच्या वारसदारांनीं त्याच्या इच्छेप्रमाणें वागावयाला नको काय? युद्धांत सरकारशीं सहकार्य करून काहींच फायदा नव्हता. हें कॉंग्रेसचेंच म्हणणें शेवटीं खरें ठरलें! म्हणून कोट्यवधि लोक आज कॉंग्रेसच्या मागें आहेत,” बोलतां बोलता वल्लभभाईंनीं आपला सूर एकदम चढवला आणि ते गरजले, “आमच्या स्वातंत्र्याच्या मार्गावर आतां आम्हाला कोणीही अडवू शकणार नाहीं! स्वातंत्र्य मिळविण्याची आम्हीं प्रतिज्ञा केलेली आहे आणि आम्ही तें मिळविणारच मिळविणार!” आभाळांत विद्यु-ल्लताचा कडकडाट व्हावा असा या वेळीं साऱ्या सभागृहामधून टाळ्यांचा कडकडाट उठला! आणि सिंह गुरगुरत जसा आपल्या गुहेकडे वळावा तसे वल्लभभाई आपल्या जागेवर जाऊन बसले.

## काँग्रेसमधला जादूगार वक्ता

**काँग्रेसचे** जनरल सेक्रेटरी आचार्य कृपलानी म्हणजे विद्वत्ता आणि विनोद याचें एक मिष्किल मिश्रण आहे. त्याचे विचार गांभीर्य व्यक्त करतें, तर त्यांच्या ओंठावर सदैव रेंगाळणारें मंदस्मित त्याच्या भेदक विनोदबुद्धीची साक्ष देते. त्यांच्या वक्तृत्वाचा एकंदर नमुनाच निराळा! हिंदुस्थानी आणि इंग्रजी या दोन भाषा त्याच्या घरीं जणूं कांहीं पाणीच भरताहेत! हिंदुस्थानी बोलता बोलतां कधी ते इंग्रजी भाषेंत बोलावयाला सुरुवात करतील आणि इंग्रजी बोलतां बोलतां ते हिंदुस्थानीच्या क्षेत्रांत भटकत जातील! कुठें थांबणें त्यांना माहित नाहीं कीं कुठें अडखळणें त्यांना ठाऊक नाही! ते कधी रागवायचे नाहींत किंवा कधीं ओरडावयाचे नाहींत! वक्तृत्वाच्या कोठल्याही कृत्रिम युक्त्यांचा अवलंब ते कधींही करीत नाहींत! त्यांच्या भाषेचा प्रवाह अगदीं अस्खलित, संथ आणि शांत चाललेला असतो. एवढेंहि असून त्याना कोठलीही भावना किंवा कोणताही रस विशेष श्रम न घेतां सहजपणें सभेंत निर्माण करतां येतो. आणि असख्य श्रोत्यांचें लक्ष एकसारखें स्वतः कडे खेंचून धरतां येतें. मोठ्या माणसानें लहान पोराला जसें खेळवावें तसें कृपलानी आपल्या वक्तृत्वानें वाटेल तेवढ्या मोठ्या सभेला खेळवीत आहेत असें वाटतें म्हणून जवाहरलाल आणि वल्लभभाई यांच्या वक्तृत्वानें दिपलेल्या श्रोत्यांना आचार्य कृपलानी अगदीं बोल बोल म्हणतां तसेंच पुष्कळ वेळ झुलवीत ठेवू शकतात! नाहीं तर त्याच्या मागून दुसऱ्या अलबत्या गलबत्या वक्त्याचा काय पाड लागला असता तिथें ?

## सामोपचार आणि प्रतिकार !

**काँग्रेसच्या** गेल्या साठ वर्षांच्या उत्क्रांतीचा, कार्याचा आणि साधनांचा जिवंत चित्रपट आचार्य कृपलानींनीं सभेच्या डोळ्यापुढें उभा केला; देशांतील सर्व जनतेसाठी स्वराज्य संपादन करणें हेंच कॉंग्रेसचें प्रारंभापासूनचें ध्येय होतें. १९२० सालापासून कॉंग्रेस ही खरीखुरी जनतेची संघटना झाली आणि शांततेच्या सनदशीर

साधनाबरोबर असहकार आणि कायदेभंग या क्रांतिकारक अस्त्रांचा उपयोग करायचें तिनें ठरविलें. १९२९ सालीं 'सपूर्ण स्वातंत्र्या'चा काँग्रेसनें पुकार केला तर १९४२ सालीं ब्रिटिश सरकार या देशांतून चालतें झालें तरच देशाला स्वातंत्र्य मिळेल, अशी तिनें गर्जना केली. हिंदी जनतेची स्वातंत्र्याची तहान गेल्या साठ वर्षांमध्यें एकसारखी वाढतच गेली आहे आणि परकी राज्य-सत्ता उलथून टाकण्याचा तिचा निर्धार आतां खंबीर झालेला आहे. सरकारवर जनतेचा आता काडीइतका देखील विश्वास नाहीं आणि सामोपचारानें सरकार आपणाला कांहीं देईल असें जनतेला मुळींच वाटत नाहीं. अशी परिस्थिति असून देखील 'शक्य तेथें तडजोड आणि सामोपचार, आणि अशक्य असेल तिथें असहकार आणि प्रत्यक्ष प्रतिकार' हेंच कॉंग्रेसचें यापुढें धोरण राहील अशी आचार्य कृपलानींनीं घोषणा केली !

## आम्ही विसरूं काय ?

**आचार्य** कृपलानींच्या जिभेची धार किती तिखट आहे आणि त्यांचें वक्तृत्व किती मर्मभेदक आहे याचा पडताळा या वेळी प्रथम आम्हाला आला. ते म्हणाले, "पर्लहार्बरवर अचानक हल्ला करून जपाननें अमेरिकेचा जसा विश्वासघात केला, तसा जनतेच्या आवडत्या पुढाऱ्यांना अकस्मात् पकडून इंग्रज सरकारनें हिंदी जनतेचा विश्वासघात केला यात मुळींच संशय नाहीं. जनतेच्या हातून हिंसा घडली याजबद्दल तक्रार करावयाला सरकारला कांहीं तोंड आहे काय ? हिंसेनें सरकारचे हात कोंपरापर्यंत बरबटलेले आहेत ! जनतेच्या हिंसेविरुद्ध खरी तक्रार कुणी करावयाची असेल तर गांधींजींनीं करावयाची, काँग्रेसनें करावयाची ! कारण अहिंसा हें आजपर्यंत आमचें धोरण आहे ! हिंसेविरुद्ध सरकारनें ओरडा करावयाचा म्हणजे चोराच्याच उलट्या बोंबा ! सरकार आतां आम्हांला म्हणतें कीं, जें झालें गेलें तें आपण आतां विसरून जाऊं आणि एकमेकांना मदत करूं या ! "क्षमा करा आणि विसरा !" या वेळीं आचार्य कृपलानींच्या काळजामध्यें खळबळ चाललेली असावी ती त्यांच्या रुद्ध स्वरावरून प्रत्येकाच्या अंतःकरणाला जाऊन भिडली, दुःखाचा

आवंढा गिळून ते शांतपणें म्हणाले, "आम्ही विसरूं ! आम्ही काय काय विसरूं ? सांगा, आम्ही काय काय विसरू ? जालियनवाला बागेंत निरपराधी रक्ताचे जे पाट वाहिले ते आम्ही विसरणें कधी शक्य आहे काय ? इतकेंही असून आम्ही अहिंसेचें धोरण स्वीकारतों आहोंत याचा अर्थ आम्ही तें सारें विसरण्याचाच प्रयत्न करीत आहोंत असाच नाहीं काय ? आणि तुम्ही मात्र आम्हांला जें द्यायचें ते नेमकें विसरूनच जातां याला कांहीं अर्थ आहे काय ! " असें बोलतां बोलतां कृपलानींचा आवाज एकदम कठोर झाला आणि स्वर थोडासा उंच करून ते त्वेषानें म्हणाले, " कोण म्हणतो लोक दमलेले आहेत ! लोकांत उत्साह राहिला नाहीं ! मी म्हणतों, असें जे कोण म्हणत असतील ते पुढारीच मुळीं थकलेले आहेत लोकांचे पुढारी होण्याची त्याची मुळीं लायकीच नाहीं ! स्वातंत्र्य मिळविण्याचा लोकांचा निर्धार अगदीं दुर्दम्य आहे ! आमचें स्वातंत्र्य मिळविण्यासाठीं आम्हाला ॲटम बॉंब वापरायची मुळीच जरूरी नाहीं ! महात्मा गांधींचें नेतृत्व हाच मुळीं आमचा ॲटम बॉंब ! त्यांच्या नेतृत्वानें आम्ही स्वातंत्र्य मिळवूच मिळवू ! " आचार्य कृपलानी खालीं बसल्यानंतरही किती वेळ तरी सारें सभागृह टाळ्यांच्या कडकडाटाने निनादून राहिलें होतें.

## ' चलेजाव'च्या वाटाघाटी

**आचार्य** कृपलानींच्या व्याख्यानानंतर इतर वक्त्यांच्या भाषणाचा सूर एकदम तिसऱ्या सप्तकापर्यंत जाऊन पोहोंचला. आणि मौलाना नुरुद्दीन बिहारी यांनीं तर वक्तृत्वाचा कळसच केला ! इतकें आवेशपूर्ण, अस्खलित आणि प्रखर भाषण आम्हीं आमच्या आयुष्यांत कधींहीं ऐकलें नाहीं. दहा पंधरा मिनिटें एकसातबारी फटाकडे फडाफड वाजावेत तसें आम्हांला वाटलें. उर्दू भाषेचा आवेश, डौलदार रुबाब यांची एक झगझगीत आरासच त्यांनीं श्रोत्यांपुढें मांडली ! हे भाषण ऐकल्यापासून मौलाना साहेबांवर आम्ही बेहद्द खूष आहोंत ! त्यानंतर महावीर त्यागी हे व्यासपीठावर आले ! त्यांचाही जवळ जवळ तोच खाक्या! ध्वनिक्षेपकांत जवळ जवळ तोंड खुपसूनच त्यांनीं बोलावयाला सुरुवात केली तेव्हां पंडित जवाहरलालनीं त्यांना दोन्ही दंडाला पकडून मागें ओढलें, तेव्हां

त्यांनीं ताबडतोब कोटी केली कीं, " पहा हो, मी पुढें जातों आहें आणि माझे पुढारी मला मागें खेंचण्याचा प्रयत्न करीत आहेत ! " महावीर म्हणाले, " सरकारनें आतांपर्यंत एवढे अत्याचार केले असतां त्यांच्याशीं यापुढें आपण तडजोडीचें आणि सामोपचाराचें धोरण स्वीकारणें म्हणजे एकाद्या बायकोनें आपल्या नवऱ्याला ' तू रोज उशीरां घरीं परत येतोस, दारू पिऊन मला मारतोस आणि माझा छळ करतोस तरी पण तुला मी आज जेवायला वाढतें तसें म्हणण्यापैकींच आहे ! " त्या वेळी सभागृहात खूपच हंशा पिकला ! बंगालचे एक वृद्ध कार्यकर्ते श्री. शिरीषचद्र चतर्जी म्हणून आहेत त्यांच्या तोंडात एक दांत देखील शिल्लक नाहीं ! तथापि त्यांच्या अगात वक्तृत्व आणि वीरश्री नुसती थैमान घालते आहे ! त्याचें इग्रजी भाषण स्पष्टपणें ऐकू येत नसलें तरी ध्वनिक्षेपकापुढें उड्या मारीत जेव्हा ते गरजू लागत तेव्हां श्रोते त्याच्यावर खूष असत. सामोपचारानें स्वातंत्र्य मिळविणें शक्य नाहीं असें त्यांनीं सागितले. त्याचें भाषण लांबत चाललें, तसें राष्ट्रपति त्यांना म्हणाले, " तुम्ही आमचा वेळ जास्त वायां घालवू नका ! " त्याबरोबर म्हातारा एकदम गरकन् वळून राष्ट्रपतीना म्हणाला, " तुम्हीही यापुढें सिमल्याला जाऊन आमच्या वेळेचा अपव्यय करीत जाऊ नका ! " खूपच हशा झाला तव्हां ! आचार्य कृपलानी यानीं आक्षेपकांना उत्तरें देतांना पुन्हा गमत केली ! ते म्हणाले, सशस्त्र राष्ट्रें देखील शत्रूशीं तडजोडीचीं बोलणीं करतात. मग आपण तर बोलून चालून अहिंसावादीच आहोंत. आपणांस ब्रिटिश सरकारशीं सामोपचारानें बोलणें करावेंच लागणार ! उदाहरणार्थ, उद्या हिंदुस्थान सोडून ब्रिटिश लोक इंग्लंडला जायला निघाले म्हणजे त्याना एकदर जहाजें किती लागतील याच्या बाटाघाटी सामोपचारानेंच आपणाला त्यांच्याशीं कराव्या लागणार नाहींत काय ? कृपलानींच्या त्या विनोदामुळें सभागृहात गरमागरम झालेलें वातावरण एकदम थंड झालें आणि श्रोत्यांना खूपच मौज वाटली.

## पांचच वर्षांच्या आंत

**रविवारीं** दुपारीं लार्ड वेव्हेल याच्या नव्या घोषणेवर सरदार वल्लभभाईंनीं हल्ला चढविला. क्रिप्स साहेबांनीं मागें जी योजना आम्हाला देऊ केली होती

आणि जी आम्हीं झिडकारली होती तीच टाकाऊ योजना पुन्हां थोडासा बदल करून वेव्हेल साहेबांनीं आतां आमच्या पुढें मांडलेली आहे असें वल्लभभाईंनीं सांगितलें. ज्या योजनेंत हिंदी स्वातंत्र्याचा उल्लेख सुद्धां नाहीं, तिचा स्वीकार आम्ही करू म्हणतां कीं काय ? शक्य नाहीं ! नवी वेव्हेल–योजना ही अस्पष्ट, अयोग्य आणि अपुरी आहे, असाच कॉंग्रेसनें आपला निर्णय दिलेला आहे ! अशी परिस्थिति असतांही सरकारनें निवडणुकी जाहीर केल्या आहेत. फारच थोड्या लोकांना आज मतदानांचा अधिकार आहे ! निवडणुकीला लागणारें स्वातंत्र्याचें मोकळें वातावरण सरकारनें देशांत अद्यापि निर्माण केलेलें नाहीं ! सोशलिस्ट पक्ष, पुरोगामी पक्ष, किसान संघटना याजवर पूर्वी बंदी होती तशीच अजूनही कायम आहे. निवडणुकी होईपर्यंत देशांतले नालायक आणि सडकें सरकार आहे तसेंच चालू राहणार आहे ! अशी परिस्थिति असून सुद्धा कॉंग्रेस या निवडणुकी लढवणार अशी वल्लभभाईंनीं घोषणा केली. ते म्हणाले, “ आम्ही कांहीं जमिनदार भांडवलवाले नाहींत. आम्ही गरीब आहोंत. निवडणुकी लढवा-यला आमच्याजवळ ‘ चांदीच्या गोळ्या ’ कुठून असणार! आमची अत: करणें याच आमच्या खऱ्या गोळ्या ! याच गोळ्यांनीं आम्ही सारीं कायदेमंडळें आमच्या ताब्यांत घेणार! आम्ही जर कायदेमंडळामध्यें गेलों नाहींत तर देशांतले प्रतिगामी, पंचमस्तंभी नतदृष्ट लोक तेथें जाऊन बसतील आणि देशाचा सत्यानाश करतील! तथापि निवडणुकींत भाग घेतांना कॉंग्रेस आपल्या ध्येयाला कधीं विसरणार नाहीं! ब्रिटिशांचें मजूर मंत्रिमंडळ पांच वर्षे टिको किंवा न टिको, आम्ही मात्र या पाच वर्षांच्या अवधींत या देशाचा राज्य-कारभार आपल्या ताब्यांत घेतल्यावाचून कधींही राहणार नाहीं, हें सरकारनें पक्कें समजून असावें!” टाळ्यांच्या कल्लोळात वल्लभभाईनीं ज्या वेळीं आपलें भाषण पुरें केलें त्या वेळीं त्यांच्यावरून आपले प्राण ओंवाळून टाकावेत असेंच साऱ्या सभासदांना वाटल्याखेरीज राहिलें नाहीं.

## लालभाई, खालीं बसा!

**वल्लभभाईच्या** नंतर गोविंद वल्लभ पंत म्हणाले, “ नवीन वेव्हेल योजना म्हणजे डोंगर पोखरून सरकारनें त्यांतून काढलेला एक मेलेला उंदीर आहे!

निवडणुकीच्या मार्गांत इतके अडथळे निर्माण करून पुन्हां सरकार आम्हांला निवडणुकी लढवा म्हणून सांगतें आहे! उन्हामध्यें बसवून बर्फ तयार करा असें म्हणण्यापैकींच हें आहे!" वल्लभभाईंच्या ठरावाला डॉ. सय्यद आश्रफ आणि मियां इफातिखारुद्दिन यांनीं जेव्हां दोन उपसूचना पाठविल्या तेव्हां सभागृहांत खूपच खळबळ उडाली. मुस्लिम बहुसंख्यांक प्रांतांना मध्यवर्ति सरकारमधून फुटून निराळें व्हावयाला कॉंग्रेसनें परवानगी द्यावी म्हणजे कॉंग्रेसनें 'पाकिस्तान' मान्य करावे असाच त्या दोन्ही उपसूचनांचा हेतू होता. डॉ. आश्रफ आणि मियांजी याच्यावर भारतीय समितीचे सभासद आधींपासूनच चिडलेले होते. याचें कारण म्हणजे डॉ. आश्रफ हे एक 'स्वातंत्र्यद्रोही कम्युनिस्ट' आहेत आणि मियांसाहेबांनीं प्रांतिक कॉंग्रेस कमिटीच्या अध्यक्षपदाचा नुकताच राजिनामा दिलेला आहे. डॉ. आश्रफ व्यासपीठावर येतांच भारतीय समितीचे केदारनाथ आर्य एकदम रागानें ओरडले, " तुम्ही कम्युनिस्ट आहात, आम्हाला तुमचें काहीं एक ऐकावयाचें नाही." कम्युनिस्ट पक्षाविरुद्ध कॉंग्रेसनें अद्यापि शासन निर्णय दिला नसल्यानें डॉ. आश्रफ यांना बोलूं दिल्यावाचून राष्ट्रपतींनाही गत्यंतर नव्हतें. डॉ. आश्रफ जोरजोरानें ओरडून बोलूं लागले. त्याबरोबर साऱ्या सभागृहांतून धिक्काराच्या आरोळ्या उठल्या आणि डॉ. आश्रफ यांना अधिक वेळ बोलतां येणें अगदीं अशक्य झालें! लालभडक चेहरा करून बिचारे लालभाई आपल्या जागेवर जाऊन बसले. मियांसाहेबांची देखील श्रोत्यांनीं जवळ जवळ तशीच बोळवण केली, ते म्हणाले, " मुस्लिम लीग हीच मुसलमानांची आज कॉंग्रेस झालेली आहे " येथपर्यंत श्रोत्यांनीं कसाबसा दम काढला; पण जेव्हां ते म्हणाले कीं, " या पंचवीस हजार लोकात मला पचवीस मुसलमान देखील दिसत नाहीत!" तेव्हां मियांसाहेबांना श्रोत्यांनीं शिंगावर उचलून भिरकावून दिलें.

## जवाहरलालांची गर्जना

**सबंध** अधिवेशनांतलें एक अत्यंत तेजस्वी आणि सामर्थ्यवान् वक्तृत्व करण्यास यानंतर पंडित जवाहरलाल नेहरू पुढें सरसावले. या सुमारास सभा-

गृहांतलें वातावरण अतिशयच तापलें होतें ! अनेक वक्त्यांच्या एकाटीपेक्षां एक वीरश्रीयुक्त गर्जना ऐकून ऐकून सभाजनांचीं डोकीं खरोखरच ठणकायला लागलेलीं होतीं. श्रोत्यांच्या भावनाचा प्रक्षोभ आतां आणखी वाढवीत नेल्यानें आपल्याला त्याच्या मनावर जो काहीं परिणाम करावयाचा आहे, तो होणें शक्य नाहीं हें पंडितजींनी तामडतोब ओळखलें ! श्रोत्यांचीं अंतःकरणें काहीं वेळ तरी आतां शांत व्हावयाला पाहिजेत, मग त्यावर आपल्याला काय लोखंडाचे पण घालावयाचे आहेत ते आपण घालूं, असा निर्धार करून पंडितजींनीं आपल्या शांत आणि गोड आवाजात अगदी धिमेपणानें बोलावयास सुरुवात केली. उन्हांतून खूप तापून आल्यानंतर थंडगार शहाळ्यामधलें पाणी प्यायल्यानें आपला अंतरात्मा जसा संतृप्त होतो, तसें पंडितजींच्या वक्तृत्वाचें गुलाब पाणी अंगावर झिमझिम सांडत असता त्या वेळीं आम्हाला वाटत होतें. किती वेळ तरी त्याच एका शांत मधुर स्वरात पंडितजी बोलत होते ! मजूर पक्ष अधिकारावर आला तरी ब्रिटिश सरकारचे हिंदुस्थानबद्दलचें पूर्वीचें धोरण अद्यापीही कसें बदललेले नाहीं, तें त्यांनीं न रागावता न चिडतां श्रोत्याना समजावून सांगितलें. आणि निवडणुकी जिंकेंपर्यंत कॉंग्रेसही आपलें पुढचें धोरण कां जाहीर करणार नाहीं, याचींही कारणें त्यांनीं श्रोत्यांना समजावून दिलीं. त्यानंतर आतां सभेची मनोभूमिका आपल्याला सर्वस्वी अनुकूल आहे असें ओळखून पंडितजींनीं लागलाच आपला पवित्रा आणि स्वर बदलला. त्याच्या चेहऱ्यावरचा आणि डोळ्यातला तो सौम्यपणा नाहीसा झाला. त्यांच्या गळ्यावरच्या शिरा एकदम फुगून बाहेर आल्या. आपल्या पातळ सदऱ्याच्या बाह्या कोंपरापर्यंत चढवीत चढवीत, वाघ टिपण मरण्यापूर्वी जसा दबून बसतो तशी अकिंचित् पाठ झुकवून पंडितजींनीं बोलावयास सुरुवात केली. ते म्हणाले, देशांतील सर्व जमातींमध्यें आपुलकीचा भाव निर्माण करणें हे कॉंग्रेसचं कर्तव्य आहे. मुसलमानामध्यें तो आपलेपणा वाढविणें हें आमचें कर्तव्य आहे तथापि मुसलमानाना 'आपलें' म्हणणें आणि मुस्लिम लीगला 'आपली' म्हणणें या दोन गोष्टींमध्यें जमीनअस्मानाचें अंतर आहे. आजपर्यंत आम्ही मुस्लिम लीगच्या दरवाज्याशीं अनेक वेळां गेलों. पण प्रत्येक वेळी आमची निराशाच झाली ! " या ठिकाणीं एकदां

ज्वालामुखी फुटावा तसा पंडितजींच्या क्रोधाचा एकदम स्फोट झाला. ते कडा-डून म्हणाले, "कॉंग्रेसच्या अध्यक्षाबद्दल मुस्लिम लीगनें जे अपमानास्पद शब्द उद्गारले ते आम्ही कधीं तरी विसरू काय ? आमच्या अध्यक्षांची त्यानीं स्पेशल माफी मागितल्याखेरीज एक शब्द त्यांच्याशीं बोलावयाला यापुढें आम्ही तयार नाहीं ! नाहीं–नाहीं–मुस्लिम लीगशीं यापुढें आमचा 'समझौता' होणें कदापीही शक्य नाहीं ! मुस्लिम जनतेकडे आम्ही शंभर वेळां जाऊं, पण मुस्लिम लीगच्या दारांत आम्ही पाऊलही टाकणार नाहीं ! एकमेकांशी सौदा आणि ठराव करून स्वातंत्र्याचा लढा कुठें लढता येतो होय ! आम्ही तुरुगांत गेलों तेव्हां आमच्या ठरावाची लोकानीं काय वासलात लावली ? स्वतंत्र हिंदु-स्थानानें काय करावयाचें तें स्वतंत्र हिंदुस्थानच त्या वेळीं ठरवील !"

**पांच** मिनिटें एकसारखा ढगांचा आणि विजाचा कडकडाट होत रहावा तसें त्या वेळीं झालें. पंडितजींच्या प्रत्येक वाक्यावाक्याला सभागृहामध्यें टाळ्यांचा कल्लोळ होत होता आणि भावनांच्या लाटा उचंबळत होत्या. मेजर नायडूनीं एकसारख्या दहा बारा ओव्हर बाउंड्र्या मारल्या तर प्रेक्षकाची जी स्थिति होईल तशीच निराळ्या दृष्टीनें श्रोत्यांची त्या वेळीं अवस्था झाली ! पंडितजींच्या वक्तृत्वाचा हा विक्रम ज्यांनीं त्या दिवशी पाहिला असेल त्याला आपल्या आयुष्याचें सार्थक झालें असेंच वाटल्यावाचून राहणार नाही. व्याख्यान संपल्या-नंतर जवळ जवळ पाच मिनिटेंपर्यंत सभामंडपात टाळ्यांचा अखंड कडकडाट होत राहिला ! खरोखर, त्या दिवशीं प्रेक्षकांना जें पहावयाचें होतें तें पहावयाला मिळालें आणि श्रोत्याना जें जें ऐकावयाचें होते तें तें ऐकावयाला मिळालें !

## मुस्लिम लीगमध्यें जा !

**सभेच्या** भावनाचा बिंदु इतक्या उंचीपर्यंत जवाहरलालनीं चढाविल्या-नंतर त्याच्यामागून त्या व्यासपीठावर उभें राहण्याची कोणाची हिंमत होती ? हें सामर्थ्य एकट्या सरदार वल्लभभाईच्या अंगांत होतें ! नव्हे, त्यानंतर वल्लभभाई बोलणार हें सर्वांना माहितच होतें ! फारच नाट्यपूर्ण प्रसंग होता तो ! रंगभूमी-

वरून टाळ्यांच्या कडकडाटात एका वीरानें जावें आणि जयघोषाच्या दणदणाटांत दुसऱ्या वीरानें तेथें प्रवेश करावा तशा वैभवांत आणि रुबाबांत व्यासपीठावर येऊन सरदारांनीं आपल्या भाषणास सुरुवात केली. ते म्हणाले, " मुस्लिम लीग जें जें मागतें तें तें कॉंग्रेसनें त्याना द्यावें असें या कम्युनिस्टांना वाटतें मग या देशाचे तुकडे झाले, तरीही त्याची त्यांना पर्वा नाहीं ! त्यांच्या वर्तनावरून असें वाटतें कीं, ते कॉंग्रेसमध्यें नसून कॉंग्रेसच्या विरुद्धच आहेत. मुस्लिम लीगला खूष करण्यासाठीं आजपर्यंत आम्ही काय कमी प्रयत्न केले ! त्यासाठीं आम्हीं जातीय निवाडा पत्करला मुस्लिमलीगशीं समतेचें तत्त्व मान्य करून कॉंग्रेस ही हिंदुसघटना आहे असें जवळ जवळ मान्य करण्यापर्यंतही आम्ही गेलों ! या आमच्या हातून चुका घडल्या हें मला मान्य आहे. पण एवढेंही करून मुस्लिम लीगचें समाधान होत नाहीं, आतां काय म्हणावें ! कॉंग्रेसमध्यें एकही मुसलमान असतां कामा नये असा त्यांचा हट्ट आहे ! मुस्लिम लीगच्या आणि आमच्यामध्यें कांहींही मतभेद असले तरी ते राष्ट्राच्या स्वातंत्र्याच्या आड काय म्हणून यावेत ? काय वाटेल तें झालें तरी मुस्लिम लीगच्या दारांत आम्ही आता जाणार नाहीं ! ज्यांना आमच्यामध्यें रहावयाचें असेल त्यांनीं रहावें, नाहीं तर मुस्लिम लीगमध्यें चालूं लागावें ! " वल्लभभाईंच्या या घोषणेचा साऱ्या सभाजनानीं अत्यंत हर्षानें जय जयकार केला !

## जबानके मालिक !

त्या दिवशीं वक्तृत्वाचे एकाहीपेक्षां एकेक देदीप्यमान् चमत्कार श्रोत्यांना पहावयास सांपडले ! जवाहरलाल आणि वल्लभभाई यानीं केलेल्या अद्वितीय विक्रमावर शेवटीं राष्ट्रसभापतींनीं खरोखरच सुवर्णकळस चढीवला ! उर्दू शब्द-सृष्टीचा जणू कांहीं बादशहाच बोलतो आहे, असा प्रत्येकाला भास झाला. वाहवा, काय तो उच्चाराचा ठसका, काय ती भाषेची मस्ती आणि मिजास, काय तो शब्दाशब्दांमधून रसरसणारा आवेश ! माझ्या शेजारीं नटश्रेष्ठ पृथ्वीराज बसले होते ते मान डोलवून एकदम हर्षानें उद्गारले, " बस जबानके मालिक है ! ' आपल्या सामोपचाराच्या भाषणांत ते म्हणाले, " देशप्रेमाचा

प्रखर विस्तव या राष्ट्रांत पेटलेला आहे. या विस्तवाला जनतेचे नेते आपल्या पदरानें वारा घालवून तो भडकवितात, अशा कल्पनेनें सरकारनें साऱ्या नेत्याना कारागृहांत कोंडून ठेवलें. त्यांना वाटलें कीं, देशांतील ही आग आतां विझणार! पण गेल्या तीन वर्षांत जनतेनें आपल्या अनंत हस्तानीं या आगीला वारा घालून ती भडकविलेली आहे! माझ्यासमोर त्या आगीनें धगधगणारे शेंकडों निखारे या ठिकाणीं मला दिसत आहेत! सरकारनें लक्षांत ठेवावें कीं, देशप्रेमाचा हा अगार आता कालत्रयींही विझणें शक्य नाहीं! मग समुद्राच्या सहस्त्रावधि लाटा उसळोत, वरून मोठमोठे पर्वत कोसळोत किंवा सारें आभाळ तुटून खाली पडो!" राष्ट्रपतींच्या या तेजस्वी भाषणांतच तीन दिवसांच्या त्या प्रचंड अधिवेशनाचें सारें रहस्य सांठविलेलें होतें. कॉंग्रेसच्या झेंड्याखालीं गवालिया मैदानावर जमलेल्या लक्षावधि लोकांनीं गर्जना करून असेंच जणूं कांहीं जगाला सांगितलें कीं, आता हिंदी जनतेच्या हृदयात पेटलेली स्वातंत्र्यप्रेमाची ही आग ब्रिटिश सरकारनें काय वाटेल तें जग केलें तरी विझणें अशक्य आहे!

## जनताजनार्दनाचा रुद्रावतार

**तीन** दिवस गवालिया मैदान स्वातंत्र्याच्या वारकऱ्याची पढरी झालेली होती. राष्ट्राच्या स्वातंत्र्ययुद्धांत ज्यांनीं आपलें सवर्स्व बलिदान केलेलें आहे अशा स्वातंत्र्यवीराच्या मुखांतून वाहणारी चैतन्याची चंद्रभागा तीन दिवस तेथें दुथडी भरून वाहत होती. आणि त्या चंद्रभागेच्या तीरावर स्वातंत्र्याच्या नामाचा गजर करीत लक्षावधि अंतःकरणें देहभान विसरून तीन दिवस एकसारखीं थयथय नाचत होतीं. चाळीस कोटी जनता ज्या वैकुंठासाठीं, ज्या मोक्षासाठीं गेलीं साठ वर्षे ब्रिटिश सरकारच्या दारांत धरणें धरून बसली आहे तें स्वातंत्र्याचें वैकुंठच, तो स्वातंत्र्याचा मोक्षपटच जणूं काय त्या ठिकाणीं प्रत्यक्ष उतरलेला आहे असाच तीन दिवस सर्वांना साक्षात्कार होत होता! गेलीं तीन वर्षे स्वातंत्र्यासाठीं राष्ट्रानें आपल्या अश्रूंचें, घर्माचें आणि रक्ताचें जें बलिदान केलें त्या बलिदानानें प्रसन्न झालेल्या परमेश्वरानें त्या तीन

दिवसांत आपलें दैदिप्यमान दर्शन लक्षावधि लोकांना देऊन त्यांच्या डोळ्यांचें जणू काय पारणेंच फेडलें ! पारतन्त्र्यांत रुतलेल्या भारताचा उद्धार करण्यासाठीं जनताजनार्दन लौकरच जो रुद्रावतार धारण करणार आहे त्याचें प्रखर स्वरूप या तीन दिवसांत प्रकट झालें म्हणूनच कीं काय आकाशही लक्षावधि पर्जन्यधारानीं त्या रुद्रावर एकसारखा अभिषेक करीत होतें !

## उद्यांचें स्वातंत्र्ययुद्ध

**अधिवेशनाच्या** तीन दिवसांत जनताजनार्दनाचा रुद्रावतार अनेक वेळां प्रकट झाला असें आतां आम्हीं जें म्हटलें तीं केवळ कविकल्पना नसून तें एक प्रखर सत्य आहे. या तीन दिवसांत भारतीय समितीनें जे प्रस्ताव मान्य केले त्यांमध्यें जनतेच्या भावनेचा हा रुद्रावतार प्रकट झालेला कोणालाही दिसणार नाही. कारण त्या प्रस्तावांची भाषा अत्यंत सौम्य आणि संयमित आहे. तीन वर्षें कॉंग्रेसनें आपले कष्ट, दुःख आणि अपमान ज्या धैर्यानें आणि सहनशीलतेनें गिळून घेतलें, तें धैर्य आणि ती सहनशीलता हे प्रस्ताव लिहितांना कॉंग्रेसनें सोडलेली नाहीं ! तथापि या प्रस्तावाच्या खालीं दडपलेल्या भावनांचा जो दाहक अंगार, जो जळजळीत निखारा, रखरखतो आहे त्याच्या ठिणग्या आणि ज्वाळा या तीन दिवसांत प्रत्येक वक्त्याच्या मुखांतून अगदीं बेधडकपणें बाहेर पडत होत्या ! बेचाळीसचें बंड हा राष्ट्राच्या स्वातंत्र्ययुद्धामधला एक तेजस्वी कालखंड आहे असें सर्व कॉंग्रेसनेत्यांनीं एकमुखानें आतां मान्य केलेलें आहे ! आठ ऑगस्टच्या ठरावांतला एक स्वल्पविराम देखील आम्ही मागें घ्यावयाला तयार नाहीं अशी कॉंग्रेसतर्फे सरदार वल्लभभाईंनी आरोळी ठोकलेली आहे ! एवढेंच नव्हे तर आशिया खंडामधून तुम्हांला हांकलून दिल्यावांचून आम्ही स्वस्थ बसणार नाहीं अशी ब्रिटिश सरकारला त्यांनीं ठणठणीत ताकीदही देऊन ठेवलेली आहे ! निर्मळ स्वातंत्र्य मिळाल्याखेरीज राष्ट्राचें समाधान होणें शक्य नाहीं, परकी राज्यसत्ता या देशांतून उलथून टाकल्याखेरीज जनतेला शांतता मिळणें शक्य नाहीं, स्वातंत्र्याच्या बाबतींत ब्रिटिश सरकार किंवा मुस्लिम लीग यांच्याशीं यापुढें कोणत्याही तऱ्हेचा

' समझौता ' करावयाला कॉंग्रेस तयार नाहीं अशा गर्जना भारतीय समितीच्या व्यासपीठावरून ज्या तीन दिवस उठत होत्या त्याचा अर्थ काय आहे ? त्याचा अर्थ हाच आहे कीं, सामोपचाराची आणि तडजोडीची भाषा जरी कॉंग्रेसच्या तोंडून आज ऐकूं येत असली तरी पुढील स्वातंत्र्ययुद्धाचीं रणशिंगें आणि रणभेऱ्या तिच्या अंतःकरणामध्यें एव्हांपासून वाजूं लागल्या आहेत आणि ब्रिटिश सरकारनें चाळीस कोटि जनतेचें हें राष्ट्र जर ताबडतोब स्वतंत्र केलें नाहीं तर बेचाळीशी बडाच्या बेचाळीसपट घनघोर संग्राम या देशात सुरू करण्याची कॉंग्रेसची हिंमत आहे !

## कॉंग्रेसचें नवें नेतृत्व

**कॉंग्रेसच्या** अंतःकरणात आज काय जळतें आहे हें या तीन दिवसांच्या अधिवेशनात उत्तम तऱ्हेनें व्यक्त झालें. राष्ट्राच्या स्वातंत्र्यासाठीं ज्यांनीं ज्यांनीं आपल्या प्राणाचें बलिदान दिलें, तीं ती मंडळी आज कॉंग्रेसच्या देव्हाऱ्यांतलीं दैवतें होऊन बसलेलीं आहेत ! ' स्वातंत्र्यवीर सुभाषचंद्र बोस ' हे कॉंग्रेसजनाचे आज जीव कीं प्राण होऊन बसलेले आहेत ! त्यांच्या नावाचा उल्लेख जेव्हां जेव्हा होत असे तेव्हां तेव्हा त्याच्या जयजयकारानें सारें सभागृह दणाणून जाई ! शरच्चंद्र बोस याचा जो प्रचंड सत्कार सभाजनानीं केला त्याच्या मागें देखील तीच भावना होती ! जयप्रकाश नारायण, अच्युत पटवर्धन आणि अरुणा असफअली ही कॉंग्रेसमधल्या क्रांतिकारक प्रवृत्तीची त्रैमूर्ति आज प्रत्येक कॉंग्रेस जनाच्या मानसमंदिरात विराजमान झालेली आहे ! त्यांचीं नावें हीं उद्यांच्या क्रांतियुद्धाच्या प्रेरणा आणि घोषणा होऊन बसलेल्या आहेत ! जेव्हां जेव्हां म्हणून त्यांचीं नावें उच्चारलीं जात तेव्हां तेव्हां हजारों कॉंग्रेसजनांच्या अंगावर रोमांच थरारत असत आणि नेत्रांत अश्रू तरारत असत ! हींच, हींच कॉंग्रेसच्या नवीन नेतृत्वाचीं आणि क्रांतिकारक कर्तृत्वाचीं प्रसादचिन्हें होत !

## लालभाई मुर्दाबाद!

गेलें महायुद्ध हें जगांतील फॅसिझमचा विध्वंस करणारें आणि परतंत्र राष्ट्रांना स्वातंत्र्य देणारें 'लोकयुद्ध' आहे असा दंभ माजवून ज्या काळ्या कम्युनिस्टांनीं आठ ऑगस्टच्या कॉंग्रेसच्या भूमिकेला विरोध केला, आणि ब्रिटिश साम्राज्यशाहीचे भाडोत्री हस्तक बनून राष्ट्रीय स्वातंत्र्याशीं द्रोह केला, त्या हिंदी कम्युनिस्ट पक्षाचा या अधिवेशनानें एकमतानें धिक्कार केला! डॉ. सय्यद आश्रफ या कम्युनिस्ट सभासदाला व्यासपीठावर येऊन बोलणेंही जवळजवळ अशक्य झालें. पंडित जवाहरलाल तर बोलतां बोलतां कम्युनिस्टांवर कडाडलेच, "गेलें महायुद्ध ह हिंदी जनतेचें लोकयुद्ध आहे काय? त्या युद्धाला लोकयुद्ध म्हणणाऱ्यांना खराखरच शरम वाटायला पाहिजे! बेचाळीसचें बंड हेंच खरें लोकयुद्ध! त्या वेळीं सरकारी दडपशाहीचा जनतेनें जो सामर्थ्यवान् प्रतिकार केला त्यालाच लोकयुद्ध म्हणावयाला पाहिजे!" तसेंच कम्युनिस्टांचें 'आंतर-राष्ट्रीय' ढोंगही पंडितजींनीं चांगलेंच उघडें केलें. ते म्हणाले, "आंतरराष्ट्रीय वादी होण्याआधीं आपण राष्ट्रवादी व्हावयाला पाहिजे. जगाच्या नकाशांत जोंपर्यंत तुम्हांला स्थान नाहीं तोंपर्यंत आंतरराष्ट्रीयत्वाच्या गप्पा मारण्यांत काय अर्थ आहे? रशियानें आपल्या आंतरराष्ट्रीयत्वाचा बळी देऊन शेवटीं राष्ट्र-वादाचाच स्वीकार नाहीं का केला! राष्ट्र आधीं स्वतंत्र करा मग आंतरराष्ट्री यत्वाबद्दल बोलू" 'पाकिस्तान' मान्य करून मुस्लिम लीगशीं 'समझौता' करा या कम्युनिस्टांच्या आत्मघातकी सूचनेला जवाहरलाल नेहरूंनीं सरळ केराची टोपली दाखविली! मुस्लिम लीगशीं समझौता यापुढें अगदीं अशक्य आहे अशी कॉंग्रेसनें एकमुखानें या अधिवेशनांत आरोळी ठोकली!

## सही लोकमान्य टिळक

वल्लभभाई पटेल आणि जवाहरलाल नेहरू यांनीं हें अधिवेशन गाजविलें आणि जिंकलें असेंच म्हणावयाला हवें. वल्लभभाईंचें व्यक्तिमत्व आणि वक्तव्य पाहून आम्हांला क्षणाक्षणाला लोकमान्य टिळकांची आठवण होई. तोच वर्ण, तीच मूर्ति, तीच मुद्रा, तीच गुर्मी आणि गुरगुर आणि बोलण्याची तीच शैली

आणि तेंच सामर्थ्य! वल्लभभाईंच्या वयाला सत्तर वर्षे होऊन गेलीं हें कोणाला सांगितलें तरी खरें वाटायचें नाही. गेलीं तीन वर्षे तुरुंगामध्यें ते व्याधिग्रस्त होते व अद्यापीहि ते व्याधिमुक्त झालेले नाहींत यावर कोणाचाहि विश्वास बसणें शक्य नाहीं! अंगावर उपरणें पांघरून अगदीं साध्या आणि शुभ्र पोषाखांत हळूहळू पावलें टाकीत ते जेव्हां व्यासपीठावर येत तेव्हां आपलें प्रत्येक पाऊल जणू काय आपण ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या छातीवर टाकीत आहों, असा आविर्भाव त्यांच्या मुद्रेवरून दिसून येत असे. उत्तम हिंदी किंवा उर्दू भाषेत त्यांना बोलता येत नाहीं. तथापि भाषेसाठीं म्हणून ते कुठेंहि अडत नाहींत. त्याचें प्रत्येक वाक्य म्हणजे एकेक घणाचा घाव आहे. श्रोत्यांच्या काळजाचा ठाव घेतल्यावांचून ते राहत नाहींत. कारण, अगदीं सामान्य श्रोत्यांना कळेल अशाच भाषेत आणि अशाच बेतानें ते बोलत असतात. प्रचंड लोकसमुदाया-पुढें राजकारणामधल्या कोणत्याहि कठीण विषयावर सोपें बोलणारा त्यांच्या एवढा सामर्थ्यवान् वक्ता आमच्या पाहण्यांत आज तरी नाहीं. लोकमान्य टिळकांचा राजकीय हजरजबाबीपणा त्यांच्याहि अंगांत आहे. एकदां श्रोते ध्वनियंत्र बिघडलें म्हणून मोठमोठ्यानें ओरडावयाला लागले. तेव्हां वल्लभभाई शांतपणानें म्हणाले, "ज्या वेळीं तुम्ही ओरडावयाला आम्हांला पाहिजे आहे, त्याच वेळीं तुम्ही ओरडा! हें तुमचें ओरडणें वायफळ आहे!" त्याबरोबर श्रोते एकदम चपापले आणि आरडा ओरड शांत झाली. एकदां बोलतां बोलतां ते हसून म्हणाले, "आम्ही सर्व येथें जमलों त्याचा एक हेतु असा होता कीं, आम्हांला डोळ्यांनीं पहावयाचें होतें कीं, आमच्यापैकीं कोण जिवंत आहेत, कोण मेले आहेत, कोण म्हातारे झाले आहेत, कोण थकले आहेत, कोण बाहेर आहेत, कोण भुईखालीं आहेत!" वल्लभभाईंच्या त्या सस्मित सहजोद्गाराच्या आड काळीज पिळवटणारें केवढें कारुण्य धगधगलें आहे हें लक्षांत येताच आमच्या डोळ्यांत पाणी आलें. 'कृतांतकटकामलध्वज जरा दिसों लागली!' हा केकावलींतला श्लोक आपल्या गीतारहस्याच्या प्रस्तावनेच्या आरंभीं देण्यांत लोकमान्यांचा जी भावना होती तीच वल्लभभाईंच्या या भाषणांमध्येंही प्रकट झाली असें आम्हांला वाटलें.

## पाऱ्याप्रमाणें अस्थिर आणि चित्त्याप्रमाणें चपळ

**पंडित** जवाहरलालजींच्या व्यक्तिमहत्त्वाचें आणि वक्तृत्वाचें वैशिष्ट्य अगदीं निराळें आहे. त्यांच्या वयाला छपन्न वर्षें पूर्ण झालीं आहेत किंवा त्याचे सारे केंस आतां रुप्यासारखे पांढरे झालेले आहेत असें सांगणें म्हणजे त्याची बदनामी करण्यासारखें आहे. असें सागण्यानें त्यांचें शब्दचित्र यथा योग्य स्वरूपांत डोळ्यांसमोर उभें राहणें शक्य नाहीं. पंडितजींची शरीरयष्टि अद्यापिही पंचवीस तीस वर्षांच्या तरुणासारखी चपल, लवचिक आणि तेजस्वी आहे लांबून तर त्याचा चेहरा खरोखरच तीस वर्षांच्या तरुणासारखा दिसतो. पंडितजी एका ठिकाणीं कुठें स्थिर बसले आहेत असें दिसणार नाही. घटकेंत ते टणकन् उडी मारून उठतील आणि कुठें तरी घाईघाईनें चालत जातील, क्षणांत ते गुडघ्यावर उभें राहून कोणाशीं तरी बोलतील, क्षणांत ते कोणाचे दंड धरून त्याला हलवतील तर क्षणात ते रागारागानें हातवारे करून कोणाशीं तरी जोरजोरानें बोलताहेत असें लांबून दिसेल ! जातां जातां एकाद्या स्वयंसेवकाच्या अंगावर ते गुरकावतील, तर एकाद्या तरुणाला हंसून ते स्वाक्षरीही करून देतील ! कधी गळ्यात सुताचा हार घालून येतील, तर कधीं हातांत झेंडूच्या फुलाच्या माळाही मिरवीत येतील, त्यांच्या अस्तन्या तर एकसारख्या दंडापर्यंत सांवरलेल्या ! आणि पाठ अर्धवट झुकलेली ! जणू काय हा माणूस कोणाशीं द्वंद्वयुद्ध खेळावयालाच निघाला आहे कीं काय ! ध्वनिक्षेपकाच्या पुढें व्याख्यान देत असतील तेव्हांच हे सद्गृहस्थ एके ठिकाणीं बराच वेळ उभे आहेत असें दिसावयाचें. नाहीं तर एरव्हीं याचा एका जागीं कधीं पत्ताच नसायचा ! पाऱ्याप्रमाणें अस्थिर, वाऱ्याप्रमाणें लहरी आणि ताऱ्याप्रमाणें दूर दूर म्हणजे पंडित जवाहरलाल ! छप्पन्न वर्षांच्या वयाच्या आणि पंधरा वर्षांच्या कारावासाचा जवाहरलालांच्या तारुण्यावर आणि चैतन्यावर यत्किंचितही परिणाम झालेला नाहीं ! एकाद्या रबरी चेंडूप्रमाणें ते उडत

असतात! एकाद्या कारंज्याप्रमाणें ते उसळत असतात आणि एकाद्या चित्त्या-प्रमाणें ते पळत असतात !

## संपूर्ण स्वातंत्र्याशिवाय समाधान अशक्य !

**महात्मा** गांधीजी या अधिवेशनामध्यें येऊं शकले नाहींत हें या अधिवेशनाचें एक मोठेंच वैगुण्य म्हटलें पाहिजे, तथापि आठ ऑगस्टच्या त्याच्या क्रांतिकारक संदेशाचा संचार व्यासपीठावरील प्रत्येक व्यक्तींच्या अंगीं झालेला असल्याकारणानें महात्माजींची अनुपस्थिति इतकी विशेष जाणवली नाहीं. तथापि वायव्य सरहद्दीवरील त्या धिप्पाड नरसिंहाची गर्जना मात्र श्रोत्यांना ऐकण्याची फार इच्छा होती ! स्वातंत्र्यवीर सुभाष बाबूंचा संदेश, पुन्हा त्यांच्या बंधूच्या मुखातून आपल्या कानांवर एकदां पडावा अशी श्रोत्यांना अतिशय तहान लागून राहिली होती! देवी सरोजिनींच्या कोकिळ कंठातून स्वातंत्र्यगीताचा गोड टहुकार आपल्याला ऐकावयाला मिळावा अशी श्रोत्यांना अत्यंत तळमळ वाटत होती ! आणि अध्यक्षस्थानीं असलेल्या त्या 'उर्दू शब्दसृष्टीच्या ईश्वरा'च्या रसवतीचे यापेक्षांही अधिक चेतोहर विलास पहाण्याची सभाजनाना तीव्र पिपासा होती ! पण वेळेच्या अभावीं या गोष्टी शक्य झाल्या नाहींत ! आणि श्रोत्यांच्या आकांक्षा तशाच अतृप्त राहिल्या. "घड्याळ काहीं आमच्या काबूत नाहीं, आणि काटे बघा कसे भरधाव पळताहेत !" किंवा "घड्याळाशीं आमचा सलोखा कितपत आहे हें तुम्हांला ठाऊकच आहे' अशी विनोदी टीका मधून मधून करून राष्ट्रपति श्रोत्यांच्या अपेक्षा विफलतेवर नाजूक फुंकर घालीत होते, म्हणून बरें ! आतां आम्ही बोलून चालून महाराष्ट्रीय पिंडाचे असल्यामुळें या निराशेंत एक शल्य आमच्या मनांत विशेषेंकरून सलत होतें. आणि तें शल्य म्हणजे या तीन दिवसांमध्यें एकही महाराष्ट्रीय विभूति सभाजना-समोर आलेली आम्हांला पहावयाला मिळाली नाहीं ! अखिल भारतीय कीर्तीचा मार्ग इंग्रजीच्या किंवा हिंदुस्थानीच्याच मैदानांतून जातो हें तत्त्व या वेळीं आम्हाला विशेष पटलें. प्रचंड जनसमुदायापुढें इंग्रजी किंवा हिंदुस्थानी भाषेंत प्रभावी वक्तृत्व करण्याचे सामर्थ्य असलेली एकच महाराष्ट्रीय विभूति आम्हांला

माहित आहे ! पण आमच्या दुर्दैवानें ती आज भूमिगत आहे ! ती व्यक्ति जनतेच्या विराट् व्यासपीठावर उभी राहिली असती तर–पण नको–नको तो विचार ! तें शल्य आमच्या मनांत नेहमींच डाचत राहणार ! त्याला कांहीं इलाज नाहीं. चला, झालें तें ठीकच झालें ! अशा तऱ्हेनें भारतीय समितीचें अधिवेशन संपलें ! कॉंग्रेसनें नव्या नेतृत्वाचे नगारे वाजविले ! उद्याच्या स्वातंत्र्ययुद्धाचें रणशिंग कॉंग्रेसनें गवालिया मैदानावर फुंकलें ! हें युद्ध होणें न होणें हें आता केवळ ब्रिटिश सरकारच्या हातात आहे ! कांहीं झालें तरी संपूर्ण स्वातंत्र्यावांचून हिंदी राष्ट्राचें समाधान होणें शक्य नाही ! हाच या अधिवेशनाचा संदेश आहे !



# जयहिंदचा प्रचार करा : : : २

## स्वातंत्र्ययुद्धाची नवी गर्जना

**आठ** ऑगस्ट १९४२ रोजीं महात्मा गांधींनीं 'चले जाव' अशी घोषणा करून ब्रिटिश साम्राज्यशाहीविरुद्ध 'करेंगे या मरेंगे !' असा बंडाचा झेंडा उभारला आणि नऊ ऑगस्टपासून हिंदुस्थानच्या दुसऱ्या स्वातंत्र्य-युद्धाला सुरुवात झाली. पहिलें स्वातंत्र्ययुद्ध १८५७ सालीं झालें होतें हें सर्वांना माहीत आहेच. या दुसऱ्या स्वातंत्र्ययुद्धाचे सेनापति महात्मा गांधी आणि त्यांचे सहकारी वीर यांना सरकारनें बलात्कारानें कारागृहात घातल्या-नंतर त्यांनीं देशांत उघडलेली स्वातंत्र्ययुद्धाची पहिली आघाडी देशांतील असंख्य तरुणांनीं प्राणावर उदार होऊन पुढें चालविली. या स्वातंत्र्ययुद्धाची दुसरी आघाडी नेताजी सुभाषचंद्र बोस यांनीं हिंदुस्थान-बाहेर उघडून 'आझाद हिंद सरकारची' स्थापना केली. ब्रिटिश सरकारचें राज्य या देशातून उलथून टाकण्यासाठीं या देशांतल्या स्वातंत्र्य वीरांनीं आज-पर्यंत जे जे पराक्रम केले, त्या पराक्रमाचा उच्चांक सुभाषचंद्रांनी गाठला ! नेताजी सुभाषचंद्रांच्या 'आझाद हिंद फौजे'त सहस्रावधि हिंदु, मुसलमान, शीख सैनिक स्वयंस्फूर्तीनें दाखल झाले आणि 'जय हिंद ! जय हिंद !' अशा युद्धगर्जना करीत हें सैन्य दिल्लीच्या लाल किल्ल्यावर 'तिरंगी झेंडा' लावण्याच्या निश्चयानें चालून गेलें. महात्मा गांधींच्या सेनापतित्वाखालीं देशांत उघडलेली स्वातंत्र्ययुद्धाची आघाडी यशस्वी करण्यासाठींच नेताजी सुभाषचंद्रांनीं देशाबाहेर तिरंगी झेंड्याखालीं दुसरी आघाडी उभारली आणि आपल्या सैन्यातल्या निरनिराळ्या पलटणींना 'गांधी पलटण',

'नेहरू पलटण' अशीं नावें दिलीं. देशाच्या स्वातंत्र्यासाठीं नेताजी सुभाषचंद्र आणि आझाद सैनिक यांनीं पराक्रमाची आणि बलिदानाची जी शर्थ केली, त्यामुळें या देशांतील कोट्यवधि जनतेचे डोळे दिपून गेलेले असून कॉंग्रेसच्या यापुढील स्वातंत्र्यलढ्याला त्यामुळें एक विलक्षण सामर्थ्य आणि चैतन्य प्राप्त करून दिलेलें आहे. म्हणूनच 'आझाद हिंद सैनिकां'च्या संरक्षणासाठीं कॉंग्रेसचे नेते सर्वांच्या पुढें दिल्लीला धांवून गेलेले आहेत आणि 'चलो दिल्ली' व 'जय हिंद' या आझाद सैनिकांच्या देदीप्यमान् युद्धघोषणांचा कॉंग्रेस नेत्यांनीं मोठ्या हर्षानें स्वीकार केलेला आहे. देशाच्या स्वातंत्र्यासाठीं नेताजी सुभाषचंद्र व आझाद सैनिक यानी जें बलिदान केलेलें आहे, त्याबद्दल अखिल राष्ट्रानें आपला आदर, प्रेम आणि कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी त्याच्या या युद्धगर्जना आपल्या हृदयात, कंठात आणि ओंठात निनादविल्या पाहिजेत. थोड्याच काळानें सुरू होणाऱ्या आपल्या तिसऱ्या स्वातंत्र्ययुद्धाची सिद्धता करण्यासाठीं याच युद्धगर्जनांनी आपण आपलें सामर्थ्य आणि स्फूर्ति एव्हा-पासून संघटित केली पाहिजे. राष्ट्राच्या दैनंदिन जीवनात 'जयहिंद' आणि 'चलो दिल्ली' या गर्जनांचा जेवढा प्रचार होईल तेवढा आपण करण्याचा यापुढें प्रयत्न केला पाहिजे. ह्या कल्पनेनें आम्ही स्वातंत्र्यप्रेमी जनतेपुढें पुढील योजना ठेवतों :

(१) 'आझाद हिंद सैनिक' परस्परांना जेव्हा भेटत तेव्हां 'जय हिंद' असें म्हणून ते परस्पराना अभिवादन करीत असत. तसें 'जय हिंद' हें अखिल हिंदी राष्ट्राचें आतां 'अभिवादन' व्हावयाला पाहिजे. यापुढें रोजच्या व्यवहारांत एकाद्याला भेटताना वा त्याचा निरोप घेतांना 'जयहिंद' असें म्हणण्यांत यावें. 'राम राम' 'सलाम अले कुम' 'खुदा हाफीज' 'नमस्कार' 'नमस्ते' 'जय जय' 'जय गोपाळ' 'जोहार' 'गुड मॉर्निंग' वा 'गुड इव्हिनिंग' हीं अभिवादनें यापुढें स्थगित करण्यात यावींत. 'आझाद सैनिकां'त सर्व धर्माचे सैनिक होते हें लक्षांत ठेवून या देशातील हिंदु–मुस्लिम–शीख–ख्रिस्ती बांधवांनी 'जय हिंद' असें अभिवादन निःसंकोचपणें करीत जावें.

(२) **'वंदे मातरम'** चें राष्ट्रीय महत्त्व सर्वांना माहीत आहे. तथापि, 'वंदे मातरम्' पक्षांही 'जय हिंद' चें सामर्थ्य अधिक आहे. 'आईला जयजयकार असो' असें म्हणणें अधिक श्रेष्ठ मातृभक्तीचें लक्षण आहे. म्हणून यापुढें जेथें 'श्रीगणेशाय नमः' किंवा 'वंदे मातरम्' लिहिण्याचा आपला परिपाठ आहे तेथें तेथें 'जय हिंद' असें लिहिण्यांत यावें.

( ३ ) **पत्राची** सुरुवात यापुढें 'कृतानेक साष्टांग नमस्कार,' 'रामराम विनाति विशेष,' 'सप्रेम नमस्कार' अशी न करतां 'जय हिंद आपलें पत्र पोंहोंचलें' इत्यादि अशीं शब्दांनीं करीत जावी. पत्राच्या अखेरीस माझा 'जय हिंद अमक्या अमक्याला कळवा' असें लिहीत जावें.

( ४ ) **लग्नाच्या**, मुंजीच्या, समारंभाच्या, आमंत्रणाच्या किंबहुना सार्वजनिक स्वरूपाच्या सर्व पत्रिकांच्या शिरोभागीं 'जय हिंद' असेंच लिहिण्यात यावें.

( ५ ) **सार्वजनिक** व्याख्यानाचे वेळीं वक्ता व्याख्यानास उभा राहतांच सर्व श्रोत्यानीं 'जय हिंद ! जय हिंद !' अशा गर्जना कराव्यात आणि व्याख्यान संपावयाचे वेळीं व्याख्यात्यानें 'जय हिंद ! जय हिंद !' असें म्हणून आपल्या व्याख्यानाचा समारोप करावा

( ६ ) **राष्ट्रीय सेवादल,** राष्ट्रीय स्वयंसेवक संघ, हिंदुस्तानी सेवादल, बालवीर पथकें, लोकसेना अशा ज्या निरनिराळ्या स्वयंसेवकांच्या संघटना देशात आहेत, त्यानी 'जय हिंद' या अभिवादनाचा आतां स्वीकार करावा. 'नमस्ते' च्या ऐवजीं 'जय हिंद' म्हणत जावें.

( ७ ) **शाळेमध्यें** आणि कॉलेजमध्यें विद्यार्थ्यांनीं पहिल्या तासाला शिक्षक जेव्हां वर्गात येतील तेव्हा एकदम उठून 'जय हिंद' म्हणावें. शिक्षकांनींहि 'जय हिंद' असें म्हणून मगच खुर्चीवर बसावें. शेवटच्या तासालाहि वर्गांतून उठतांना विद्यार्थ्यांनीं 'जय हिंद' असें म्हणावें, आणि शिक्षकांनीं 'जय हिंद' असें प्रत्याभिवादन करून मग वर्गाबाहेर पडावें.

( ८ ) '**जय हिंद**' हें नाव असें आहे कीं, तें मुलाना आणि मुलींनाहि ठेवता येण्यासारखें आहे. 'कुमारी जय हिंद जोशी' किंवा 'कुमार जय हिंद जोगळेकर' असें म्हणता येण्यासारखें आहे

( ९ ) **गोष्टी**, कादंबऱ्या, नाटकें यांच्या लेखकांनीं यापुढें आपल्या कृतींमधील पत्राच्या तोंडीं 'जय हिंद' असेंच अभिवादन घालण्याची प्रथा सुरू करावी. रंगभूमीवरचें एकादें पात्र 'जय हिंद' म्हणावयास विसरलें, तर 'प्रेक्षकां'नीं त्याला त्या गोष्टीची आठवण देऊन 'जय हिंद' म्हणावयाला लावावें.

( १० ) **अशा** अनेक तऱ्हेनें 'जय हिंद' चा प्रचार साऱ्या राष्ट्रामध्यें करतां येण्यासारखा आहे. मात्र कोणत्याहि तऱ्हेनें 'जय हिंद' ची अप्रतिष्ठ होईल असा त्याचा उपयोग न होईल, अशी प्रत्येकानें काळजी घ्यावी.

( ११ ) **आमच्या** या योजनेप्रमाणें ज्या ज्या गावामधून, संस्थामधून कॉलेजामधून, शाळामधून आणि दलामधून 'जय हिंद' चा प्रचार होईल; त्यानीं त्यानीं त्याचीं वृत्तें आमच्याकडे पाठविल्यास आम्ही तीं 'नवयुग' मधून मोठ्या आनंदानें छापूं. 'जय हिंद' चा प्रचार करण्याचे कामीं सर्व वृत्तपत्रानीं आणि व्याख्यात्यानीं पुढाकार घ्यावा आणि नेताजी सुभाषचंद्रांच्या स्वातंत्र्य युद्धाची गर्जना देशाच्या कानाकोपऱ्यापर्यंत पोंहचविण्याचें पुण्य संपादन करावें अशी आमची नम्र विनति आहे.

जयहिंद ! जयहिंद !! जयहिंद !!!



# स्वातंत्र्याचा झगडा टळत नाहीं : : : ३

साडेसहा वर्षांपूर्वी युरोपमध्यें साम्राज्यशाही राष्ट्रांचे भयंकर महायुद्ध सुरू झालें. हें युद्ध म्हणजे जगाच्या स्वातंत्र्यावरचें एक महान् संकटच होतें. मानवजातीच्या भवितव्यावर आलेलें तें एक भयंकर गंडांतर होतें नाझी हुकूमशाहीविरुद्ध लढणारीं दोस्त राष्ट्रें तोंडानें नुसतीं म्हणत होतीं कीं, आम्ही जगाच्या स्वातंत्र्यासाठीं लढतों आहोंत, आम्ही जगांत शाश्वत लोकशाही स्थापन करण्यासाठी झगडतों आहोंत ! तथापि नाझींच्या हुकूमशाहींत आणि दोस्तांच्या 'लोकशाहीं'त तत्त्वतः कांहींच भेद नव्हता. जगाचें सार्वभौमपद जिकण्याचा तो सर्व गोऱ्या राष्ट्रांचा प्राणांतिक झगडा होता. हे सत्य त्या वेळीं केवळ महात्मा गांधी आणि कॉंग्रेस यांनीच ओळखलें. म्हणून केवळ हिंदुस्थान देशाच्याच नव्हें तर जगातील सर्व गुलाम राष्ट्रांच्या स्वातंत्र्यासाठीं कॉंग्रेसनें त्या वेळीं आरोळी ठोकली आणि ढोंगी ब्रिटिश साम्राज्यशाहीविरुद्ध युद्ध पुकारलें. जगाच्या साऱ्या इतिहासांत एवढ्या धैर्याचें, एवढ्या पराक्रमाचें आणि एवढ्या सात्त्विक भावनेचें उदाहरण कोणालाहि काढून दाखवितां येणार नाही ! सर्व जगाला आग लागली असतांना हिंदी राष्ट्राला आपल्या गुलामगिरीची आठवण झाली नाही, त्याला मानवजातीची गुलामगिरी प्रथम आठवली. खरोखर ही अतिमानुष कोटीमधलीच गोष्ट आहे ! स्वर्गातल्या देवांनीं त्यावेळीं हिंदुस्थानांतील जनतेवर खरोखरच पुष्पवृष्टि केली असली पाहिजे ! सहा वर्षें सारें जग रक्ताच्या महापुरामध्यें बुडून मरणोन्मुख झालें असतांना, मानवजातीच्या स्वातंत्र्याचें चिमुकलें निशाण जगामध्यें केवळ कॉंग्रेसनेंच फडफडत ठेवलेलें होतें ! या युद्धात जर्मनी आणि जपानसारखीं प्रचंड राष्ट्रें जमीनदोस्त झालीं. विजयी-

ब्रिटिश साम्राज्यशाही देखील खिळखिळीत होऊन मोडकळीला आली ! पण या दिव्यामधून कॉंग्रेस नुसतीच जिवत बाहेर आली नाहीं. तर तिचें तेज आणि सामर्थ्य पूर्वीपेक्षां अनंत पटींनीं वाढलेलें आहे. आज साऱ्या जगाचें लक्ष तिच्यावर खिळून बसलें आहे. कॉंग्रेसचा लढा हा सत्याचा लढा होता, हा न्यायाचा आणि नीतीचा लढा होता, म्हणूनच या साडेसहा वर्षांच्या वनवासामधून ती सहीसलामत बाहेर येऊं शकली !

**हिंदी** स्वातंत्र्याचें युद्ध गेलीं साडेसहा वर्षे कॉंग्रेस जिवावर उदार होऊन लढत आहे. बेचाळीस साली महायुद्धाचा फास ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या नरड्याला लागून तिचे डोळे अक्षरशः पांढरे होण्याची वेळ आली होती, तरी तिच्या तोंडून स्वातंत्र्याचा ‘ स्व ’ देखील निघेना; म्हणून ‘ चालते व्हा या देशांतून ! ’ अशी सात्त्विक क्रांतीची घोषणा महात्माजींना पुकारावी लागली ! त्या घोषणेचे पडसाद साऱ्या देशभर निनादले ! महात्माजींच्या त्या हाकेला लक्षावधि वीरांनीं साद दिली ! ब्रिटिशांना या देशामधून हाकलून देण्यासाठीं सारी जनता सिद्ध झाली ! देशामधून, देशाबाहेरून, प्रकाशातून, अंधारामधून ब्रिटिश साम्राज्याच्या शेंकडों मर्मांवर प्रहार आणि आघात होऊं लागले. ब्रिटिश साम्राज्यशाही आतां मरते आहे का जगते आहे, अशीं या देशांत स्थिति होऊन गेली. या निर्वाणीच्या झगड्यात शेंकडों मुलांनीं, तरुणांनीं, स्त्रियांनीं आणि पुरुषांनीं आपल्या प्राणांचे बळी दिले ! जगामधल्या पराक्रमाचे आणि त्यागाचे सर्व उच्चांक मोडले गेले ! खरोखर, भारतीय स्वातंत्र्याच्या युद्धांत हें बेचाळीसच्या आंदोलनाचे पर्व अद्वितीय आणि दिव्य म्हणूनच गणले जाईल, याविषयीं मुळींच शंका नाहीं ! गेलीं चार वर्षे ब्रिटिश साम्राज्यशाहीशीं निकरानें लढतांना हिंदी राष्ट्रानें ज्या हालअपेष्टा, ज्या यातना, जें दुःख आणि जें दैन्य सहन केलें, त्याला जगाच्या इतिहासांत तुलना नाहीं ! पस्तीस लाख लोक भुकेनें तडफडून तडफडून मरतांना त्याला उघड्या डोळ्यानीं पहावें लागलें. महागाईमुळें आणि काळ्या बाजारामुळें कोटयवधि कंगाल जनता जनावरांचें जिणें जगत असतांना त्याला मुकाट्यानें पाहणें भाग पडलें ! देशामधले हजारों स्वातंत्र्यवादी वीर जुलमानें आणि दडपशाहीनें तुरुंगांत घालून सरकारनें

देशांतील न्यायाचा आणि कायद्याचा दिवसाढवळ्या खून केला तरी तें त्याला सहन करावें लागलें. हिंदी राष्ट्रानें 'चले जाव'ची आपली घोषणा मुकाट्यानें परत घ्यावी आणि नाक मुठीत धरून आपल्याला शरण यावें म्हणून ब्रिटिश सरकारनें जंग जंग केलें आणि आकाशपाताळ हालवून सोडलें. पण 'पूर्ण स्वातंत्र्य' मिळविण्याच्या निर्धारानें लढत असलेलें हिंदी राष्ट्र ब्रिटिशाना अणुमात्रही शरण गेलें नाहीं. किंबहुना जगांतील महायुद्धाचा वणवा विझल्यानतर हिंदी राष्ट्राच्या स्वातंत्र्ययुद्धाला अधिकच रौद्र स्वरूप प्राप्त झालें! आझाद् हिंद् वीराच्या स्तोत्रानी आणि जयजयकारानी दाही दिशा निनादून गेल्या. नेताजी सुभाषचंद्रांच्या जयघोषानें तर आभाळ खालीं कोसळतें आहे कीं काय असें वाटूं लागलें! कायदेमडळाच्या निवडणुकी झाल्या. त्यांचा निर्णयही देशामधल्या आम जनतेनें सरकारला 'चले जाव' असाच दिला! तुरुगाचे दरवाजे उघडले गेले! हजारों युद्धकैदी गर्जत बाहेर आले. त्यानींहि 'चले जाव'च्या आरोळ्या गगनापर्यंत नेऊन भिडविल्या! आणि चव्वेचाळीस महिने दऱ्याखोऱ्यांत दडून सरकारला 'दे माय धरणीं ठाय' करून सोडणारे क्रातिकारक भूमिगत जेव्हां बाहेर आले तेव्हां देशाच्या या सीमेपासून त्या सीमेपर्यंत आणि या कोंपऱ्यापासून त्या कोपऱ्यापर्यंत स्वातंत्र्याचा जो प्रचड गदारोळ उठला त्यामुळें ब्रिटिश साम्राज्यशाही पायापासून डोक्यापर्यंत थरथर कापू लागली! तिची मनोमन खात्री पटली कीं, जनतेच्या स्वातंत्र्यलढ्याला आतां अधिक विरोध करण्याच्या भानगडींत आपण पडलो तर आपली या देशात यापुढें कांहीं धडगत नाहीं! गेल्या तीस वर्षांमध्यें दोनदा झालेल्या महायुद्धामध्यें आपली साम्राज्यशाही कशीं तरी यशस्वी होऊं शकली. पण आतां जर का जगात पुन्हां तिसरें महायुद्ध कांहीं कारणांमुळें सुरू झालें तर आपलें साम्राज्य औषधाला देखील पृथ्वीतलावर शिल्लक राहणार नाहीं याबद्दल ब्रिटिशांची आतां मनोमन खात्री होऊन चुकलेली आहे. हिंदी जनतेशीं दोस्ती केल्यावांचून यापुढें जगात आपला निभाव लागणार नाहीं, हिंदी जनतेच्या साहाय्यावाचून आणि सद्भावनेवांचून आपणाला या जगांत जिवंत राहतां येणें अशक्य आहे, हें ब्रिटिशांना आतां पक्कें कळून चुकलें आहे. म्हणूनच "आम्ही जातों, तुमचें

राज्य तुम्ही सांभाळा ! " असे शब्द ब्रिटिश साम्राज्यशाहीचे मुख्य प्रधान ॲटली याच्या तोंडून जाहीरपणें पार्लमेंटमध्यें प्रथम बाहेर पडले !

" **ब्रिटिश** साम्राज्यशाहीचें दिवाळें पुकारावयाला काही मी मुख्य प्रधान झालों नाही ! " असे मगरूर उद्गार ज्या खुर्चीवर बसून मदांध चर्चिलनें काहीं दिवसांपूर्वी काढलेलें होते, त्याच खुर्चीवरून काळानें चर्चिलला गचांडी मारून उठविले आणि त्याच्या जागीं ॲटलींला बसवून त्याच्या मुखानें हिंदी स्वातंत्र्याची, म्हणजेच ब्रिटिश साम्राज्याच्या दिवाळ्याची, घोषणा करविली आणि ती चर्चिलला कान उघडे ठेवून ऐकावयाला लावली ! हा ब्रिटिश साम्राज्यशाहीवर काळानें उगविलेला एक विलक्षण सूड आहे यात शंका नाहीं पंधरा मार्च रोजी पार्लमेंटमध्यें मुख्य प्रधान ॲटली यानीं केलेली घोषणाही ब्रिटिश साम्राज्यशाहीनें हिंदी स्वातन्त्र्याला दिलेली पहिली मान्यता होय ! गेलीं साडेसहा वर्षें जिवावर उदार होऊन चालविलेल्या स्वातन्त्र्ययुद्धामध्यें हिंदी राष्ट्रानें मिळविलेला हा पहिला घवघवीत विजय होय ! बेचाळीसच्या ऑगस्टमध्यें जनतेचे पूज्य पुढारी आणि कार्यकर्ते सरकारनें जबरदस्तीनें तुरुंगात घातले, तेव्हापासून आतापर्यंत जवळजवळ साडेतीन वर्षें देशांतील राजकारण अडून बसलेलें आहे असें बाह्यात्कारीं तरी सर्वांना दिसत होतें. राजकारणाचा डाव असा कुजवून ठेवल्याचें सारें खापर जो तो कॉंग्रेसच्याच डोक्यावर फोडीत होता. क्रिप्स, योजना झिडकारण्यामध्यें कॉंग्रेसनें अत्यंत अक्षम्य अशी घोडचूक केली, असेंच अनेकजण ओरडत होते. 'चले जाव'ची चळवळ अपेशी ठरली आणि कॉंग्रेसचा या लढ्यांत सपशेल पराभव झाला ' असा गिल्ला कॉंग्रेसचे मूर्ख मित्र आणि पाजी शत्रू यानीं गेलीं साडेतीन वर्षे एकसारखा करून कॉंग्रेसचें डोकें अगदी भंडावून सोडलें होतें ! या बाबतींत कॉंग्रेसचे प्रामाणिक टीकाकारही कॉंग्रेसचे कट्टर शत्रू बनले होते. जीनाबरोबर वाटाघाटी करावयाला महात्माजी आपण होऊन गेले, किंवा पहिल्या सिमला परिषदेमध्यें कॉंग्रेसनें व्हाईसरॉयसाहेबांचें पुढारीपण पत्करून मोठ्या उत्सुकतेनें भाग घेतला याचा अर्थ कॉंग्रेस ही ब्रिटिश सरकारला किंवा स्वातन्त्र्यविरोधी मुस्लिम लीगला नाक मुठींत धरून आतां शरण गेली असा करून अनेक टीकाकारांनीं कॉंग्रेसची वाटेल तशी

बदनामी केली. कॉंग्रेस मवाळ झाली, कॉंग्रेस म्हातारी झाली, सरकारशीं लढण्याचें सामर्थ्य कॉंग्रेसमध्यें आतां राहिलें नाहीं, असें ज्याला जें जें म्हणून काही सुचेल तें तें त्यानें कॉंग्रेसला बोलून घेतलें. तथापि, पधरा मार्च रोजीं ॲटली यांनीं पार्लमेंटमध्यें हिंदी स्वातंत्र्याची जी प्रथम निःसंदिग्ध घोषणा केली तिच्यामुळें कॉंग्रेसच्या आजपर्यंतच्या सर्व टीकाकारांच्या आणि विरोधकांच्या बत्तिशा सपशेल बाहेर आल्या ! ॲटलीची स्वातंत्र्यघोषणा हा कॉंग्रेसच्या 'चले जाव' चळवळीचा विजय होय ! 'स्वराज्य' हा शब्द उच्चारल्याबद्दल ज्या देशातल्या माणसांना सरकार एक वेळ कारागृहात धाडीत होतें, त्या देशाला आम्ही 'स्वातंत्र्य' [INDEPENDENCE] देणार असें सांगण्याची त्याच सरकारच्या मुख्य प्रधानावर पाळी यावी हा कॉंग्रेसच्या 'चले जाव' राजकारणाचा विजय होय ! आम्ही हिंदुस्थानला स्वातंत्र्य देतों, असें नुसतें तोंडानें म्हणून मुख्य प्रधान स्वस्थ बसले नाहींत तर त्या स्वातंत्र्याची सर्व सिद्धता करून देण्यासाठीं त्यानीं तीन मंत्र्यांचें एक शिष्टमंडळही तावडतोब या देशामध्यें रवाना केलें !

**दोन** महिन्यापूर्वीं ब्रिटिश सरकारचें हें त्रिमंत्रिमंडळ या देशामध्यें आलें आणि तेव्हापासून देशातल्या निरनिराळ्या राजकीय पक्षांच्या नि पुढाऱ्यांच्या सल्ल्यानें आणि सहाय्यानें हिंदी स्वातंत्र्याची सर्वमान्य योजना तयार करण्याच्या कामीं या शिष्टमंडळानें जिवापाड श्रम घेतले, ही गोष्ट आतां सर्वांना माहित आहे. या शिष्टमंडळाचें स्वागत आणि सत्कार देशातील सर्व जातींच्या आणि धर्मांच्या जनतेनें उत्तम तऱ्हेनें केलें. महात्मा गांधी आणि कॉंग्रेसचे प्रमुख पुढारी यानीं तर या शिष्टमंडळाची इतकी उत्तम प्रसिद्धी केली कीं, सांगतां सोय नाहीं. शिष्टमंडळामधले तिन्ही शिष्ट प्रामाणिक आहेत, त्यांचे हेतु फार चांगले आहेत, ते तिघेही अतिशय सभ्य आहेत, सज्जन आहेत; या देशाला स्वातंत्र्य देण्याचें खरोखरच त्यांच्या मनात आहे, या देशाला स्वातंत्र्य दिल्याखेरीज आपण स्वदेशाला जाणारच नाहीं अशी शपथ घेऊनच ते इकडे आले आहेत, तेव्हां त्यांच्या हेतूबद्दल कोणीही संशय घेऊ नये आणि त्यांच्या प्रयत्नावर सर्वांनीं विश्वास ठेवावा, असें देशांतील बहुतेक सारे पुढारी जनतेला

पुन्हां पुन्हां आर्जवानें आणि बजावून सांगत होते. ब्रिटिश सरकारच्या कोणत्याही शिष्टमंडळाबद्दल सद्भावनेचें इतकें अनुकूल वातावरण या देशांतल्या जनतेमध्यें आजपर्यंत कधींही त्यापूर्वीं निर्माण झालें नसेल! शिष्टमंडळाच्याही लक्षांत ही गोष्ट आल्यावांचून राहिली नाहीं. कोणतेंही पूर्वग्रह किंवा गैरसमज मनांत बाळगून, किंवा कोणतीही पूर्वनिश्चित योजना खिशांत घालून आपण या देशांत आलों नाहींत असें जनतेला त्यानीं अनेक वेळां आश्वासून आणि आर्जवून सांगितलें. शिष्टमंडळाचया कार्याचा आरंभ अत्यत उत्तेजक वातावरणांत झाला. तथापि भेटी आणि मुलाखती यांच्यामध्यें शिष्टमडळाचा एक महिन्यावरही अधिक काळ जाऊन या सर्व शिष्टाईमधून निश्चित बाहेर काय येणार याबद्दल जेव्हां जनतेला शंका वाटूं लागली, तेव्हां देशामध्यें निराशेचें वातावरण हळूहळू पसरूं लागलें. किंबहुना देशाच्या स्वातंत्र्याची योजना तयार करण्यासाठी म्हणून आलेले शिष्टमडळ पाकिस्तानच्याच चाकोरींत अडकून पूर्वींच्याच सिमला परिषदेची पुनरावृत्ति होते किंवा काय असें पुष्कळांना भय वाटूं लागलें. अखंड हिंदुस्थानच्याच प्रश्नावर वाटाघाटीचें सर्व गाडें अडून बसलें. काँग्रेस आणि मुस्लीम लीग यांना पाहिल्या सिमला परिषदेनंतर पुन्हां एका टेबला-भोंवतीं एकत्र आणणें ही गोष्ट जवळ जवळ अशक्यप्रायच समजली जात होती. ' पाकिस्तान 'चें तत्त्व आधीं मान्य केल्यावांचून मुस्लिम लीग कांहींही बोला-वयाला तयार नव्हती! तर अखंड हिंदुस्थानच्या आपल्या ध्येयापासून एक तसूभरही मागें सरावयाला काँग्रेस कबूल नव्हती. अशा दुर्धर परिस्थितींत शिष्ट-मंडळानें काँग्रेस आणि लीग यांच्या प्रतिनिधींना एकत्र आणलें आणि त्याच्यांत तडजोड घडवून आणण्याची पराकाष्ठा केली! दोन्हीही पक्षांनीं, परस्परांना जास्तींत जास्त सवलती आपणांला काय देतां येतील हें शिष्टमंडळाला समजा-वून सांगितलें. तथापि दोघांमध्यें संपूर्ण मतैक्य होणें अशक्य आहे असेंच शेवटीं शिष्टमंडळाला आढळून आलें. वादाचा प्रश्न पंचाकडे सोंपवावा असाही तूट निघाला. जीनांनीं आधीं तें मान्य केलें, पण मागाहून त्यांनींच कोलांटी उडी खाऊन त्या गोष्टीला सपशेल नकार दिला. झालें! वाटाघाटी फिसकटल्या! यानंतर पुढें तडजोडी चालविणें अशक्य झालें. पुन्हां देशामध्यें निराशेची लाट

उठली ! 'या परिषदेचा असा बोजवारा वाजणार असें आम्ही मागेंच सांगत होतों' अशी भाषा बोलणारे 'अकलेचे खदक' ज्योतिषी यशस्वी ठरणार असा रंग दिसू लागला. कॉंग्रेसचा झगडा टळत नाहीं. सरकारनें कोणाला पकडावयाचें यांच्या याद्या देखील एव्हांपासून तयार करून ठेवल्या आहेत, अशा बातम्या आधींपासून उठत होत्या; त्या खऱ्या आहेत असेंच या वेळीं सर्वांना वाटू लागलें !

**आतां** शिष्टमंडळाची खरी कसोटी होती. मुख्य प्रधान ॲटली यांच्या पंधरा मार्चच्या घोषणेची अब्रू सांभाळण्याची जबाबदारी तर त्यांच्यावर होतीच; पण त्याखेरीज त्यांनीं आपल्या सद्भावनेची आणि सद्धेतूंची जी स्तुति गेले दोन महिने जनतेकडून फुकटाफाकट करवून घेतली होती, त्या स्तुतीचा आणि ती स्तुति करणाराचा बोजही शिष्टाचाराला अनुसरून राखणें त्यांना भागच होते. जवळ जवळ दोन महिने तोंडाला कुलूप लावून जनतेच्या सहनशीलतेचा, अत पाहणाऱ्या या शिष्टमंडळाला शेवटीं सोळा मे या दिवशीं, आपल्या मौनाचें पारणें सोडावें लागलें. त्या दिवशी शिष्टमंडळानें आपली योजना जाहीर केली.

**या** योजनेमध्यें पहिली आणि अत्यत महत्त्वाची गोष्ट म्हणजे शिष्टमंडळानें पाकिस्तानला नकार दिला आणि मुस्लिम लीगच्या म्हणण्याप्रमाणे देशाची राजकीय फाळणी करण्याचें साफ नाकारलें. **सर्व देशाचें आणि संस्थानांचें मिळून एक संयुक्त सार्वभौम राज्य स्थापन करण्यांत यावें असें शिष्टमंडळानें आपलें स्पष्ट मत दिलें आहे. मुस्लिम लीगच्या अनुयायांखेरीज, देशांतील सारी जनता, ही अखंड हिंदुस्थानाची पुरस्कर्ती आहे. हें शिष्टमंडळानें निःसंदिग्धपणें मान्य केलें, हें अतिशयच उत्तम झालें.** पाकिस्तानची कल्पना कां मान्य करतां येत नाहीं, याविषयीं शिष्टमंडळानें जो कोटिक्रम केलेला आहे, तो बिनतोड आहे. प्रत्येक मठ्ठ हिंदुसभावाद्यांनीं तो भाग मुखोद्गत करून रोज सकाळीं संध्येप्रमाणें म्हणावा, असा आहे. हिंदुस्थानामध्यें एकदर मुस्लिम लोकसंख्या किती यावर

प्रकाश टाकून मुस्लिम लीगवाल्याची थापेबाजी शिष्टमंडळानें उजेडांत आणली हें उत्तम केलें. **देशांत दहा कोटी मुसलमान आहेत, अशा बेगुमान थापा जीना देखील आजपर्यंत मारीत होते.** तथापि १९४१ च्या खानेसुमारीप्रमाणें पंजाबात एक कोट चासष्ट लक्ष, सरहद्द प्रांतांत सत्तावीस लक्ष, सिंधमध्यें बत्तीस लक्ष, बलुचिस्तानात चार लक्ष, बंगालमध्यें तीन कोट तीस लक्ष, आसाममध्यें चौतीस लक्ष आणि बाकीच्या साऱ्या हिंदुस्थानांत दोन कोट, अशी मुसलमानाची लोकसंख्या आहे. म्हणजे, **एकूण सबंध हिंदुस्थानांत सात कोटी, नव्वद लक्ष मुसलमान आहेत. तेव्हां आतां तरी हे मुस्लिम लीगवाले दहा कोटी मुसलमान असल्याच्या थापा मारावयाचें सोडून देतील, अशी आशा आहे.**

**पाकिस्तान** दिल्यानें देशांतील अल्पसंख्याकाचा प्रश्न मुळींच सुटत नाहीं. पंजाब, सरहद्द, सिंध, बलुचिस्तान या विभागांत बासष्ट टक्के मुसलमान तर अडतीस टक्के इतर, आणि बंगाल–आसामांत, साडेएकावन्न टक्के मुसलमान व साडे अठ्ठेचाळीस टक्के इतर ! उरलेल्या हिंदुस्थानांत नऊ टक्के मुसलमान आणि एक्याण्णव टक्के इतर ! पाकिस्तान मागतांना. मुस्लिम लीगवाले जो कांहीं कोटिक्रम वापरतात तो सर्वच्या सर्व पाकिस्तानमधल्या अल्पसंख्याकानाही सबतासुभा काढून द्यावा हें सिद्ध करण्याला उपयोगी पडतो, हें शिष्टमंडळाला आढळून आलें. बरें, केवळ बहुसंख्य मुस्लिम जनतेच्या विभागापुरतें पाकिस्तान मर्यादित करावें तर असलें चतकोर दरिद्री पाकिस्तान मुस्लिम लीगवाले पत्करावयाला तयार नव्हते. कारण मग त्या पाकिस्तानांतून पूर्वेला अंबाला, जालंधरसारखे संपन्न विभाग आणि पश्चिमेला सर्व आसाम आणि कलकत्ता शहरांसकट पश्चिम बंगाल हे विभाग वजा करावे लागतात ! शिवाय, पंजाब आणि बंगालसारख्या तेजस्वी इतिहासपरंपरा आणि संस्कृति असलेल्या प्रांतांची फाळणी करणें हें तेथील जनतेच्या हिताविरुद्ध आहे, हें शिष्टमंडळाला स्पष्टपणें दिसून आलें. आर्थिक आणि लष्करी दृष्टयाही देशाची फाळणी करणें शक्य नव्हतें. दळणवळण, टपाल, तार हीं खातीं अखंड हिंदुस्थानच्या दृष्टीनेंच आरंभापासून सुरू करण्यांत आलीं होतीं. शिवाय लष्करी संरक्षणाच्या दृष्टीनें पाकिस्तानचे विभाग हे अत्यंत

अपुरे आहेत असेंच शिष्टमंडळाचें मत पडलें. त्याखेरीज दोन पाकिस्तानामध्यें सातशें मैलांचे अंतर आहे आणि या दोन पाकिस्तानामधलें दळणवळण हें सर्वस्वीं 'हिंदु-स्थान'च्याच मर्जीवर अवलंबून राहील. या सर्व आक्षेपांचा आणि दोषांचा विचार करून शिष्टमंडळानें पाकिस्तानला मूठमाती देऊन टाकली आणि अखंड हिंदुस्थानाचा पुरस्कार केला !

**शिष्टमंडळाच्या** या योजनेंत एकंदर सहा महत्त्वाचीं कलमें आहेत. तीं अशीं:

**( १ ) सर्व** हिंदुस्थानाचें आणि संस्थानांचें मिळून एक संघराज्य असावें. या संघराज्याच्या हातीं परराष्ट्र, संरक्षण आणि दळणवळण अशीं तीनच खातीं असावींत. या तीन खात्यांना लागणारा पैसा उभारण्याचा संघ-राज्याला अधिकार असावा.

**( २ ) या** संघराज्याला एक कार्यकारी मंडळ आणि एक कायदेमंडळ असावें. या मंडळात खालसा आणि संस्थानी प्रजेचे प्रतिनिधि असावेत. जातीय महत्त्वाचा कोणताहि प्रश्न ठरविण्यास हिंदु आणि मुसलमान या दोन जमातीं-पैकीं प्रत्येकीच्या बहुमताची आवश्यकता असावी.

**( ३ ) संघराज्याकडे** जीं खातीं आणि अधिकार आहेत त्यांखेरीज बाकीचीं सर्व खातीं आणि शेषाधिकार प्रांतांच्या ताब्यांत राहावेत.

**( ४ ) संस्थानांना** हीं संघराज्याचीं खातीं आणि अधिकार वगळून बाकीं सर्व खातीं आणि अधिकार मिळावेत.

**( ५ ) निरनिराळया** प्रांतांना एकत्र येऊन आपापले गट बनवितां यावेत, आणि या गटराज्याच्या हातीं कोणकोणतीं खातीं आणि अधिकार द्यावयाचे हें ठरवितां यावें.

**( ६ ) दर** दहा दहा वर्षांनीं संघराज्याची आणि गटराज्याची घटना आमूलाग्र बदलतां यावी.

हे सहा मुद्दे लक्षांत घेऊन देशाची राजकीय घटना तयार करण्यांत यावी, असें शिष्टमंडळानें सुचविलेलें आहे. त्यानंतर ही घटना तयार करण्या-साठीं देशाची घटनासमिति कशी निवडण्यात यावी याबद्दल शिष्टमंडळाने अशी

योजना सुचविलेली आहे. प्रौढ मतदानपद्धतीनें सर्व जनतेचे प्रतिनिधि घटना समितीमध्यें निवडावेत ही सगळ्यांत उत्तम कल्पना; पण तसें करण्याला वेळ खूप लागेल आणि दिरंगाई होईल. म्हणून तो मार्ग नको, असें शिष्टमंडळाचें मत आहे. नवीन निवडून आलेल्या प्रांतिक कायदेमंडळाच्या सभासदांना घटना समिति निवडण्याचा अधिकार द्यावा तर तेंही बरोबर होणार नाहीं. कारण प्रांतिक कायदेमंडळांतील सभासदांच्या संख्येचें आणि लोकसंख्येचें कांहींच प्रमाण नाहीं. आसामची लोकसंख्या एक कोट तर आसामच्या कायदेमंडळामध्यें सभासद एकशेंसाठ. आणि बंगालची लोकसंख्या सहा कोट असूनही बंगालच्या कायदेमंडळांत सभासद संख्या अडीचशें ! शिवाय जातीय निवाड्यामुळें अल्पसंख्याकांना प्रमाणाबाहेर जागा मिळाल्यानें त्यांच्या लोकसंख्येचें आणि कायदेमंडळांतील जागांचें कांहींच प्रमाण राहिलेलें नाहीं. म्हणून शिष्टमंडळानें अशी योजना सुचविलेली आहे की, प्रांतिक कायदेमंडळाच्या सभासदांनी दहा लक्ष लोकसंख्येला एक प्रतिनिधि, या हिशेबानें आपापल्या प्रांताचे प्रतिनिधी निवडावेत. या दृष्टीनें हिंदुस्थानामधल्या सर्व जनतेच्या तीन जमाती शिष्टमंडळानें मान्य केलेल्या आहेत. बहुजन, मुसलमान आणि शीख, बहुजनांत शीख आणि मुसलमान वजा करून सर्व धर्माचे, जातीचे आणि वंशाचे लोक येतात. या घटनासमितीच्या निवडणुकीसाठीं प्रांतांचे तीन गट कल्पिण्यांत आलले आहेत. अ, ब आणि क. ‘ अ ’ गटांत मद्रास, मुंबई, संयुक्त प्रांत, बिहार, मध्यप्रांत आणि ओरिसा हे प्रांत येतात. ‘ ब ’ गटात पंजाब, सरहद्द, सिंध आणि ब्रिटिश बलुचिस्तान हे प्रांत येतात. आणि ‘ क ’ गटांत, बंगाल आणि आसाम हे प्रांत येतात. दहा लक्ष जनतेला एक प्रतिनिधि, या हिशेबानें मद्रास-मुंबई या ‘ अ ’ गटाला घटनासमितीवर १६७ बहुजन आणि २० मुसलमान अशा १८७ जागा मिळतात. पंजाब—सिंधच्या ‘ ब ’ गटाला २२ मुसलमान, ९ बहुजन आणि ४ शीख, अशा ३५ जागा मिळतात व बंगाल—आसाम या ‘ क ’ गटाला ३४ बहुजन व ३६ मुसलमान अशा ७० जागा मिळतात. अशा तऱ्हेनें, सबंध हिंदुस्थान देशाच्या घटनासमितीमध्यें, २९२ खालसा प्रांतांचे आणि ९३ संस्थानांचे, असे एकंदर ३८५ सभासद निवडले जातात.

खालसा प्रांतांच्या २९२ सभासदांत ७८ मुसलमान आहेत. संस्थानचे ९३ सभासद कसे निवडावयाचे, तें राजामहाराजांचे प्रतिनिधि राहणार कीं प्रजेचे प्रतिनिधि राहणार, हें संस्थानांशीं बोलणें करून ठरवावयाचें आहे. आजपर्यंत देशामध्यें ज्यांना अल्पसंख्यांक म्हणून समजलें जात होते, त्यांचे प्रतिनिधि या घटना समितीवर नाहींत. म्हणून, अल्पसंख्याकांच्या हक्कांचें संरक्षण करण्यासाठीं एक निराळें ' सल्लागार मडळ ' घटना समिति नेमील. आरंभीं घटना समितीच्या सर्व सभासदांची बैठक होईल आणि आपल्या कार्याची सर्वसाधारण रूपरेषा ते आंखतील. त्यानंतर अ, ब आणि क गटांचे सभासद् निरानिराळे गटवारीनें बसून, आपापल्या प्रांतांची आणि गटाची घटना ठरवितील. देशाच्या नवीन घटनप्रमाणें निवडणुकी होऊन, नवीन कायदेमंडळें स्थापन झाल्यानंतर, मग एकाद्या प्रांताला आपल्या गटामधून बाहेर येण्याची इच्छा झाली, तर येतां येईल ! सध्यां ज्या प्रांताला ज्या गटामध्यें घालण्यांत आलेलें आहे, त्याला सर्व संस्कार होईपर्यंत त्या गटांतच रहावें लागेल, मग त्याला आज त्या गटांत राहण्याची इच्छा असो वा नसो !

**शिष्टमंडळाच्या** या योजनेमधील कोणतीही एखादी गोष्ट बदलावयाची झाल्यास, घटना समितिमधील दोन प्रमुख जमातींच्या प्रत्येकीं बहुमतानेंच ती बदलतां येईल. नवीन घटना तयार करण्याचें काम शक्य तितक्या जलदीनें पुरें करावयाचें आहे. तथापि, कितीही घाई केली म्हणून हें किचकट काम लौकर थोडेंच होणार आहे ? तेव्हां या मध्यंतरींच्या काळामध्यें देशाचा राज्य-कारभार चालविण्यासाठीं प्रमुख राजकीय पक्षांना संमत असें एक ' **मध्यंतर सरकार** ' स्थापन व्हावें, अशी शिष्टमंडळाची इच्छा आहे. किंबहुना ' मध्यंतर सरकार ' स्थापन करणें ही गोष्ट शिष्टमंडळाला सर्वांमध्यें अधिक महत्त्वाची वाटते. कारण दुष्काळाचा महान् दैत्य देशापुढें 'आ' वासून उभा आहे. त्याखेरीज देशाच्या भवितव्याशीं निगडित असलेल्या अनेक युद्धोत्तर योजना समोर उभ्या आहेत. निरानिराळ्या आंतरराष्ट्रीय परिषदांमध्यें देशाला भाग घ्यावयाचा आहे ! हीं सर्व कामें राष्ट्रीय सरकार अस्तित्वांत आल्यावांचून कशीं होणार ? या राष्ट्रीय सरकारमधली युद्धमंत्र्यासकट सर्व मंत्र्यांची खातीं हिंदी जनते-

ऱ्या हाती सोपविण्याची ब्रिटिश सरकारची तयारी आहे. हिंदी युद्ध मंत्र्याच्या हाताखालीं काम करण्यास आपण तयार आहों, असें सेनापति आकिनलेक यांनींही परवां सांगितलें आहे. ही सर्व योजना हिंदी जनतेनें जर स्वीकारली, तर यादवी आणि युद्ध केल्यावांचून, देशाला अत्यत थोड्या अवकाशात स्वातंत्र्य मिळवितां येईल, असें शिष्टमंडळानें आश्वासन दिलें आहे. अर्थात् ही जनतेनें मान्य केली नाहीं तर दंगेधोपे, यादवी, हत्त्या यांच्या भयंकर आपत्तीमधून देशाला जावें लागेल, अशीही शिष्टमंडळानें जातांजातां एक धोक्याची सूचना देऊन ठेवली आहे.

**तीन** मंत्र्याच्या या योजनेला ब्रिटिश सरकारचा पाठिंबा आहे. आतां ही योजना म्हणजे दोन्ही पक्षांची बाजू ऐकून दिलेला न्यायाधिशाचा शेवटचा निवाडा नसून, तें एक जनतेपुढें ठेवलेलें शिफारसवजा निवेदन आहे, असें शिष्टमंडळाचें म्हणणें आहे. पण तें खरें नव्हे. सर स्टॅफर्ड क्रिप्स यानीं बजावून सांगितलें आहे की, याबाबत फिरून कसल्याही वाटाघाटी करावयाला आम्ही तयार नाहीं. आम्ही एकदम आतां कामाला लागणार ! ही योजना देशानें मान्य केली नाहीं, तर देशाला भयकर त्रास भोगावा लागेल, असा त्यांनींही दम देऊन ठेवलेला आहे. त्रिमंत्रिमंडळाच्या या योजनेमधलें एक अक्षर किंवा त्या अक्षराची कानामात्रा देखील कोणाला बदलता येणार नाहीं. त्यांत बदल करावयाचा झाल्यास दोन्ही जमातींच्या बहुमतानेंच तो होऊ शकेल! ही गोष्ट जवळजवळ अशक्यच आहे. म्हणून मंत्रिमंडळाची ही योजना शिफारसवजा नसून ती एक काळ्या दगडावरची रेघ आहे, यात मुळींच शंका नाहीं. म्हणून आम्ही तरी शिष्टमंडळाच्या या शिफारशीला ' निवाडा ' म्हणूनच संबोधतों. हा शिष्टमंडळाचा निवाडा ज्या दोन पक्षांनीं प्रथम स्वीकारावयाचा आहे, त्यांनी याबाबत अद्यापि मौनच राखलेलें आहे. कॉंग्रेस हा निवाडा मान्य करणार काय ? मुस्लिम लीग या निवाड्याला संमति देऊन ' मध्यंतर सरकारां ' त भाग घेणार काय ? या प्रश्नाला अद्यापिही निश्चित उत्तर देतां येत नाहीं ! कॉंग्रेस हा निवाडा शंभर टक्क्यांनीं स्वीकारणार आणि मुस्लिम लीग येवो वा न येवो, व्हाईसरॉयच्या मदतीनें ' मध्यंतर सरकार ' बनविण्याच्या कामीं ती पुढाकार घेणार, अशा

बातम्या कॉंग्रेसच्या ' जानी दोस्तां ' नीं आधींच साऱ्या देशांत उठवून कॉंग्रेसवर अनत उपकार करून ठेवले आहेत. एवढेंच नव्हे तर ' मध्यतर सरकारा ' मध्यें कोणकोणते कॉंग्रेस पुढारी, कोणकोणत्या खात्याचे मंत्रि होणार, या बातम्याही कॉंग्रेसच्या वर्किंग कमिटीचा निर्णय जाहीर होण्याचे आधीं सचित्रपणें वृत्तपत्रांत प्रसिद्ध होऊं लागलेल्या आहेत. **कॉंग्रेसनें निवाडा अद्यापिही मान्य केलेला नाहीं. निवाड्यामध्यें पुष्कळच दोष आहेत, अत्यंत ढोबळ दोष आहेत. ते दूर करण्याचें स्पष्ट आश्वासन त्रिमंत्रिमंडळानें दिल्यावांचून किंवा ते दूर होण्याची निःसंदिग्ध शक्यता कॉंग्रेसला दिसल्यावांचून कॉंग्रेस या योजनेला कधींही मान्यता देणार नाहीं, असें आमचें स्पष्ट मत आहे.** जनाब जीना यानीं ही योजना आपणांस मान्य नसल्याचा पुकारा केलेला आहे. तथापि, ती स्वीकारण्याची किंवा नाकारण्याची जबाबदारी त्यांनीं लीगच्या ' वर्किंग कमिटी ' वर ज्या अर्थीं टाकलेली आहे, त्याअर्थीं कॉंग्रेस काय करते तें पहावयाचें अन् मग आपला निर्णय जाहीर करावयाचा, याच आपल्या जुन्या तत्राचा लीग या वेळीं अवलंब करणार असें दिसत आहे. कॉंग्रेस ही योजना स्वीकारणार असा आधींपासून जनतेचा जो समज होऊन बसलेला आहे, त्याला देखील थोड्या फार अंशानें कॉंग्रेसचे पुढारीच कारण होत. सशस्त्र युद्ध केल्यावांचून देशाला स्वातंत्र्य कसें मिळतें हें दृश्य हिंदुस्थान जगाला लौकरच दाखवील, असें खुद्द राष्ट्रपति अबुल कलम आझाद् हे नुकतेच जाहीरपणें म्हणाले होते. इंग्रज लोक या देशामधून लौकरच चंबूगबाळें आवरून जाणार आणि देशाला पूर्ण स्वातंत्र्य निश्चितपणें मिळणार, असे उल्लेख अनेक कॉंग्रेस पुढाऱ्यांनीं अलिकडे अलिकडे आपल्या भाषणांत केलेले होते. शिष्टमंडळाची ही योजना प्रसिद्ध होतांच, " तुम्हांला ही योजना आवडो वा न आवडो, हिंदुस्थानच्या इतिहासांत तिला अतिशय महत्त्व आहे. " असें आपलें मत महात्मा गांधींनीं तावडतोब प्रकट केलें; एवढेंच नव्हे तर, या दुःखपूर्ण भूमीला सौख्यपूर्ण देशाचें स्वरूप देण्याचें सामर्थ्य या योजनेमध्यें आहे ! ' अशीही या योजनेबद्दल महात्माजींनीं ग्वाही देऊन ठेवली. त्यामुळें कॉंग्रेस योजनेचा स्वीकार तावडतोब करणार, असाच

सामान्य लोकांचा साहजिकच समज होऊन बसला ! तथापि महात्माजींचीं भाषणें दिवसेंदिवस अधिक सूत्रमय आणि लाक्षणिक होत चाललेलीं आहेत. त्यामुळें त्यांच्या वक्तव्यामधल्या कांहीं शब्दांकडे केवळ बघणाऱ्यांचा पुष्कळ वेळां गैरसमज झाल्यास नवल नाहीं ! या 'योजनेला हिंदुस्थानच्या इतिहासांत अतिशय महत्त्व आहे ' असें विधान ज्या वक्तव्यांत महात्माजींनीं केलें, त्याच विधानांत त्यांनीं असेंही पण जनतेला सांगितलें कीं, " इंग्रजी भाषा अवघड आहे. वीस वर्षे इंग्रजी भाषा बोलणाऱ्या लोकांमध्यें राहून सुद्धां त्या भाषेवर माझें प्रभुत्व आहे असें मला म्हणतां यावयाचें नाहीं. **म्हणून शिष्टमंडळाची ही योजना लोकांनीं इंग्रजी मधून न वाचतां हिंदुस्थानी भाषेमधून वाचावी आणि त्या योजनेचा अर्थ कळण्याचें सामर्थ्य आपल्या बुद्धीमध्यें येवो म्हणून त्यांनीं परमेश्वराची मनोभावें प्रार्थना करावी !** " महात्माजींच्या हे तोंडून उद्गार निघाले आहेत म्हणूनच आम्हीं त्यांच्याकडे गभीरपणें पाहतों. नाही तर उपरोधिक विनोदाचा एक उत्कृष्ट नमुना म्हणून आम्ही या वक्तव्याकडे पाहिलें असतें आणि पोट धरधरून हसलों असतों. ' बुडत्या बँकेवरची बिन तारखेची हुंडी ' असें क्रिप्स योजनेचें वर्णन करून महात्माजींनीं त्या योजनेचा त्या वेळीं सपशेल बोऱ्या वाजविलेला होता, त्याप्रमाणें प्रत्यक्ष स्वातंत्र्याचा पुकार न करतां शिष्टमंडळानें देऊ केलेली ही स्वातंत्र्याची योजना म्हणजे एक ' प्रॉमिसरी नोट ' आहे, अशीही त्या योजनेवर महात्माजींनीं टीका केल्याचें प्रसिद्ध झालेलें आहे. शिष्टमंडळाची ही योजना, महात्माजी म्हणतात त्याप्रमाणें, कळावयाला खरोखरच अत्यंत कठीण आहे. ती जितकी फिरून फिरून वाचावी तितकी ती अधिक अधिक कठीण वाटूं लागते. बाह्यात्कारी ती कितीही आकर्षक आणि भरीव वाटत असली, तरी जसें जसें आंत खोल जावें, तसें तसें तिच्या पोटांतले छुपे चोरकप्पे आणि तिच्या अंतरंगामधलीं भयानक भुयारें आपल्या नजरेला दिसूं लागतात. म्हणून महात्माजींप्रमाणें आम्हीही परमेश्वराची अशीच प्रार्थना करतों कीं, " हे परमेश्वरा, आम्ही हिंदुस्थानांतील गरीब लोक बुद्धीनें अत्यंत मठ्ठ आहोंत आणि आमच्यावर राज्य करणारे हे

इंग्रज लोक स्वभावानें अत्यंत धूर्त आणि कावेबाज आहेत. म्हणून त्यांनीं आम्हाला देऊ केलेल्या जातां जातां योजनेचा अर्थ कळण्याची अक्कल आणि शहाणपणा तू या वेळीं आम्हांला दे ! ”

**शिष्टमंडळाच्या** या योजनेचा सरकार निरनिराळ्या पक्षांच्या आणि हितसंबंधाच्या लोकांनीं कोणकोणत्या दृष्टीनें आणि कशाकशा मतलबानें केलेला आहे हें बघण्यांत फारच मोठी मौज आहे. खुद्द लॉर्ड वेव्हेल यांना तर ही योजना म्हणजे हिंदी स्वातंत्र्याचा भविष्यकालीन इमारतीचा एक नकाशाच ( म्हणजे Blue print ‘ नील—कागद ’ नव्हे ! ) वाटते ! या आराखड्या-प्रमाणें हिंदी लोकांनीं आतां तावडतोब बांधकामाला सुरुवात करावयाची एवढेंच काय तें ! ‘ हिंदी स्वातंत्र्याच्या शत्रू न. १ ’—जे चर्चिलसाहेब त्यांचें अंतःकरण तर ही योजना बघून अत्यंत विषण्ण झालें. ते म्हणाले, “ अरेरे, साम्राज्य संपादन करण्यासाठीं शिष्टमंडळानें जें बुद्धिसामर्थ्य आणि कर्तृत्व खर्च करावयाचें तें त्यांनीं साम्राज्य देऊन टाकण्याच्या कामीं खर्च करावें ना ! ” हिंदुस्थानच्या उपखंडांतील आठ कोटी मुसलमानांची जी एक बलवान् जमात आहे आणि हिंदुस्थानच्या शांततेसाठीं ज्या जमातीची संस्कृति आणि हितसंबंध यांचें संरक्षण करणें हें अत्यत आवश्यक आहे, त्या जमातीच्या दृष्टीनें ही योजना कितपत समाधानकारक आहे याची चर्चिलसाहेब यांना मोठी चिंता पडलेली आहे. ते म्हणाले, “ हिंदी स्वातंत्र्याच्या एक किंवा अनेक घटना बनविल्या तरी आमची त्याला हरकत नाही. पण या घटना हिंदुस्थानांतल्या राजकीय पक्षांच्या संमतीनें आणि साह्यानें बनवावयाला पाहिजेत ! जोंपर्यंत त्या लोकांचीं भांडणें चालू आहेत आणि त्यांचें मतैक्य होत नाहीं, तोंपर्यंत ब्रिटिश सरकारनें ही योजना बननिण्याची जबाबदारी स्वतःच्या डोक्यावर कां म्हणून घ्यावी ? शिष्टमंडळाला हा रिकामटेकडा उपद्व्याप सांगितला आहे कोणी ? ” कायद्याच्या दृष्टीनें चर्चिलसाहेबाना या योजनेमध्ये फारच मोठे धोके दिसत आहेत. ते म्हणतात, “ मध्यंतर सरकार स्थापन करण्यासाठीं कायद्याची व्यवस्था काय करून ठेविलेली आहे ? उद्यां घटना तयार झाली तर ‘ हिंदुस्थानचा बादशहा ’ ही राजाची पदवी काढून घेण्याची आणि त्या नवीन घटनेला मान्यता देण्या-

साठीं काय काय कायदेशीर इलाज करावे लागतील हें कळत नाहीं ! " 'हिंदि स्वातंत्र्याचे शत्रु न. २, जे ॲमेरीसाहेब कीं ज्यांनीं आपल्या कारकीर्दीत पाकिस्तानच्या उंटाचें पिल्लू वाढून पोसून हिंदुस्थानात सोडून दिलें, त्यांना या योजनेमुळें वरकरणी जरी कितीही वाईट वाटत असलें तरी, त्यांना एका दृष्टीनें मनांतून समाधानच होत आहे. ते म्हणाले कीं, "हिंदुस्थानची फाळणी करण्याची तात्त्विक मागणी शिष्टमडळानें जरी नाकारली आहे, तरी सघराज्याची सत्ता मर्यादित ठेवून आणि गटराज्याला जवळ जवळ पूर्ण स्वातंत्र्य देऊन शिष्टमंडळानें पाकिस्तान प्रत्यक्ष निर्माण करण्याला संमतीच दिलेली आहे !' पार्लमेंटचे एक कम्युनिस्ट सभासद मि. गॅलाचर यांना ही योजना प्रामाणिकपणाची वाटत नाहीं. ते म्हणाले, "जोंपर्यंत इग्रजाचें गोरें सैन्य हिंदुस्थानच्या भूमीवर आहे, तोंपर्यंत इंग्रज आणि हिंदी लोक याच्यामध्ये बरोबरीचें नातें निर्माण होणार नाहीं. हिंदुस्थानला स्वातंत्र्य देण्याची इग्रजाना खरोखरच इच्छा असेल, तर त्यांनीं आधीं स्वातंत्र्य-घोषणा करावी, सैन्य किती मुदतीच्या आंत काढून नेतों हें जाहीर करावें आणि राष्ट्रीय सरकार बनविण्यास कॉंग्रेसला सांगावें !" ज्या हिंदी कम्युनिस्ट पक्षानें साम्राज्यशाही युद्धाला 'लोकयुद्ध' असें म्हणून त्या युद्धकाळात ब्रिटिश सरकारकडून लांच घेऊन त्यांची बगल बच्चेगिरी केली आणि साम्राज्यशाही चौकट हिंदुस्थानच्या मानेवर अधिक बळकट करण्यास मदत केली, त्या पक्षाचे अध्वर्यु श्री. पूरणचद जोशी यांना आतां "ही योजना हिंदी स्वातंत्र्याची योजना वाटत नसून हिंदुस्थान देशाला निरंतर गुलामगिरींत ठेवण्याचा तो एक साम्राज्यशाही सांपळा वाटतो आहे !' बरोबरच आहे. हिंदी कम्युनिस्ट लोकांना ही योजना कशी आवडेल बरें ! कारण ही योजना कांहींशा फरकानें जर कॉंग्रेसनें आणि लीगनें मान्य केली आणि इंग्लंड व हिंदुस्थान या दोन देशांमध्यें सलोखा उत्पन्न झाला, तर मग रशियाच्या घशांत हा देश घालण्याचें या पंचमस्तंभी कम्युनिस्टांचें धूर्त कारस्थान कसें बरें यशस्वी होणार ? तेव्हां या योजनेला पुरोगामी गट किंवा कॉंग्रेस समाजवादी लोक ज्या उच्च स्वातंत्र्यवादी भूमिकेवरून विरोध करीत आहेत, त्या विरोधांत आणि देशद्रोही हिंदी कम्युनिस्टांच्या विरोधामध्यें जमीन

अस्मानाचें अतर आहे, हें प्रत्येकानें लक्षांत ठेवावें. पुरोगामी गटाचे एक पुढारी म्हणतात कीं, " ही योजना मान्य केल्यानें गोऱ्या साहेबांच्या ऐवजीं काळे साहेब येतील इतकेंच ! हिंदी भांडवलवाले गोऱ्या भांडवलवाल्यांशीं संगनमत करून परदेशीं तयार केलेला माल 'Made in India' असा शिक्का मारून आपल्या लोकांच्या गळयात अडकवतील आणि जनतेची भयंकर फसवणूक आणि पिळणूक होईल. ज्यांना स्वातंत्र्यासाठीं यापुढें झगडा करावयाची इच्छा नाही त्या नोकरीवाल्या लोकांना या योजनेमुळें जरी खूप आनंद झाला, तरी ज्या वीरांनीं स्वातंत्र्यासाठीं आजपर्यंत तुरुंगवास पत्करला, नाना प्रकारच्या हाल अपेष्टा सोसल्या, लाठ्या खाल्ल्या, पोलिसांच्या बंदुकींना तोंड दिलें, त्यांचें मात्र या योजनेमुळें मुळींच समाधान होणार नाही !" कॉंग्रेस समाजवादी पक्षाचे बंडखोर पुढारी जयप्रकाश नारायण हे म्हणाले कीं, "या योजनेमध्यें थोड्याशा सवलती हिंदी लोकांना दिलेल्या असतील, पण यामध्यें स्वातंत्र्य कुठें आहे ? बेचाळीसच्या बंडानें देश जागा झालेला आहे. आझाद फौजेच्या पराक्रमानें जनतेमध्यें भयंकर आत्मविश्वास उत्पन्न झालेला आहे. इंग्रज सरकारच्या हें लक्षांत आल्यानें जनतेच्या पराक्रमाला पायबंद घालण्यासाठीं त्यांनीं हा लुच्चे-गिरीचा डाव रचलेला आहे. ही योजना स्वीकारणारे पुढारी ब्रिटिश सरकारच्या हातामधलीं बाहुलीं बनतील ! मध्यतर सरकारामध्यें मुस्लिम लीगचे आणि संस्थानांचे जे प्रतिनिधी निवडून येतील ते इंग्रजांचे बगलबच्चे असल्यानें इंग्रजांना या देशामधून हांकलून देण्याच्या प्रत्येक उपायाला ते कसून विरोध करतील ! एकदां आपण या योजनेच्या जाळ्यांत सांपडलों म्हणजे पुन्हां बाहेर येणे अशक्य होईल ! जोंपर्यंत किसान आणि कामगार यांच्या हातीं हिंदु-स्थानचा राज्यकारभार येत नाहीं, तोंपर्यंत या देशाला स्वातंत्र्य मिळालें असें म्हणता येत नाहीं !" सर तेजबहादूर सप्रू, सर होमी मोदी, आणि देशांतील बाकीचे बिनपक्षाचे इतर सज्जन पुढारी हे या योजनेवर तर बेहद्द खूष आहेत. कुस्ती जिंकल्यावर पहिलवान जसा आनंदानें, जो दिसेल त्याला नमस्कार करीत सुटतो. त्याप्रमाणें सप्रूंनीं ही योजना वाचून ज्याला त्याला अभिनंदनाच्या तारा पाठविण्याचा सपाटा सुरू केला आहेच.

**तथापि**, या योजनेमुळें सबंध देशामध्यें जर अतिशय कोणाला आनंद झालेला असेल आणि आपल्या पक्षाचा अद्वितीय विजय झाल्याचा साक्षात्कार जर कोणाला झाला असेल तर तो महाराष्ट्रामधल्या हिंदुसभेच्या कार्यकर्त्यांना. हिंदुमहासभेचे खरे अध्यक्ष डॉ. श्यामाप्रसाद मुकर्जी यांना या योजनेमध्यें 'पाकिस्तान' दडलेलें दिसत आहे. ते या योजनेवर खूष नाहींत; पण हिंदु-सभेचे 'टेंपरवारी' अध्यक्ष जे आमचे अण्णाराव भोपटकर यांना तर ही योजना 'नवयुगाची प्रवर्तक' आहे असें वाटतें. ते हंसुन म्हणतात, "या योजनेनें हिंदुस्थानच्या आजच्या साऱ्या अपेक्षा पूर्ण झालेल्या आहेत ! जातीय निवाड्यानतर देशांतल्या राजकारणाबाबत हिंदुसभेनें जो दृष्टिकोण स्वीकारला होता तो सपूर्णपणें बरोबर आहे असेंच या योजनेमुळें सिद्ध झालेलें आहे !" शिष्टमंडळाची ही योजना म्हणजे हिंदुमहासभेच्या राजकारणाचा एक प्रचंड विजय आहे, असेंच पुण्याच्या 'काळ' पत्रालाही वाटतें. तें आपल्या अग्रलेखांत म्हणालें, "**ब्रिटिशांच्या या निर्णयानें जर कोणाला सर्वांत जास्त समाधान झालें असेल तर तें हिंदुसभेला होय.** मुसलमानांना आपल्या बाजूला राखण्यासाठीं त्यांच्या जातीय भावनांना व मागण्यांना ब्रिटिश लोक जसे प्रोत्साहन देत होते, त्याचप्रमाणें कॉंग्रेसही त्याच्या जातीय वृत्तीस आवाहन करीत होती. यामुळें हिंदुसमाजावर फार मोठा अन्याय होत होता. पण भ्रांत राष्ट्रीयत्वाच्या नावाखलीं कॉंग्रेस त्याकडे दुर्लक्ष करीत होती **हिंदुसभेचें म्हणणें कॉंग्रेसनें ऐकलें नाहीं, एवढेंच नव्हे तर निवडणुकीच्या वेळीं लोकांनींही ऐकलें नाहीं.** पण तिच्या कार्यकर्त्यांनीं केवळ कर्तव्य बुद्धीनें केलेल्या हिंदुसमाजाच्या सेवेचें फळ त्यांना ब्रिटिश सरकारच्या या निर्णयानें मिळालें असून पाकिस्तानचा प्रश्न तूर्त तरी पूर्णपणें गाडला गेला आहे. ह हिंदुसभेच्या धोरणाचा अपूर्व विजयच होय असें आम्ही मानतों. सिंहगड जिंकत असतां तान्हाजी पडला, तेव्हां 'गड आला, पण सिंह गेला' असे शिवाजीनें उद्‌गार काढले. त्याचप्रमाणें, गेल्या निवडणुकींत जरी हिंदुसभेला मोठें अपयश आलें असलें, तरी ती ज्या ध्येयासाठीं लढत होती तें ध्येय संपूर्णपणें यशस्वी झालें असल्यानें, 'सिंह गेला; पण गड सर झाल्या' बद्दल हिंदुसभावाद्यांना समाधान

ाटणें साहजिक आहे कॉंग्रेस व मुस्लिम लीग यांना जरी निवडणुकींत संपूर्ण यश मेळालें असलें, तरी त्या संस्था ज्याकरितां निवडणुकी लढत होत्या त्या कामीं मात्र यांस संपूर्ण अपयश आलें आहे. कॉंग्रेसला आपण मुसलमानांचेही प्रतिनिधि आहोंत हें निवडणुकींत सिद्ध करतां आलें नाहीं हा तिचा सर्वांत मोठा पराभव होय व ज्या पाकिस्तानासाठीं लीग लढली तें पाकिस्तान आतां कायमचें मृगजळ ठरलें हा लीगचाही पूर्ण पराभवच होय!" वाचकहो, वाचलेंत, नीट बारकाईनें वाचलेंत. या योजनेमुळें कॉंग्रेस आणि लीगचा कसा दणदणीत पराभव झाला आहे आणि हिंदुसभेचा कसा ठणठणीत विजय झाला आहे तें? 'काळ' पत्राच्या या लिखाणाइतका विलक्षण विनोदी लेख पुष्कळ वर्षांत आम्हीं वाचला नसेल. हिंदुसभेच्या या हरसाल बेअकलीपणाबद्दल आणि बेवकूफपणाबद्दल खरो- खरच हसावें कीं रडावें हेंच कळत नाहीं! म्हणजे स्वातंत्र्यासाठीं लढणारे तिकडे लढत आहेत, झगडत आहेत, आपल्या सर्वस्वाचें बलिदान करीत आहेत आणि बाबळीची मच्छरदाणी नेसून सदाशिव पेठेच्या माजघरांत दडून बसलेल्या या डिपॉझिट जप्तवाल्या आत्याबाईंचा मात्र कांहीं एक न करतां इकडे प्रचंड विजय होतो आहे! वाहवा रे वाहवा! काय अद्भुत कार्यकारण भाव आहे हा पण!

'**केसरी**' पत्रानेंही 'हिंदुसभेचा प्रचंड विजय' झाल्याचा असाच निर्वाळा दिला आहे. आणि सरकारला असें सुचविलें आहे कीं, "घटना- समितीवर वर्णाश्रम स्वराज्य संघाचेही प्रतिनिधि घ्यावेत!" ओंकारेश्वरावर पिंड पाळणाऱ्या भटालाही घटना समितीवर घ्यावें अशी तात्या करंदीकरांनीं सूचना केली नाहीं हें देशाचें नशीबच म्हणायचें! हिंदुमहासभेमधले 'बगाराम' श्री. अनंतराव गद्रे यांनी या योजनेतलें तर अव्वल रहस्यच ओळखलें आहे. ते म्हणतात, "आम्हां मूर्खांना असें वाटतें कीं, आमच्या चळवळीला भिऊन इंग्रज नमले पण खरी वस्तुस्थिति निराळीच आहे. इंग्रज हा फार धूर्त आहे. तो जागतिक परिस्थितीपुढें नमला आहे. आमच्यापुढें नव्हे! आम्हीं पंचवीस वर्षे जें कांहीं केलें त्याला जर पराक्रम हें नाव दिलें तर पराक्रम या शब्दाची व्याख्याच बदलावी लागेल!" गेलीं पंचवीस वर्षे कॉंग्रेसनें स्वातंत्र्यासाठीं जो

प्राणांतिक झगडा केला, जो अद्वितीय त्याग आणि पराक्रम केला, तो म्हणे पराक्रम नव्हे ! काय बदमाष आणि लुच्चा आहे हा लेकाचा अनंतराव ! गोरेगांवकराच्या चाळींत बसल्या—बसल्या कॉंग्रेसच्या तपश्चर्येचें सत्त्व हरण करण्याचा प्रयत्न करतो आहे बेटा ! हिंदुमहासभेचे फिल्ड मार्शल मुंजे यांना तर ही योजना म्हणजे हिंदुस्थानांत हिंदुपद्पादशाही स्थापन करण्याची एक उत्तम संधि आहे असें वाटतें ! ते म्हणतात, "वायव्येकडे स्थापन होणाऱ्या मुसलमान प्रांताचा गट हा संघराज्यापासून विभक्त होऊन 'पाकिस्तान' जेव्हां स्थापन करील. तेव्हा ईशान्येकडच्या हिंदूंनीं त्या संधीचा फायदा घेऊन आसाम, पूर्व आनि पश्चिम बंगाल व ओरिसा या प्रांतांमध्यें हिंदूंचें राज्य स्थापन करून मुसलमानांना शह द्यावा. हिंदु संस्थानिक तर हिंदूंच्या या प्रयत्नांना मदत करतीलच. गुजरात, कर्नाटक, मध्यप्रांत, वऱ्हाड, महाराष्ट्र यांनींही आपलें एक निराळें मध्यवर्ती हिंदु राज्य स्थापन करावें. सयुक्तप्रांत आणि बिहार हे तर बोलूनचालून हिंदुत्वाचे प्राण. त्यांचेंही एक निराळें हिंदुराज्य स्थापन होईलच. म्हणजे उत्तरेकडे मुसलमान राज्यें तर दक्षिणेकडे हिंदु राज्यें, अशी देशात खूपच गंमत उडून जाईल. म्हणून ही योजना आपण नाकारू नये !" कोंबड्या आणि ससे खाऊन आणि मुसलमानासारखी दाढी वाढवून देशांत हिंदुपद्पादशाही स्थापन करू पाहणाऱ्या डॉ. मुंजांची ही लष्करी प्रतिभा बघून लॉर्ड वेव्हेल आणि सेनापति ऑकिनलेक हे लष्करी तज्ज्ञ खरोखरच चाट होऊन जातील ! हिंदुमहासभेच्या पुढाऱ्यांच्या राजकीय अकलेचें हें विलक्षण प्रदर्शन बघून डोकें अगदीं सुन्न होऊन जातें. हिंदी राजकारणाच्या खुर्चींमध्यें अद्यापिही दबा धरून बसलेले हे हिंदुमहासभावादी चापट ढेकूण मधून मधून चावा घेऊन आमचा जीव कां हैराण करताहेत हेंच कळत नाहीं ! पूर्वजन्मीं जनतेनें यांचा काय गुन्हा केला होता बरें, म्हणून या जन्मीं त्यांनीं राजकारणांत शिरून जनतेच्या सहनशक्तीवर आणि चांगुलपणावर असा सूड घेण्यास प्रवृत्त व्हावें बरें !

**शिष्टमंडळाच्या** या योजनेबद्दल निरनिराळे अभिनिविष्ट पक्ष काय म्हणत आहेत हें पाहिल्यानंतर, सामान्य माणसानें शांत आणि निःपक्षपाती दृष्टीनें या योजनेचा विचार केला, तर त्याला तिच्यांत काय आढळून येईल, हें

आपण बघूं. या योजनेमुळें देशाची फाळणी करण्याचें मुस्लिम लीगनें निर्माण केलेलें भूत सध्यां तरी पुरलें गेलें आहे यांत शंका नाहीं. अर्थात् हें भूत इंग्रजांनींच निर्माण केलें होतें आणि आतां तें त्यांच्याच मानगुटीला जेव्हां बसूं लागलें, तेव्हां तें त्यांना पुरणें भाग पडलें हें ठीकच झालें. घटनासमिति बनविण्याच्या दृष्टीनें शिष्टमंडळानें देशातील जनतेचे तीन भाग पाडले. बहुजन, मुसलमान आणि शीख, पार्शी, ख्रिस्ति, ज्यू, अस्पृश्य आणि इतर सर्व हिंदु यांचा एक संयुक्त मतदार संघ शिष्टमंडळानें निर्माण केला, ही खरोखरच उत्तम गोष्ट झाली. लॉर्ड मिंटोसाहेबांच्या कारकीर्दीपासून या देशांत जातीयतेचा जो रोग फैलावण्याला सुरुवात झालेली आहे त्यानें या देशामध्यें लोकशाही प्रस्थापित करणें आतां अगदीं अशक्य करून सोडलें आहे. सर्व देशांत द्वेषाचें आणि मत्सराचें वातावरण भरून राहिलेलें आहे. त्याला या गोष्टीमुळें थोडासा आळा बसेल. अर्थात् सवराज्याच्या आणि प्रांतराज्याच्या घटना-समितीनें हीच वर्गवारी पुढें चालू ठेविली तरच हें म्हणणें खरें ठरेल. तसेंच लोकसंख्येच्या प्रमाणामध्यें घटनासमितीवर प्रतिनिधींची निवड करण्याचें तत्त्व शिष्टमंडळानें मान्य केलेलें आहे हेंही ठीकच आहे. एवढ्या या दोन तीन बऱ्यापैकीं गोष्टी वजा केल्या तर या योजनेमध्यें चांगली अशी एकही गोष्ट आम्हांला दिसत नाहीं; उलट आरंभापासून अखेरपर्यंत अनेक महत्त्वाच्या उणीवा आणि घातुक दोषच आम्हाला या योजनेमध्यें दिसत आहेत. ते कसे तें बघू.

**देशाच्या** राजकीय फाळणीचें भूत जरी या योजनेमध्यें अगदीं विधिपूर्वक गाडलें गेलें असलें तरी 'पाकिस्तान'च्या राक्षसाला कांहीं या योजनेनें मूठमाती दिलेली नाहीं. उलट मुस्लिम लीगनें एक पाकिस्तान मागितलें होतें. त्याच्या ऐवजीं शिष्टमंडळानें त्यांना दोन पाकिस्तानें देऊन टाकलेलीं आहेत. ॲमेरीनें ही गोष्ट मिटक्या मारीत जाहीर केलेली आहे. शिष्टमंडळानें खुद्द स्वतःच्या तोंडानें सांगितलेलें आहे कीं, देशाची फाळणी न करतां मुसलमानांना पाकिस्तानचे शक्य तितके फायदे देण्याचा आम्हीं या योजनेमध्यें प्रयत्न केलेला आहे. मुस्लिम लीगनें मागितलें त्यापेक्षां जास्तच त्यांना

या योजनेमुळें मिळालेलें आहे. हिंदुस्थानाचें नामधारी अखंडत्व कायम ठेवून मुसलमानांना दोन पाकिस्तानें देण्याची ही अद्‌भुत शक्कल शिष्टमंडळानें शोधून काढलेली आहे. केवळ मुसलमानांना खूष करण्याचा या योजनेमध्यें शिष्टमंडळानें आटोकाट प्रयत्न केलेला आहे हें दिसून येतें. नाहीं तर संघराज्य, गटराज्य आणि प्रांतराज्य असा हिंदी स्वातंत्र्याचा 'तीन मजली' ताबूत उभा करण्याचें शिष्टमंडळाला काय कारण होतें हो ? संघराज्याला दुबळें करून प्रांतांचीं सार्वभौम गटराज्यें बनविण्याचा हा डाव निव्वळ लुच्चेगिरीचा आहे ! त्यांतूनहि अमुक एका प्रांताला त्याच्या इच्छेविरुद्ध एकाद्या गटामध्यें आरंभीं कां होईना पण सक्तीनें दाखल करावयाचें हा निव्वळ जुलूम आहे ! सरहद्द प्रांतासारख्या कॉंग्रेस प्रांताला सिंध आणि पंजाब या मुस्लिम लीगवाल्या प्रांतांच्या दावणीला कां म्हणून बांधण्यांत यावें ? नवीन घटना तयार झाल्यानंतर त्या त्या गटामधून बाहेर पडण्याची प्रांतांना मुभा देण्यात आलेली आहे हें खरें ! पण नवीन घटना कशी तयार होते आहे हें कोणास ठाऊक ? या नवीन घटनेमधून पुढें बाहेर पडणें प्रांतांना अशक्य झालें तर त्याबद्दल काय तजवीज आहे ? केवळ धार्मिक दृष्टि ठेवून अकरा प्रांतांचे जे तीन गट बनविले आहेत ते चुकीचे आहेत. नामदार आगाखान यांची तर अशी इच्छा आहे कीं, 'ब' गटांतील प्रांतांचा सक्तीनें कायमचाच एक गट करून टाकावा आणि त्या गटांतील प्रांतांना कोणत्याही परिस्थितींत 'अ' गटाशीं (म्हणजे हिंदु गटाशीं) जोडणी करतां येऊ नये ! यावरून या 'गट' बाजीच्या मुळाशीं शिष्टमंडळाच्या काय भावना आहेत हें स्पष्ट होतें. 'ब' आणि 'क' हे मुसलमानी प्रांतांचे गट म्हणजे खरोखर 'पाकिस्तानें' च होत. मुस्लिम लीगनें मुसलमानांसाठीं निराळी घटना समिती मागितलेली होती. ती नाकारल्याचा नुसता देखावा शिष्टमंडळानें करून बाह्यात्कारी एक मध्यवर्ति घटना बनविलेली आहे. तथापि 'ब' आणि 'क' गटाच्या घटनासमित्या अस्तित्वांत आणून मुस्लिम लीगच्या निराळ्या घटना समितीची मागणी शिष्टमंडळानें मान्यच केलेली आहे. या गटांच्या घटनासमित्यांना आपापल्या गटाच्या घटना वाटेल तशा पूर्ण मुखत्यारानें निश्चित करतां येतील. त्यावर मध्यवर्ति

घटनासमितीचें कांहींच नियंत्रण नाही. त्याखेरिज मध्यवर्ति घटनासमिती जी कांहीं घटना तयार करील तिला नकार देऊन अडवणूक करण्याचा हक्क मुस्लिम सभासदांना आहेच. म्हणजे कॉंग्रेस आणि मुस्लिम लीग यांच्या भांडणामुळें अडून पडलेली राजकारणाची ही मोटारगाडी आज शिष्टमडळानें 'हॅंडल' मारून पुढें चालू केली तरी ती पुढें प्रत्येक टप्प्या टप्प्याला थांबून बसेल! त्या वेळीं मोटारगाडीचें 'हॅंडल' फिरवायला कोण येणार? शिवाय दहा वर्षांनंतर देशाची घटना आमूलाग्र बदलण्याचा हक्क आहे. म्हणजे पुढील दहा वर्षांत 'ब' आणि 'क' हे पाकिस्तानी गट हिंदुस्थानच्या सघराज्यांतून फुटून आपलें निराळें सार्वभौम राज्य स्थापन करण्याचा एकसारखा निकरानें प्रयत्न करीत राहतील! म्हणून शिष्टमडळानें देशाच्या फाळणीचा प्रश्न आज तात्पुरता जरी गाडलेला असला तरी दहा वर्षांनीं हा पाकिस्तानचा वेताळ अधिक भेसूर होऊन तो देशाच्या छाताडावर बसल्याखेरीज राहणार नाहीं!

**त्यानंतर** सर्वांत अत्यंत महत्त्वाचा प्रश्न असा उभा राहतो कीं, **ही स्वातंत्र्याची योजना शिष्टमंडळानें तयार केली खरी; पण यांत देशाचें स्वातंत्र्य कोठें आहे? 'स्वातंत्र्य' हा शब्द कागदावर लिहून किंवा स्वातंत्र्याचें चित्र कागदावर रंगवून कांहीं देशाला स्वातंत्र्य मिळत नाहीं!** लग्नाच्या मिरवणुकीत ताशेवाल्याला महत्त्व नसतें, नवरदेवाला महत्त्व असतें. शिष्टमंडळ स्वातंत्र्याचा नुसता ताशा बडवीत सुटलें आहे, पण घोड्यावर प्रत्यक्ष बसलेला स्वातंत्र्याचा नवरदेव कुठें दिसतच नाहीं! ब्रिटिश सरकार प्रत्यक्ष सत्तात्याग केव्हां करणार आणि देशाला पूर्ण स्वातंत्र्य केव्हां मिळणार, ही अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे. ब्रिटिश साम्राज्यामध्यें राहण्याचें किंवा त्यामधून बाहेर जाण्याचें पूर्ण स्वातंत्र्य आम्ही हिंदुस्थानला देण्याचें ठरविलेलें आहे, अशी पैठणी भाषा ॲटलीपासून तों क्रिप्सपर्यंत सर्वच गोरे वापरीत आहेत. एवढेंच नव्हे तर तुम्ही स्वतंत्र झालां तरी आम्ही जगाच्या अंतापर्यंत तुमचे मित्र म्हणून राहणारच असें सोंवळें भांडें या लोंचट भिक्षुकांनीं आमच्या ओसरीवर ठेवून दिलेंच आहे. क्रिप्स म्हणतो कीं, "जितक्या लौकर

तुम्ही घटना तयार करायला सुरुवात कराल तितक्या लौकर ती तयार होईल. आणि जितक्या लौकर घटना तयार होईल तितक्या लौकर आम्ही, सर्व सत्ता हिंदी सरकारच्या ताब्यांत देऊन इथून चालायला लागू! " हें म्हणणें कितीही ठीक असलें तरी ब्रिटिशांच्या सत्तात्यागाची तारीख शिष्टमंडळानें जाहीर करून ठेवली असती म्हणजे मग बाकीचें बोलणें बोलावयाची पाळी आली नसती. घटना तयार होईपर्यंत जें सर्वपक्षसंमत 'मध्यंतर सरकार' व्हाइसरॉयसाहेब स्थापन करणार आहेत तें काय स्वतंत्र हिंदुस्थानचें राष्ट्रीय सरकार थोडेंच आहे? त्या सरकारमध्यें युद्धमंत्र्या-सकट जरी सर्व हिंदी सभासदांचा समावेश होणार असला तरी 'नकारघंटा' हातांत घेऊन त्यांच्या टाळक्यावर जोंपर्यंत व्हाइसरॉयसाहेब बसणार आहेत, तोंपर्यंत त्या 'सरकारजमा' टोळक्याला 'मध्यंतर सरकार' म्हणणें म्हणजे जनतेच्या डोळ्यांत निव्वळ धूळ टाकण्यासारखें आहे! पार्लमेंटच्या कायद्यांत बदल केल्यावाचून 'मध्यतर सरकार' बनवितां येणार नाहीं. हीच शंका 'हाऊस ऑफ लॉर्डस्' मध्यें लॉर्ड सायमन् यांनीं जेव्हां प्रदर्शित केली, तेव्हां 'मध्यंतर सरकार' म्हणजे फक्त 'कार्यमंत्र्याची अदलाबदल' (Change of personnel) असा मजूर सरकारनें खुलासा केला

तेव्हां 'मध्यंतर सरकार' ही शिष्टमंडळानें जनतेच्या डोळ्यांत फेंकलेली निव्वळ धूळ आहे! **जोंपर्यंत हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याची घोषणा पार्लमेंटनें कायदा करून केलेली नाहीं, 'मध्यंतर सरकार'ला मान्यता दिलेली नाहीं, आणि घटनासमितीच्या हातीं सार्वभौम अधिकार दिले नाहींत, तोंपर्यंत शिष्टमंडळाची स्वातंत्र्याची बात म्हणजे, महात्मा गांधी म्हणतात त्याप्रमाणें, एक प्रॉमिसरी नोट आहे, यांत शंका नाहीं!** 'देशामधून ब्रिटिश सैन्य केव्हां काढून नेणार?' असा प्रश्न लॉर्ड पेथिक लॉरेन्स यांना केला असतां ते म्हणाले, "सत्तासंक्रमण होईपर्यंत देशामध्यें कायदा आणि सुव्यवस्था प्रस्थापित करणें हें ब्रिटिश सरकारचें कर्तव्य आहे"! म्हणजेच ही सगळी 'प्रॉमिसरी नोटे'ची भाषा आहे! आज देशाच्या प्रत्यक्ष हातामध्यें असें कांहीं मिळत नाहीं! एवढेंच काय पण ॲमेरीबाबाच्या साहचर्यानें बदनाम झालेलें तें अमंगळ 'इंडिया

ऑफिस ' बंद करण्याची भाषा देखील शिष्टमंडळ काढीत नाहीं ! ही योजना प्रसिद्ध करतांना तिच्याबरोबरहि आगामी ' मध्यंतर सरकार ' च्या मंत्र्याचीं नांवें जर शिष्टमंडळानें प्रसिद्ध केलीं असतीं तर किती मौज झाली असती बरें ! म्हणजे मग शिष्टमंडळाच्या या योजनेकडे पाहण्याचा जनतेचा दृष्टिकोण आजिबात निराळाच झाला असता ! ' मध्यंतर सरकार ' मध्यें कोणाकोणाला आणि कसकशा प्रमाणांत सामील करण्याची व्हाइसरॉयसाहेब यांची इच्छा आहे हें याच वेळीं कळलें असतें, म्हणजे मग शिष्टमंडळाचा सारा डाव पूर्णपणें लक्षांत आला असता !

**शिष्टमंडळाच्या** योजनेमधल्या दोषांची ही सारी मालिका नाहींशी झाल्यावांचून किंवा शिष्टमंडळाकडून ती दुरुस्त करून घेतल्यावांचून कॉंग्रेसला ही योजना कशी मान्य करता येईल हें कांहीं आम्हाला कळत नाहीं ! त्या-खेरीज संस्थानी प्रजेच्या स्वातंत्र्याचा जो खेळखंडोबा या योजनेनें करून ठेवलेला आहे तो तर निराळाच ! डॉ. आंबेडकरांच्या महारापेक्षांही संस्थानी प्रजेची स्थिति या योजनेमुळें फारच केंविलवाणी होणार आहे ! **कांहींही असलें तरी शिष्टमंडळाची ही योजना, आहे त्या स्वरूपांत कॉंग्रेसनें स्वीकारणें म्हणजे देशाच्या स्वातंत्र्याच्या नरड्याला नख लावण्या-सारखें आहे ! कॉंग्रेस असली अक्षम्य चूक कधींही करणें शक्य नाहीं !** ही योजना आपल्याला मान्य नाहीं असा जांवईरुसवा जीनांनीं कितीही दाखवला तरी, आहे त्या स्वरूपांत मुस्लिम लीग ती मोठ्या आनंदानें मान्य करील, याविषयीं आम्हांला मुळींच शंका नाहीं. कारण ही योजना मिळवण्यासाठीं मुस्लिम लीगनें स्वतः कांहींच झगडा केला नाहीं, पराक्रम केला नाहीं कीं त्याग केला नाहीं ! कॉंग्रेसच्या जीवावर त्यांची सारी आरास आणि मिजास. मागितल्या-पेक्षांही जास्त जर तिला शिष्टमंडळाकडून फुकटांत आज मिळत आहे तर मुस्लिम लीगनें त्याला नकार काय म्हणून द्यावा ? ही योजना तात्पुरती डागडुगी करून कशी तरी स्वीकारावी आणि घटनासमितीचें काम एकदांचें सुरू करावें, म्हणजे मग स्वातंत्र्याच्या वाटेंत जसजशा अडचणी येतील, तसतशा त्या काढून टाकतां येतील, असें मानणारा एक मोठा पक्ष या देशांत आहे. कॉंग्रेसमधले कांहीं

'उजवे' कार्यकर्तेही या मताचे आहेत. गेलीं वीस पंचवीस वर्षें सरकारशी सतत झगडून जनतेचे पुढारी दमून गेलेले आहेत, हें कांही खोटें नाहीं. त्यांना थोडीशी विश्रांति या वेळीं पाहिजे आहे. आणि तशी विश्रांति नवीन घटना तयार होईपर्यंत म्हणजे कमींत कमी दोन तीन वर्षें ही घटना स्वीकारल्यानें त्यांना मिळणार आहे ! तथापि **जनतेच्या या थकलेल्या आणि दमलेल्या पुढाऱ्यांना आमची नम्र विनंति आहे कीं, तुम्ही अवसानघात करून ही योजना स्वीकारूं नका आणि ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या सांपळ्यांत सांपडून हिंदी स्वातंत्र्याच्या झगड्याला ऐन वेळीं असा दगा देऊं नका !**

१८५७ सालापासून तों तहत १९४२ पर्यंत हिंदी राष्ट्र आपल्या स्वातंत्र्यासाठीं झगडत आहे. लक्षावधि लोकांनीं या स्वातंत्र्यासाठीं आपलें रक्त सांडलें आहे आणि आपले संसार उधळलेले आहेत. बेचाळीस ऑगस्टच्या आंदोलनापासून तर जनतेच्या या स्वातंत्र्य-झगड्याला विलक्षण तेज आणि सामर्थ्य प्राप्त झालेलें आहे ! नेताजी सुभाषचंद्र बोसांच्या पराक्रमानें इकडची दुनिया तिकडे करून टाकलेली आहे. देशाच्या स्वातंत्र्यासाठीं आज वाटेल तो त्याग आणि पराक्रम करण्याची जनतेची तयारी झालेली आहे. जनतेच्या क्रांतिकारक सामर्थ्याची लाट आज शिगेला जाऊन पोहोंचलेली आहे ! स्वातंत्र्याचा अरुणोदय सातान्यामध्यें केव्हांच होऊन चुकलेला आहे. आतां स्वातंत्र्याच्या सूर्योदयाला फारसा अवकाश नाहीं ! आतां शेवटचा निकराचा प्रयत्न करायचा तेवढा बाकी राहिलेला आहे ! पुढारी दमले असतील तर त्यांनीं बाजूला व्हावें आणि जनतेला वाट करून द्यावी. जनता आज पुढाऱ्यांच्या पुढें जायला तयार आहे ! स्वातंत्र्याचा हा झगडा अगदीं संपावयाच्या बेताला येऊन ठेपला असतांना ही योजना मध्येंच स्वीकारणें म्हणजे, आतांपर्यंत स्वातंत्र्यासाठीं देशानें जो झगडा चालविलेला होता त्याच्यावर पाणी ओतून, राष्ट्राचा विश्वासघात करण्यासारखें आहे. ही योजना स्वीकारल्यानें स्वातंत्र्य तर मिळणार नाहींच नाहीं, पण स्वातंत्र्य मिळविण्यासाठीं राष्ट्रानें आजपर्यंत जी तपश्चर्या व तयारी केलेली आहे तिला मात्र यामुळें काडी लागेल !

क्षणिक मोहाला बळी पडून राष्ट्राच्या चिरंतन स्वातंत्र्याचा घात पुढाऱ्यांनीं या वेळीं करूं नये ! अशी चूक जर ते करतील तर राष्ट्र त्यांना त्याबद्दल कधींहि क्षमा करणार नाहीं ! याउप्पर त्यांची मर्जी ! कांहींही झालें तरी स्वातंत्र्याचा शेवटचा झगडा कांहीं टळत नाहीं ! **या योजनेचें काय होणार असेल तें होवो, आम्ही त्याबद्दल मुळींच चिंता करीत नाहीं. देशांतील क्रांतिकारक आणि स्वातंत्र्यवादी तरुणांनीं मात्र स्वातंत्र्याच्या अंतिम झगड्यासाठीं सदैव सिद्ध राहावें ! बेचाळीसच्या आठ ऑगस्टला महात्माजींनीं उभारलेला ‘ चले जाव ’ च्या बंडाचा झेंडा जयशाली करण्याची जबाबदारी देशांतल्या ऑगस्टवादी तरुणांवरच आहे यांत शंका नाहीं.**



## शिष्टमंडळाची योजना फेकून द्या : : : ९

हिंदी स्वातंत्र्याच्या प्रश्नाबाबत काँग्रेसचें आणि मुस्लिम लीगचे कांहीं जमेना म्हणून शेवटीं नाइलाज होऊन ब्रिटिश शिष्टमंडळाच्या चार साहेबांनी दिनांक सोळा मे रोजीं जो निवाडा देऊन ठेवलेला आहे, त्याचें पुढें आतां काय होणार हें खरोखरच त्या परमेश्वराला ठाऊक! हा निवाडा जेव्हां प्रसिद्ध झाला तेव्हां पहिल्या झटक्यासरशीं त्याची मोहिनी पुष्कळांच्या मनावर अशी कांहीं पडली कीं, कांहीं विचारूं नका! त्यांना वाटलें कीं, आली—आली—स्वातंत्र्याची भागीरथी आली धो धो वहात देशाच्या डोसक्यावर! हर्षातिशयानें पुष्कळांना अगदीं वेड लागायची पाळी आली! कांहीं कांहीं लोकांनीं तर त्या आनंदाच्या भरांत कमरेचें सोडून डोक्याला गुंडाळलें; आणि आपला विजय झाल्याच्या ते आरोळ्या ठोकूं लागले! हिंदुमहासभेच्या अडणीवरचे अनेक शंख तर हर्षानें गडबडां लोळूं लागले! काँग्रेसमधले अनेक बावळट कार्यकर्तेदेखील भांबावून गेले,! 'अत्यंत समाधानकारक, एकदम समाधानकारक!' म्हणून गर्गमुनीप्रमाणें ते आपले बाहु उभारून आणि बेभान होऊन नाकासमोर चालूं लागले. नागपूरच्या आमच्या एका मित्रांना तर शिष्ट—मंडळाच्या या योजनेमध्यें 'भारतीय स्वातंत्र्याचा जयजयकारच' पहावयाला मिळाला! बिचारा! आम्ही मात्र हा निवाडा वाचून आमचें डोकें बहकूं दिलें नाहीं. आम्ही अगदीं थंडगार डोक्यानें या निवाड्याचा विचार केला; आणि आमची खात्री झाली कीं, स्वातंत्र्याच्या गोड गोड थापा मारून भोळ्या हिंदी जनतेला आणखी दहा वीस वर्षें तरी तसेंच झुलवीत ठेवण्याचें हें ब्रिटिश साम्राज्यशाहीचें मोठें कावेबाज कारस्थान आहे.

**तथापि** या निवाड्याचें भवितव्य काय आहे ? त्याचा स्वीकार कॉंग्रेस किंवा मुस्लिम लीग करणार किंवा नाही ? याबद्दल गेले सोळा दिवस आणि सतरा रात्रीं आम्ही आमचें डोकें खाजवून विचार करतों आहात, पण अजून आमच्या डोक्यामध्यें कांहीं त्याबाबत प्रकाश पडत नाहीं. याचें कारण या योजनेबद्दल कोणीच स्पष्टपणें, रोखठोकपणें आणि मनमोकळें करून बोलत नाहीं ! जो तो गुळमुळीत बोलतो आहे आणि खरें बोलण्याचें टाळतो आहे. शिष्टमडळाची योजना चागली असेल तर ती योजना चांगली आहे, अत्यंत चांगली आहे, आम्ही त्या योजनेचा स्वीकार करणार, साऱ्या जगानें शिव्या दिल्या तरी करणार, असें छाती ठोकपणें कॉंग्रेसनें किंवा मुस्लिम लीगनें म्हणावयाला पाहिजे ! बरें, योजना वाईट असली तर आम्ही तिचा स्वीकार करणार नाहीं, आम्ही तिचें तोंड देखील पाहणार नाहीं, असें तरी त्यांनी म्हणावयाला हवें ! पण त्यात अमुक वाईट आहे अन् तमकें चांगले आहे, कांहीं गोष्टी स्वीकारण्यासारख्या आहेत अन् कांहीं झिडकारण्यासरख्या आहेत, असली अर्धवट पसंतीची अन् नापसंतीची नरसोपत केळकरी भाषा बोलण्यांत काय अर्थ आहे पडित ? जवाहरलालाप्रमाणें आम्हालाही हा सारा निरर्थक शाब्दिक जजाळ वाटतो आहे ! मुद्याचा प्रश्न टाळून जो तो नुसत्या शब्दांचा आणि भाषेचा फुलोरा फुलवीत बसलेला आहे ! देशाच्या स्वातन्त्र्याचा प्रश्न नुसत्या शाब्दिक वाटाघाटीनें का मिटणार आहे ? शिष्टमडळाच्या निवाड्यावर गेल्या सोळा दिवसांमध्यें जीना, कॉंग्रेस वर्किंग कमिटी, महात्मा गांधी आणि खुद्द शिष्टमंडळ यांनीं आपापले अभिप्राय भरपूर व्यक्त केलेले आहेत. पण त्या अभिप्रायांमधून खरें सांगावयाचें म्हणजे कांहीं देखील व्यक्त झालेलें नाहीं ! मुस्लिम लीग किंवा कॉंग्रेस ह्या योजना स्वीकारणार किंवा काय, त्या प्रश्नावर या अभिप्रायानीं मुळींच प्रकाश टाकलेला नाहीं. भाषा ही मनुष्याला आपलें मनोगत व्यक्त करण्यासाठीं दिलेली नसून ती तें लपविण्यासाठीं दिलेली आहे, असें जें कोणीसें म्हणून ठेवले आहे ते या वेळीं खरें वाटूं लागतें. हॅम्लेट म्हणतो त्याप्रमाणें सारे लोक नुसते ‘ शब्द ! शब्द ! ’ बोलताहेत ! आणि जसा

जसा अधिक वेळ जातो आहे तशी तशी ही शाब्दिक कटकट अधिकच कर्कश आणि किचकट होऊं लागलेली आहे.

**आम्हांला** पाकिस्तान दिले नाहीं तर आम्ही चंगीझखानापेक्षां आणि तैमुरलंगापेक्षांही भयकर करून दाखवूं. नाहीं तर रशियाला तार करून त्याला या देशावर स्वारी करायलाच बोलवूं, अशा एकाहीपेक्षां एक भयंकर धमक्या देणारे ते गोंडेवाले आणि तुमानवाले मुसलमान बहादूर शिष्टमंडळानें पाकिस्तानला जाहीर नकार दिला तरी अद्यापि कुठें उताणे पडून घोरत आहेत, कोणास ठाऊक ! देशाची फाळणी करण्याचें शिष्टमंडळानें प्रत्यक्षपणें नाकारलें तरी मुसलमान जनता रागानें खवळून कांहीं उठली नाहीं किंवा तिनें देशांत दंगेधोपे करावयालाही फारशी कुठें सुरुवात केलेली नाहीं ! त्यामुळें मुस्लिम लीगवाल्याची दमबाजी आणि थापेबाजी मात्र चांगलीच उजेडांत आली यांत संशय नाहीं ! तथापि, शिष्टमंडळाच्या या पाकिस्तानविरोधी योजनेचा धिःकार कोणाही मुस्लिम लीगवाल्यानें आपल्या नेहमीच्या भेंडीबाजारामधल्या मवाली भाषेंत अद्यापि केलेला नाहीं याचें कारण म्हणजे या योजनेमध्यें पाकिस्तानला दिलेला नकार हा केवळ शाब्दिक आहे हें मुस्लिम लीगवाल्यांना आतां पक्कें कळून चुकलेलें आहे.

**उलट** या योजनेमुळें खरोखरच त्यांना अतिशय आनंद झालेला आहे. कारण त्यानीं मागितल्यापेक्षां किती तरी जास्त त्यांना या योजनेमध्यें मिळालेलें आहे. त्यांना प्रत्यक्ष पाकिस्तान निराळें काढून दिलें असतें तरी देखील त्यांचा इतका फायदा झाला नसता. कारण निर्भेळ 'पाकिस्ताना' मध्यें फक्त बहुसंख्य मुस्लिम जनतेचाच समावेश झाला असता. पण या योजनेमध्यें 'ब' आणि 'क' या नांवाचीं जीं चोरटी पाकिस्तानें बनविलेलीं आहेत, त्यांमध्यें कोटच्यवधि हिंदु व शीख जनतेवर राज्य करण्याची संधि या मुसलमानांना आतां मिळणार आहे !

**जीनासाहेब** एवढें आकांडतांडव करणारे आणि आभाळाला डोकें टेकवून भाषा बोलणारे ! आजपर्यंत कोणतीही गोष्ट कधीं त्यांच्या पसंतीला

उतरलेली नाहीं ! पण या योजनेवर मात्र ते मनामधून बेहद्द खूष ! त्यामुळें त्या योजनेला बाह्यात्कारी विरोध करण्याचें त्यांनीं ओढून ताणून जें सोंग आणलेलें आहे, तें कांहीं त्यांना फारसें नीट साधलेलें नाहीं. पाकिस्तान आम्हांला मिळालें नाही तर आम्ही हिमालयाला आग लावू आणि अरबी समुद्र पिऊन टाकूं, असली खाऊंगिळूची भाषा करणारा जिनासारखा आग्यावेताळ ही योजना वाचून पुण्याच्या ‘ डेक्कन क्लब ’ मधल्या एकाद्या विझलेल्या म्हाताऱ्या मवाळाप्रमाणें बोलू लागलेला आहे. ते म्हणतात, “ पाकिस्तानच्या आमच्या मागणीला शिष्ट-मंडळानें नकार दिला याबद्दल आम्हांला वाईट वाटते ! ” लक्षांत ठेवा बरें पाकिस्तान शिष्टमंडळानें नाकारलें म्हणून जनाब जिनांना नुसतेंच वाईट वाटतें आहे ! वस्तुतः असली भाषा बोलण्याचा जीनासाहेबाचा मूळचा पिंड नाहीं ! यावरूनच आमच्या मतें त्यांना या योजनेबद्दल मनामधून खरें काय वाटत असलें पाहिजे हें उघड होतें. आता या योजनेविरुद्ध त्यांनीं कांहीं मामुली आक्षेप काढले आहेत; पण त्यांत कांहींच अर्थ नाहीं. अंतिम निर्णय त्यांनीं मुस्लिम लीगच्या कार्यकारी मंडळाकडे जो सोंपविला आहे तो त्यांचा एक पोरकट डावपेंच आहे. मुस्लिम लीगला ही योजना शंभर टक्के मान्य आहे ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्वच्छ आहे. सिंधचे मुख्य प्रधान सर गुलामहुसेन हिदायतुल्ला यांनीं या योजनेला कॉंग्रेस-लीगनें संमति द्यावी असा जो आग्रह चालविलेला आहे तो कांहीं उगाच नाहीं !

**कॉंग्रेस** वर्किंग कमिटीनें मात्र या योजनेवर अधिक विधायक स्वरूपाची टीका केलेली आहे यांत शंका नाहीं. वर्किंग कमिटी म्हणते कीं, “या योजने-मध्यें भाविष्यकाळच्या स्वतंत्र हिंदुस्थानचें चित्र कांहीं आम्हांला स्पष्टपणें दिसून येत नाहीं कारण जोंपर्यंत परकी सरकारचें सैन्य या देशाच्या भूमीवर आहे तोंपर्यंत या देशामध्यें स्वातंत्र्य येणें शक्यच नाहीं. शिवाय ‘ मध्यतर सरकार ’ ची घटना ही स्वातंत्र्याला पोषक नाहीं व्हाईसरॉय वर राहिला तरी हें सरकार कायदेमंडळाला जबाबदार असायला पाहिजे. तसें कुठें आहे? नवीन घटना समिति उद्यां देशाला जें स्वातंत्र्य देणार आहे असें आपण म्हणतों त्या स्वातंत्र्याचा अरुणोदय या ‘ मध्यंतर सरकार ’ मध्यें झालेला आपल्याला आज

दिसला पाहिजे. " वर्किंग कमिटीचें हें म्हणणें योग्यच आहे. देशाला पूर्ण स्वातंत्र्य, बलिष्ठ मध्यवर्ति सरकार, संपूर्ण प्रांतिक स्वायत्तता, लोकशाहीच्या तत्त्वाला धरून राज्यकारभार आणि जनतेच्या मूलभूत हक्काचें स्वातंत्र्य इतक्या गोष्टी मिळाल्याबांचून कोणतीही स्वातंत्र्याची योजना काँग्रेसला स्वीकारतां येणें अशक्य आहे; पण स्वातंत्र्याबद्दल एवढी सारी भाषा हडसून खडसून बोलून देखील ही योजना आम्हांला मुळींच पसंत नाही, ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे. उलट सध्याच्या अवस्थेत याबाबत निर्णायक मत आपल्याला देतां येत नाही, असें म्हणून काँग्रेस वर्किंग कमिटीने एक शाब्दिक जंजाळ मात्र विनाकारण निर्माण करून ठेवलेलें आहे.

हें शाब्दिक जंजाळ असें आहे. वाचकांनीं हा भाग जरा काळजीपूर्वक वाचावा. शिष्टमंडळाच्या निवाड्यांतील पंधराव्या कलमामधलें पांचवें पोटकलम असें आहे, " कार्यकारी मंडळाच्या आणि कायदेमंडळाच्या दृष्टीनें गट तयार करण्याची प्रांतांना मुभा असावी; आणि प्रत्येक गटानें कोणते सर्वसाधारण प्रांतिक विषय आपल्या हातीं घेतां येईल तें ठरवावें. " त्यानंतर योजनेच्या एकोणिसाव्या कलमामधलें पाचवें पोटकलम असें आहे; " ( घटना समितीच्या प्रांतिक सभासदांचे अ, ब आणि क असे तीन विभाग पाडण्यात येतील. ) मग या विभागांनीं आपल्या विभागात समाविष्ट झालेल्या प्रांताची घटना बनविण्याच्या कामाला लागलें पाहिजे. तसेंच त्या प्रांतांना गटराज्याची घटना लागू करावयाची कीं नाहीं तें आणि त्या गटाला कोणते प्रांतीय विषय द्यावयाचे तेंही ठरविलें पाहिजे. या गटामधून प्रांताना ( नवीन समितीखालीं निवडणुकी झाल्यानंतर ) बाहेर येण्याचा अधिकार आहे. शिष्टमंडळाच्या योजनेमधील या दोन कलमामध्यें काँग्रेस वर्किंग कमिटीला विसंगति दिसून आली. ती अशीं कीं, पंधराव्या कलमाच्या पांचव्या पोटकलमान्वयें आपापले ' गट ' बनविण्याची मोकळीक प्रांताना जर देण्यांत आली आहे, तर एकोणिसाव्या कलमाच्या पांचव्या पोट-कलमान्वयें प्रांतांना ' अ ', ' ब ' व ' क ' अशा तीन विभागांत आरंभापासून-च समाविष्ट होण्याची सक्ती कां म्हणून ? या सक्तीच्या भाषेमुळें प्रांतिक स्वाय-त्ततेच्या तत्त्वाला या योजनेमध्यें हरताळ लागलेला आहे. ही विसंगति काढून

टाकण्यासाठीं आणि शिष्टमंडळाच्या योजनेचें शिफारसी स्वरूप कायम राखण्यासाठीं पधराव्या कलमांतील त्या पोटकलमाचा असा अर्थ लागल्यावांचून गत्यतर नाही, कीं, "ज्या विभागांत आपल्याला घालण्यात आलेलें आहे त्या विभागांत आपण जायचें की नाहीं याचा निर्णय प्रांतांनीं आधीं करावयाला पाहिजे!" कॉंग्रेस वर्किंग कमिटीच्या योजनेतल्या या दोन कलमांमधल्या विसंगतीवर बोट नेमकें ठेवून शिष्टमडळाच्या अगदीं वर्माचाच चिमटा घेतलेला आहे!

**प्रांतांची** अशी आरंभीच सक्तीनें गटबाजी कां करण्यात आली? सरहद्दप्रांत हा संपूर्ण कॉंग्रेस प्रांत असतां पजाब आणि सिंध या मुस्लिम लीग बहुमतवाल्या प्रांताच्या दावणीला 'ब' गटामध्यें तो कां दडपण्यांत आला? मुस्लिम लीगवाल्या बगालच्या 'क' गटात आसामसारख्या शभर टक्के कॉंग्रेस प्रांताला का अडकविण्यांत आला? एका तोंडानें बोलावयाचें कीं, प्रांतांना आपापले गट तयार करावयाला आम्हीं मुभा दिलेली आहे, तर दुसऱ्या तोंडानें म्हणावयाचें कीं, नाही. अमुक अमुक प्रांतांनीं अमुक अमुक गटांत सक्तीनें सामील झालेंच पाहिजे! तर तिसऱ्या तोंडानें (हें असतें काय?) म्हणावयाचें कीं, नवीन घटना झाली म्हणजे मग मात्र या गटांमधून प्रांतांना पुन्हा बाहेर पडायची मोकळीक मिळेल! हा प्रांताच्या प्राणांशी शिष्टमंडळानें निष्कारण काय चावटपणा चालविलेला आहे? वर्किंग कमिटीप्रमाणें महात्मा गांधींचेंही योजनेमधल्या या विसगतीकडे लक्ष गेलेलें आहे. "सध्यांच्या या परिस्थितींत इतका चांगला खलिता ब्रिटिश सरकारला बनवितां येणें शक्यच नाहीं." असा गांधींजींनीं या योजनेवर जो अभिप्राय दिलेला आहे त्याचा मतलब लाक्षणिक अर्थानेंच समजावा!

'**स्वातंत्र्याची** सनद' घडविण्याकरिता दोन्ही पक्षांना कमींत कमी काय देऊन एकत्र आणता येईल तें शिष्टमडळानें या योजनेंत दिलेलें आहे, असें गांधीजी म्हणतात. ही योजना म्हणजे केवळ विनंति आहे; तो एक सल्ला आहे, ती काहीं सक्ती नाहीं; त्या योजनेमधलें एक अक्षर देखील कायद्याच्या दृष्टीनें आपल्यावर बंधनकारक नाहीं. उलट ही योजना ब्रिटिश सरकारवरच

बंधनकारक आहे, वगैरे वगैरे पुष्कळ गोष्टी महात्माजींनीं या योजनेविषयीं सांगितलेल्या आहेत. पण त्यांमध्यें आम्हांला विशेष कांहीं अर्थ वाटत नाहीं. प्रांतांच्या गटरचनेबाबत महात्माजींनीं योजनेमधल्या कलमाचा जो अन्वयार्थ लावलेला आहे, तो कितपत बरोबर आहे हें जोखून पाहणें महत्त्वाचें आहे. गांधीजी म्हणतात, " हा खलिता अत्यत उदात्त आहे. त्यांत ' सक्तीचें ' तत्त्व घुसडून त्या खलित्यामधल्या उदात्तपणाची माती शिष्टमंडळ करील असें मला वाटत नाहीं. पधराव्या कलमानें दिलेलें स्वातत्र्य ऐकोणिसावें कलम कसे हिरावून येईल बरें ? आसामनें ' क ' गटात जावें का न जावें हे सर्वस्वीं त्या प्रांताच्या मर्जीवरच अवलंबून आहे ! खेरीज त्या गटांत आरंभीं सामील होऊनही पुन्हां बाहेर येण्याची शेवटीं मोकळीक जी ठेवलेली आहे, तें प्रांतांना शिष्टमंडळानें दिलेलें दुहेरी संरक्षण आहे. घटना समितीची पहिली सभा जेव्हां भरेल तेव्हां त्या सभेंत प्रांतांनीं अध्यक्षांना खुशाल निक्षून सांगावें कीं, आम्हांला नेमून दिलेल्या या गटांत आम्हांला राहावयाचें आहे का नाहीं तें ! गांधीजी शेवटीं म्हणतात की, " योजनेमधल्या विसंगत कलमाचें मी म्हणतों असेंच स्पष्टीकरण करावयाला पाहिजे. आणि तसेंच जर तें असेल तर मग या योजनेबाबत काळजी करण्याचें कारण काय ? " योजनेमधल्या दोन कलमांच्या विसंगतीबाबत हें जें शब्द जंजाळ उत्पन्न झालेलें आहे त्यांत मोठे मोठे लोक अडकून पडलेले आहेत. आमचे मित्र ' लोकमान्य ' कार पांडुरंगपत गाडगीळ हेदेखील या शाब्दिक चक्रव्यूहांत अडकलेले आहेत; आणि ' ग्रूप ' म्हणजे ' गट ' ' सेक्शन ' म्हणजे ' विभाग ' म्हणजे ' ग्रूप ' हा ' सेक्शन ' नव्हे अन् ' सेक्शन ' हा ' ग्रूप ' नव्हे, असली घटापटाची निरर्थक बडबड ते देखील करू लागले आहेत. आतां काय सांगावे !

**तथापि** वर्किंग कमिटीनें दाखविलेल्या या कलमांच्या विसंगतीवर खुद्द शिष्टमंडळानें जो खुलाशाचा प्रकाशझोत टाकलेला आहे त्यामुळें सर्व गोष्टी इतक्या लख्ख दिसूं लागल्या आहेत कीं, वास्तविक हें शब्दांचें जंजाळ यापुढें असें चालविणें आतां अगदीं अनावश्यक आहे ! या योजनेला एवढासुद्धां धक्का

लागतां कामा नये. ही आहे त्याच स्वरूपांत स्वीकारली पाहिजे असें शिष्टमंडळानें पुन्हां बजावून सांगितलें आहे. तरी लोक या योजनेबद्दल आतां विनाकारण शिष्टमंडळाला सूचना कां करीत बसले आहेत कोणास ठाऊक ? योजनेमध्ये नेमून दिलेल्या गटात सामील व्हावयाचें कीं नाही हें प्रांतांनीं आरंभीच ठरवावें असा जो अर्थ लावण्याचा कॉंग्रेस वर्किंग कमिटीनें प्रयत्न केला आहे तो आपल्याला मुळींच मान्य नाहीं असें शिष्टमंडळानें स्पष्टपणें सांगितलेलें आहे. आणि नंतर याबाबत शिष्टमंडळानें आणखी एक जें विधान केलेलें आहे, त्यांत शिष्टमंडळाचा सारा कावा स्पष्टपणें उघडकीस आलेला आहे. म्हणून त्या विधानाकडे आम्ही आमच्या वाचकाचे मुद्दाम लक्ष वेधतों. शिष्टमंडळ म्हणतें कीं, ‘ हे प्रांत विशिष्ट तऱ्हेनें कां एकत्रित करण्यांत आलेले आहेत, ह्याचीं कारणें जगजाहीर आहेत. आमच्या योजनेचें हेंच एक मौलिक वैशिष्ट्य आहे ! ” लक्षांत ठेवा, ‘ब’ आणि ‘क’ या गटांत जे प्रांत मर्जीविरुद्ध दडपण्यांत आले आहेत, त्याच्यामागें शिष्टमंडळाचा एक विशिष्ट हेतु आणि डाव आहे. आपल्या पाकिस्तानमध्यें याच प्रांताचा समावेश व्हावा अशी आजपर्यंत मुस्लिम लीगची जी मागणी होती ती पाकिस्तान नाकारल्याचा नुसता देखावा करून शिष्ट-मंडळानें या गटाच्या आंवरणाखालीं मान्य केलेली आहे, हें आतां आपल्याच तोंडून त्यांनीं कबूल केलेलें आहे. म्हणूनच त्यांच्या योजनेचें हें एक अपरिवर्तनीय वैशिष्ट्य होऊन बसलेलें आहे. याचा स्वच्छ, आणि स्पष्ट अर्थ असा आहे कीं, ‘ब’ आणि ‘क’ गट अशीं नांवें देऊन शिष्टमंडळानें मुस्लिम लीगच्या पदरांत जें पाकिस्तान टाकलेलें आहे, तेंच त्यांच्या योजनेचें खरें स्वरूप आहे. आणि ते स्वरूप शिष्टमंडळ कांही केल्याही बदलावयाला तयार नाहीं ! महात्मा-जींना आणि वर्किंग कमिटीला विसंगत वाटणाऱ्या आपल्या योजनेमधल्या पोटकलमांचा अर्थ इतक्या उघडपणें शिष्टमंडळानें नीट समजावून सांगितल्या-नंतर आतां त्यांच्याशी निष्कारण वाटाघाटी करण्यांत काय अर्थ आहे ? बाकी शिष्टमंडळाच्या या खुलाशाला आतां महात्माजी काय उत्तर देताहेत तें बरीक पाहाण्यासारखें आहे.

**गटामध्यें** आरंभीं सामील झाल्यानंतर मागाहून प्रांतांना बाहेर येण्याची मुभा ठेवण्यांत आली ही या योजनेमधील फार मोठी लुच्चेगिरी आहे. ती देखील शिष्टमंडळाच्या या खुलाशामध्यें बाहेर आलेली आहे. तिकडे आम्ही वाचकांचें मुद्दाम लक्ष वेधू इच्छितों. जनाब जीनांनीं असा एक आक्षेप काढला होता कीं, 'गटामधून प्रांतानें शेवटी बाहेर पडावयाचें तें लोकांची सार्वत्रिक मत नोंदणी करून ठरवावें असें आमचें मागणे असता शिष्टमंडळानें तें मान्य केलें नाहीं. नवीन घटनेप्रमाणें निवडून आलेल्या नव्या कायदेमंडळानें तें ठरवावें असें शिष्टमंडळ म्हणतें.' याबाबत शिष्टमंडळानें आपल्या खुलाशामध्यें जें उत्तर दिलें आहे, त्यांत त्यांनीं आपली पूर्वीची भाषा सोडून देऊन जवळ जवळ जीनांचेंच म्हणणें मान्य केलें आहे. शिष्टमंडळ म्हणतें कीं, 'गटामधून प्रांतांनीं बाहेर पडावें कीं नाहीं तें जनताच ठरविणार आहे. कारण, नवीन घटनेप्रमाणें होणाऱ्या नव्या कायदेमंडळाच्या निवडणुकी प्रांतानें त्या गटांत रहावें का न रहावें या एकाच मुद्यावरच लढविल्या जातील आणि त्यांवर सर्वच मत-दार जनतेला निर्णय देण्याची संधि मिळेल !' याचा स्पष्ट अर्थ असा कीं 'ब' आणि 'क' गटांतून म्हणजे 'पाकिस्ताना'मधून 'सरहद्द प्रांत' किंवा 'आसाम' यांनीं बाहेर पडावयाचें कीं नाहीं याच मुद्यावर नवीन घटनेच्या पहिल्या निवड-णुकीचे मतदानाचे नियम आणि मतदारांच्या याद्या 'ब' आणि 'क' गट बहुमतानें तयार करणार ! म्हणजे काय बिशाद आहे सरहद्दप्रांत आणि आसाम फिरून पाकिस्तानच्या जबड्यांमधून बाहेर पडतील ! छे, छे, आम्हांला तर शिष्टमडळाचा हा सारा डाव निव्वळ डांबिसपणाचा वाटतो ! आज सरहद्द आणि आसाम प्रांत हे जे कॉंग्रेसच्या वर्चस्वाखालीं आपणांला दिसत आहेत ते कॉंग्रेसच्या हातामधून काढून घेऊन त्यांना जबरदस्तीनें पाकिस्तानच्या घशांत घालण्यासाठीं शिष्टमंडळानें हे 'ब' आणि 'क' नांवाचे दोन सांपळे बनविलेले आहेत आणि त्या सांपळ्यांमधून आरंभीं कोणत्याही प्रांतांना बाहेर जाण्याची त्यांनीं मुभा ठेविलेली नाहीं ! म्हणून आमचें म्हणणें आतां असें आहे कीं यापुढें या योजनेवर किंवा त्या योजनेमधील विसंगतीवर शाब्दिक जंजाळ अधिक

वाढवीत न बसतां कॉंग्रेसनें ही योजना एकदम फेंटाळून टाकावी आणि स्वातंत्र्याच्या पुढील लढ्याच्या तयारीला लागावें! खरोखर शिष्टमंडळाची ही योजना म्हणजे हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या मानगुटीवर पाकिस्तानचा राक्षस कायमचा बसवून या देशांतलें आपलें स्थान सुरक्षित करण्याची साम्राज्यशाहीची ही भयंकर युक्ति आहे, याविषयी आम्हांला तर मुळींच शंका राहिली नाही!



## समसमानतेच्या समंधाची बाधा ! : : ५

सध्यां साऱ्या हिंदुस्थानचें लक्ष दिल्लीकडे लागून राहिलेलें आहे. प्रत्येक तासातासाला आणि प्रत्येक घटकेला दिल्लीहून काय बातमी येते हें समजण्याला जो तो उत्सुक झालेला आहे. दिल्लीहून फारशी चांगली बातमी येईल अशी आशा मात्र कोणाला वाटत नाही. गेल्या आठवड्यांत या वाटाघाटीचें वातावरण इतकें बिघडून गेलेलें आहे कीं, आता त्याच्यामधून फारसें कांहीं निष्पन्न होईल असें वाटत नाहीं. महात्मा गांधी परवां परवांपासून आपल्या प्रार्थनेच्या वेळेच्या भाषणांत आभाळाकडे बघून,' 'फळांची आशा न धरतां निष्काम करीत जावें,' असें जेव्हां सांगू लागले, तेव्हां आतां या वाटाघाटींमध्यें कांहींच राम राहिलेला नाहीं असें आम्हीं ओळखलें. घरांत एकादें म्हातारें माणूस बरेंच दिवस मरत पडावें म्हणजे घरांतल्या मंडळींची जशी स्थिति होते तशी या वाटाघाटीमुळें सर्वांची स्थिति झालेली आहे. तें म्हातारें माणूस धड बरेंही होत नाहीं अन् धड मरतही नाहीं ! मेलें एकदाचें तें म्हणजे माणसाला आंघोळ करून मोकळें होतां येतें आणि पुढच्या कामाला तरी लागता येतें ! तसें या वाटाघाटीचें झालेलें आहे. शिष्टमंडळाच्या या योजनेमध्यें काहीं एक अर्थ नाहीं हें प्रत्येक स्वातंत्र्यवादी माणूस ओळखून आहे. या योजना फेंकून द्या, अशी कॅांग्रेस समाजवादी पुढाऱ्यांनीं आणि पुरोगामी गटाच्या कार्यकर्त्यांनीं अगदीं स्पष्टपणें घोषणा केलेली आहे. हें जरी खरें असलें तरी कॅांग्रेसला हें लफडें सहजासहजीं हातावरून काढून टाकतां येणार नाहीं, कॅांग्रेस एक जबाबदार संस्था आहे. एकदां तिनें जें काम हातीं घेतलें तें तिला अगदीं शेवटपर्यंत तडीला पोंहोंचवायला पाहिजे. उगाच डोक्यांत राख घालून अर्धीमधीं का तें

तिला सोडतां येईल ? या दृष्टीनेंच कॉंग्रेस या वाटाघाटीच्या मढ्याच्या नाकाला सूत लावून अद्यापपर्यंत मोठ्या सहनशीलतेनें बसून आहे. वाटाघाटीचा शेवटचा श्वास संपला म्हणजे कॉंग्रेस शिष्टमंडळाच्या नांवानें आंघोळ करून तावडतोब पुढील कामाला लागेल !

**ब्रिटिश** शिष्टमंडळानें सोळा मे दिवशीं प्रसिद्ध केलेली देशाच्या स्वातंत्र्याची योजना ही अत्यंत कुचकामी आहे अशी आम्हीं त्याच वेळीं तिची नाडीपरीक्षा करून ठेवलेली आहे. या योजनेमध्यें देशाचे स्वातंत्र्य आम्हांला तरी कुठें दिसत नाहीं; एवढेंच नव्हे तर ती योजना स्वीकारल्यानें बेचाळीस सालीं सुरू झालेला स्वातंत्र्याचा जो लढा कॉंग्रेसनें जवळ जवळ जिंकीत आणलेला आहे त्यामध्यें कोलदांडा पडेल आणि तो बिनमुदत लांबणीवर पडेल याविषयीं आमची खात्री आहे! मुस्लिम लीग आणि संस्थानें यांच्या साथीनें हिंदी जनतेच्या स्वातंत्र्ययुद्धाच्या क्षेत्रामध्यें गुप्त सुरुंग पेरून ठेवण्याचें हें ब्रिटिश शिष्टमंडळानें मोठें कुशल कारस्थान रचलेलें आहे. म्हणून तें याच वेळीं हाणून पाडलें पाहिजे असें आम्ही आमचें मत त्याच वेळी निर्भीडपणें व्यक्त करून ठेवलेलें आहे. ज्याअर्थीं कॉंग्रेसच्या आतापर्यंतच्या सर्व शत्रूंनीं या योजनेचा एकमतानें स्वीकार करावा असें एकजात म्हटलेलें आहे त्या अर्थीं या योजना अत्यंत टाकाऊ असल्या पाहिजेत हें उघड आहे! याला आणखी निराळा पुरावा देत बसण्याचें काहीच कारण नाहीं!

हिंदुमहासभेचे हंगामी अध्यक्ष धर्मवीर अण्णाराव भोपटकर यांनीं शिष्टमंडळाची योजना तिच्यामध्यें कांहींही उणेपणा असला तरी स्वीकारावी असें आपलें स्वच्छ मत दिलेलें आहे. शिष्टमंडळानें पाकिस्तानला शब्दांत तरी नकार देऊन टाकला एवढ्यावरच हे बेटे सदाशिव पेठेंतले भटजी एकदम खूष होऊन गेले, आणि आपल्या कमरेचें डोक्याला गुंडाळून हिंदुमहासभेचा विजय झाला तें म्हणून टणाटणा नाचू लागले. आम्ही पूर्वींच भाकित करून ठेवल्याप्रमाणें जनाब जीनांनीं आणि मुस्लिम लीगनें या योजनेचा मोठ्या उत्साहानें स्वीकार केलेला आहे. सुरुवातीला त्यांनीं योजनेविरुद्ध नाकें मुरड-

ण्याचें पुष्कळ सोंग आणलें होतें. पण त्या सोंगांत कांहीं दम नव्हता हें त्याच वेळीं आम्हीं सांगितलें. आंधळा मागतो एक आणि देव देतो दोन ! तसें मुस्लिम लीगचें झालें. त्यांनीं एक पाकिस्तान मागितलें तर शिष्टमंडळानें त्यांना दोन पाकिस्तानें देऊन टाकलीं. आणि सरहद्दप्रांत नि आसाम या प्रांतांसारख्या कट्टर कॉंग्रेसवादी प्रांतांच्या माना त्यांच्या हातांत कायमच्या देऊन टाकल्या. आणखीन् हो त्यांना काय पाहिजे ? कसलाही लढा किंवा श्रम न करतां फुकटांत जर त्यांच्या लुगीमध्यें हीं पाकिस्तानें पडलीं तर त्यांनी तीं काय म्हणून नाकारावीं ? योजना स्वीकारतांना जीनांनीं ही गोष्ट मुळींच लपविली नाहीं. शिष्टमंडळाच्या योजनेंत आपल्या पाकिस्तानचे नाकडोळे स्पष्टपणें दिसत असल्याचें त्यांनीं सांगितलें आणि या योजनेच्या आधारावर पुढल्या दहा वर्षांत आपण मुसलमानांना पाकिस्तान मिळवून देऊ अशी त्यानी घोषणा केली ! संस्थानिकांनींहि या योजनेचा स्वीकार केलेलाच आहे. कारण ब्रिटिश राज्यकर्ते या देशातून निघून गेल्यानतर हे संस्थानिक म्हणे सपूर्णपणें स्वतत्र होणार आहेत ! चैन आहे लेकाच्यांची ! मग ते या योजनेचा स्वीकार कां करणार नाहींत बरें ? एकुण काय, तर हिंदुसभेचे अध्यक्ष, मुस्लिम लीग आणि संस्थानिक या कॉंग्रेसच्या कट्टर शत्रूंनीं या योजनेचा स्वीकार केलेला आहे, असें असतां या योजनेवर आतां कॉंग्रेस काय इतका विचार करीत बसलेली आहे. हे आपल्याला पहावयाला पाहिजे ! ज्या योजनेमध्यें जीनाला हिंदुस्थानचे दोन तुकडे दिसत आहेत त्या योजनेमध्यें कॉंग्रेसला स्वतंत्र आणि अखड हिंदुस्थान दिसुं शकेल, असें मानणेंच मुळीं चुकीचें आहे. मग असें जर आहे तर, 'एक घाव अन् दोन तुकडे' या न्यायानें कॉंग्रेस या योजनेचा निकाल कां लावून टाकत नाहीं ?

**शिष्टमंडळाची** योजना प्रसिद्ध झाल्यानंतर महात्मा गांधी आणि कॉंग्रेस वर्किंग कमिटी यांनीं त्या योजनेवर आपापलीं भाष्यें प्रसिद्ध केलीं. वर्किंग कमिटीला या योजनेमध्यें देशाच्या स्वातंत्र्याचें चित्र कुठेंच दिसून आलें नाहीं. महात्माजींना मात्र या योजनेमधून स्वातंत्र्याची सनद निर्माण करतां येईल अशी शक्यता दिसली. ते म्हणाले, "ब्रिटिश सरकारला जेवढें देतां येईल तेवढें त्यांनीं दिलेलें आहे." तथापि शिष्टमंडळाच्या निवाड्यामधल्या पंधराव्या कलमांतील

पांचव्या पोटकलमाच्याबाबत दोघेही पोंटाळून बसले. ज्या विभागांत आरंभीं प्रांतांना ढकलण्यांत आलेलें आहे त्या विभागांतून बाहेर येण्याची त्याना मोकळीक आहे, असा त्या पोटकलमाचा अर्थ वर्किंग कमिटीनें लावला तर महात्माजी म्हणाले कीं, “ एवढ्या उदात्त खलित्यामध्यें सक्तीचें तत्त्व मुळीं असेलच कसें ? ” पण त्याबाबत शिष्टमंडळानें स्पष्ट खुलासा करून सांगितलें कीं, वर्किंग कमिटी आणि महात्मा गांधी यानी त्या पोटकलमाचा जो अर्थ लावलेला आहे तो चुकीचा असून, आपापल्या विभागामधून प्रांताना बाहेर पडण्याची मुभा आरंभीं मुळींच ठेवण्यात आलेली नाहीं! शिष्टमंडळाच्या या खुलाशाला महात्माजी काय उत्तर देतील तें वाचावयाला आम्ही टपून बसलों होतों. पण महात्माजींनीं तसें करण्याचें टाळलेलें आहे. आपण जाहीर केलेल्या योजनेची चौकट आपणाला एवढीसुद्धां बदलता येणार नाहीं, असें शिष्टमंडळानें सांगितल्यानंतर महात्माजी आणि कॉंग्रेस वर्किंग कमिटी यांनीं योजनेबाबत अधिक वाटाघाटी करावयाचें बंदच केलें. त्याचें कारण असें कीं, शिष्टमंडळाच्या योजनेमधील कलमांचा किंवा पोटकलमांचा अर्थ लावण्याचा अधिकार शिष्टमंडळाचा नसून तो घटनासमितीचा आहे, असेंच दोघांनाहि वाटतें. घटना समिति तयार झाल्यानंतर आपण बघूं कीं, पंधराव्या कलमांतील पांचव्या पोटकलमाचा अर्थ आपण म्हणतों असा आहे कीं, शिष्टमंडळ आतां करतें तसा आहे! तेवढ्यासाठीं पुढच्या साऱ्या वाटाघाटी आतांच थांबवून धरण्यामध्यें काय अर्थ आहे! या एकाच दृष्टीनें मग कॉंग्रेस ‘मध्यंतर सरकार’ बनविण्याच्या प्रश्नाकडे वळली. पण त्या मार्गांत समसमानतेचा सैतान येऊन समोर उभा राहिला आणि त्यामुळें वाटाघाटींचें स्वरूपच पार बदलून गेलें!

ह्या समसमानतेचा संबंध पहिल्या सिमला परिषदेच्या वेळीं जन्माला आला. तथापि त्या वेळींही समसमानतेला कॉंग्रेसनें मुळींच मान्यता दिलेली नव्हती. कार्यकारी मंडळाच्या पंधरा जागांपैकीं कॉंग्रेसनें फक्त तीनच जागा मुस्लिम लीगला देऊं केलेल्या होत्या. लॉर्ड वेव्हेल यांनींही त्या वेळीं जीनाची समानतेची मागणी मान्य केली नाहीं म्हणून पहिल्या सिमला परिषदेचा त्या वेळीं बाजा वाजला! मग आतां जीना समसमानतेचा हट्ट कां धरून बसले आहेत बरे? खरें पाहतां त्यांना असा हट्ट धरून बसण्याचें कांहींच कारण नाहीं. हिंदुस्था-

नांत हिंदु आणि मुसलमान अशीं दोन राष्ट्रें आहेत म्हणून हिंदूंच्या बरोबरीनें मुसलमानांना राज्यकारभारांत भाग मिळावयाला पाहिजे असें ते पूर्वी म्हणत असत; पण दोन राष्ट्रांच्या या त्यांच्या सिद्धांताला शिष्टमंडळानें आपल्या योजनेमध्यें कायमची मूठमाती देऊन टाकलेली आहे. असें असूनही ही योजना जर जीनांनीं स्वीकारलेली आहे तर मग समसमानतेची मागणी करण्याला आतां त्यांना काय बरें तोंड आहे ? कॉंग्रेसचें हेंच म्हणणें आहे. दोन राष्ट्राचा सिद्धांत आणि त्याच्या बरोबर समसमानतेचें तत्त्व आतां शिष्टमंडळानें निकालांत काढलेलें असल्यानें फिरून तो प्रश्न आतां विचारांत घेतां येणार नाहीं असें कॉंग्रेसनें लॉर्ड वेव्हेल यांना स्पष्टपणें सांगितलें आहे. जीनांना आणि मुस्लिम लीगला जेवढ कांहीं मिळेल तेवढें पाहिजेच आहे. त्यांना पाव पाहिजे, लोणी पाहिजे अन् वर मुरंबाही पाहिजेच आहे. दोन पाकिस्तानें मिळून वर त्याना मध्यवर्ति राज्यकारभारात समसमानतेच्या लोण्याचा गोळाही आणखी चापायला मिळाला तर तो काय त्यांना नको आहे ? पण कॉंग्रेसनें या वेळीं समसमानतेच्या तत्त्वाला स्पष्टपणें नकार देऊन मुस्लिम लीगच्या लोभीपणाला आणि लोचटपणाला चागलीच थप्पड लगावलेली आहे ! समसमानतेला तात्पुरती मान्यता दिली तर तेवढ्या बळावर हें उटाचें पिल्लू हिंदी राजकारणाच्या तंबूंत कायमचें मुक्काम करून बसेल हें कॉंग्रेस चांगलेंच ओळखून आहे. शिवाय पुढील हदा वर्षांत पाकिस्तान स्थापन करण्याच्या प्रतिज्ञेनें 'मध्यंतर सरकार'मध्यें सामील होऊं पाहणाऱ्या 'मुस्लीम लीग' ला कॉंग्रेसनें तरी समसमानतेचा हक्क काय म्हणून द्यावा ? अखंड हिंदुस्थानची कल्पना मान्य करून जर मुस्लिम लीग मध्यवर्ति सरकारात कॉंग्रेसशीं सहकार्य करावयाला तयार होईल तर समसमानताच काय; पण मुस्लिम लीगला कॉंग्रेस काय वाटेल तें द्यावयाला तयार होईल ! पण जीना जोंपर्यंत आहे तोंपर्यंत हें होणें कालत्रयीं शक्य नाहीं !

कॉंग्रेसनें 'मध्यंतर सरकार' मध्यें समसमानतेचें तत्त्व मान्य करण्याच्या बाबतींत लॉर्ड वेव्हल यांना स्पष्टपणें नकार दिलेला आहे, म्हणून त्या खडकावर शेवटीं शिष्टमंडळाच्या वाटाघाटीचें तारूं फुटणार आणि तेरा आठवड्यांपूर्वी या देशांत आलेले हे ब्रिटिश शिष्ट हात हालवीत आले तसे रिकामे परत जाणार

असें पुष्कळांनीं भाकित केलेलें आहे. पण आम्हांला तसें वाटत नाही. “ सम-समानतेचें आश्वासन लॉर्ड वेव्हेल यांनीं आधी आपणांला दिलें म्हणून आपण ही योजना स्वीकारली आणि आतां व्हॉईसरॉयसाहेब आमचा विश्वासघात करीत आहेत ! ” असा कांगावा जनाब जीना यांनीं जरी कितीहि चालविला तरी त्याच्यांत कांहींच दम नाहीं ! कॉंग्रेसने ‘ मध्यंतर सरकार ’ मध्यें भाग घेण्याचें नाकारलें तर राज्यकारभाराची धुरा स्वतःच्या एकट्याच्या खांद्यावर घेण्याची मुस्लिम लीगची छाती नाहीं, आणि शिष्टमंडळालाहि तो मार्ग पत्करण्याचें धैर्य व्हावयाचें नाहीं. मुस्लिम लीगवांचून ‘ मध्यतर सरकार ’ बनविण्याचें सामर्थ्य कॉंग्रेसमध्यें असलें तरी मुसलमानांना खूष करण्यासाठीं धडपडणाऱ्या शिष्ट-मंडळाला त्याबद्दल आस्था वाटणें शक्य नाहीं. समसमानतेच्या बाबतींत कॉंग्रेसनें आपली भूमिका अशीच अढळ ठेवली तर जनाब जीना झक मारीत त्याला कशीबशी मान्यता दिल्यावांचून राहणार नाहींत. कारण पुढील दहा वर्षांत त्यांना ‘ ब ’ आणि ‘ क ’ गटामधून पाकिस्तान निश्चितपणें निर्माण करण्याची शक्यता जर दिसते आहे, तर ते ही संधि एवढ्या तेवढ्यासाठीं कां म्हणून घालवितील ? कॉंग्रेसचें म्हणणें मुस्लिम लीगला शेवटीं मान्य करावेंच लागलें. तथापि त्या मान्यतेमधून पाकिस्तानवादी मुसलमानांचें अखंड आणि स्वतंत्र हिंदुस्थानवादी कॉंग्रेसजनांचें जें कांहीं धेडगुजरी ‘मध्यंतर सरकार’ अस्तित्वांत येईल तें एक दिवस तरी सरळ राज्यकारभार करूं शकेल किंवा काय याची आम्हांला शंका आहे. शिष्टमंडळाची योजनाच मुळीं इतकी घातुक आहे कीं, त्या योजनेच्या अन्वयें निर्माण झालेली घटनासमिति किंवा बनविण्यांत आलेलें ‘मध्यंतर सरकार’ प्रत्येक पावलों पावलीं वाटेंत अडून बसल्याविना राहणार नाहीं. म्हणून ही योजना आज स्वीकारणें म्हणजे आजचें मरण उद्यांवर ढकलणें एवढाच त्याचाअर्थ होय ! या योजनेच्या मार्गानें देशाला स्वातंत्र्य मिळणें अगदीं अशक्य आहे. त्यासाठीं कॉंग्रेसला आज ना उद्यां निराळा लढा हा लढावा लागणारच ! तो कांहीं टळत नाहीं ! हें या वेळी ओळखूनच कॉंग्रेसनें या योजनेचें घोंगडें आपल्या गळ्यामध्यें अडकवून जनतेची दिशाभूल करण्याच्या भानगडींत पडूं नये असें आमचें म्हणणें आहे !



# अखेर म्हाताऱ्यानें गांठलेंच : : : ६

**दिल्ली** येथें गेले तीन महिने ज्या राजकीय वाटाघाटी चालूच राहिलेल्या आहेत त्यांचें आतां एक लांबलचक आणि कंटाळवाणें असें हरिदासी आख्यानच होऊन बसलेलें आहे. कुठूनही तें सांगावयाला सुरुवात केली आणि कुठेंही ते संपविलें तरी मुद्याच्या दृष्टीनें फारसें बिघडत नाहीं. या एरडाच्या गुऱ्हाळामधून आतां काय निष्पन्न होणार आहे हें तर सांगणें अतिशय कठीण होऊन बसलेलें आहे. तीन महिन्यापूर्वी हिंदुस्थानात पाऊल टाकल्यापासून या शिष्टमंडळानें या देशामध्यें एवढें कांहीं बौद्धिक धुकें आणि मानसिक घोटाळा निर्माण करून टाकलेला आहे कीं, आतां आपण आहोत कुठें आणि जाणार कुणीकडे याचा मोठ्या मोठ्या माणसांना भ्रम पडून राहिलेला आहे. त्यांनीं देशापुढें ठेवलेली स्वातंत्र्याची योजना म्हणजे एक 'भूलभुलैय्या' किंवा 'चक्रव्यूह' आहे. या चक्रव्यूहामध्यें जो एकदा अडकेल तो पुन्हां सहीसलामत काही बाहेर येणार नाहीं. त्या योजनेमधल्या कोणत्या शब्दाच आणि कोणत्या कलमाचा काय अर्थ होईल आणि त्यातून कोणकोणता नवा अर्थ बाहेर निघेल हे एक परमेश्वराला नव्हे तें एक त्या शिष्टमंडळालाच ठाऊक! म्हणूनच महात्मा गांधीजींनी अगदीं प्रारंभीं प्रार्थना करून ठेविली होती कीं, या योजनेमधल्या इंग्रजी शब्दाचा अर्थ उमजण्याची बुद्धि परमेश्वर आम्हांला देवो! या योजनेच्या जो जो नादीं लागला त्याची शेवटीं फजिती झाली, अजून झाली नसली तरी पुढें होईल! अगदीं नक्की.

**हिंदुसभेचे** टेंपररी अध्यक्ष धर्मवीर अण्णाराव भोपटकर आणि त्यांच्या पेठेमधील कांहीं भगवे गणंग यांना तर या योजनेमध्यें हिंदुमहासभेचा प्रचंड

विजय दिसला! ती योजना डोक्यावर घेऊन ते अक्षरशः नाचू लागले. पण परवां दिल्लीला हिंदुमहासभेच्या कार्यकारिणीनें ही योजना एकदम नापसंत ठरविल्यामुळें महाराष्ट्रांतले हे महामह हिंदुत्वविष्ठ सपशेल तोंडघशींच पडले! आमचे मित्र 'लोकमान्य'कार पांडुरंगपंत गाडगीळ! एवढे कांटेकोर, अभ्यासू आणि चोखंदळ संपादक! पण या योजनेच्या नादीं लागून त्यांनींही आपलें चांगलेंच हसूं करून घेतलें. सोळा मेची योजना त्यांना अतिशय समाधानकारक वाटली. कॉंग्रेस ही योजना एकदम स्वीकारणार असाच त्याचा अभिप्राय पडला; पण पुढें कॉंग्रेस या योजनेची जेव्हां हळूहळू चिरफाड करू लागली आणि देशामधलें जनमत जेव्हां योजनेविरुद्ध गरम होऊं लागलें, तेव्हां गाडगीळांची भयंकरच तिरपीट उडाली आणि गेल्या सोमवारीं 'मध्यंतर सरकार'बाबत जेव्हां व्हॉइसरॉयानीं आपला निवाडा जाहीर केला तो वाचून तर आम्हीं पोट धरधरून हंसलों. गाडगीळ म्हणाले, "या सर्व बाबी विचारांत घेता कॉंग्रेस वर्किंग कमिटी व्हॉइसरॉयाची योजना फेटाळून लावीलच असें भविष्य सांगण्याची घाई आम्ही करीत नाही आणि या नाजूक आणि स्फोटक प्रसंगी कॉंग्रेस वर्किंग कमिटीनें कोणताही निर्णय घेतला तरी तो योग्य असलच असें आम्ही आधीं म्हणून ठेवतों." गाडगीळांनीं हा जो बगारामी विनोद निर्माण केला त्याबद्दल आम्ही गाडगीळांना दोष देत नाही. हा त्या योजनेचा परिणाम आहे. शिष्टमंडळाच्या या फसव्या योजनेच्या नादीं जो जो लागेल तो तो भ्रमिष्ट होईल, त्याचा 'बगाराम' होईल, असेंच त्याच्यांत 'मृगजळ' आहे. म्हणूनच त्याच्या मागें धांवून स्वतःचें हंसूं कोणी करून घेऊ नये असें आम्ही गेला महिनाभर जीव तोडून सांगत आहोंत.

इतकें 'मंगलाचरण' गायल्यानंतर आतां आम्ही आख्यानाचें चऱ्हाट वळायला सुरुवात करतों. सोळा मे दिवशीं शिष्टमंडळानें आपली घटना समितीची योजना जाहीर केली. ही योजना मुस्लिम लीगनें स्वीकारली. पण ती कॉंग्रेसला समाधानकारक वाटली नाहीं. तिनें शिष्टमंडळाकडून कांहीं गोष्टींचा खुलासा मागितला. शिष्टमंडळानें सांगितलें की, "ही योजना आहे त्या स्वरूपांतच तुम्हांला स्वीकारावी लागेल. आम्ही तिच्यांत आतां कांहींही बदल करू शकणार नाहीं.'

त्यावर कॉंग्रेसनें दिर्घकालीन प्रश्न तात्पुरता बाजूला ठेवला आणि ती ‘मध्यतर सरकार’च्या प्रश्नाचा विचार करू लागली. पण या बाबतींतही पुन: पेंचप्रसग निर्माण झाला. कारण ‘मध्यंतर सरकारा’त मुस्लिम लीग समानता मागूं लागली. मध्यवर्ति राज्यकारभारात कोणत्याही तऱ्हेची समानता आपण मुसलमानांना द्यावयाला तयार नाहीं, असें कॉंग्रेसनें व्हॉइसरॉयांना स्पष्टपणें बजाबून सांगितलें. ह्या आणि आणखी दोन तीन मुद्यावर कॉंग्रेसनें शिष्टमडळाची योजना चौदा जून रोजी साफ फेंटाळून लावली ! तेव्हा व्हॉइसरॉय साहेबांना पुन: निवाडा देण्याची पाळी आली. लीग आणि कॉंग्रेस यांची एकवाक्यता कांहीं कधीं व्हायची नाही; दर वेळेला त्यांचें गाडें अडून बसावयाचें आणि मग सरकारनें अखेर त्यावर आपला निर्णय द्यावयाचा आणि मग त्यानीं तो मुकाट्यानें मान्य करावयाचा (किंवा न करावयाचा !) हा खाक्या आतां हिंदी राजकारणांत चालू झाला आहे. त्याप्रमाणें व्हॉईसरॉयांनीं सोळा जून रोजीं संमिश्र सरकार बनविण्याच्या बाबतचा आपला दुसरा निवाडा जाहीर केला !

देशापुढें फार महत्त्वाचे आणि बिकट प्रश्न आहेत. ते सोडविण्यासाठीं अत्यंत कर्तबगार आणि प्रातिनिधिक अशा तऱ्हेचें ‘मध्यंतर सरकार’ असलें पाहिजे म्हणून व्हॉइसरॉयांनीं कॉंग्रेस, मुस्लिम लीग आणि अल्पसंख्यांक यांच्यापैकीं चौदा जणाची निवड केलेली आहे. मुस्लिम लीगचे पांच, कॉंग्रेसचे सहा (हरिजन धरून) एक शीख, एक ख्रिस्ती व एक पारशी असे हे चौदा होत. सोळा मेच्या योजनेप्रमाणें घटनासमितीचें काम सुरू होणार आहे, या गोष्टीला या चौदा जणांची मान्यता आहे असें समजून व्हॉईसरायानीं त्यांना मध्यंतर सरकारांत सामील होण्यासाठीं व्यक्तिश: आमंत्रणें धाडलेलीं आहेत. या चौदा जणांना कोणकोणतीं खातीं द्यावयाचीं किंवा त्यांच्यामध्यें कामाची कशी कशी वांटणी करावयाची, हें व्हॉईसरॉय पक्षनेत्यांच्या संमतीनें ठरविणार आहेत. या चौदा जणांची निवड करण्यामध्यें कोणतेंही जातीय तत्त्व वापरलेलें नाहीं. किंबहुना कोणताही जातीय प्रश्न सोडविण्याचे वेळीं जातिप्रमाणाचा हा नमुना आदर्शभूत म्हणून समजण्यांत येणार नाहीं, असें व्हाइसरॉयांनीं आश्वासन दिलेलें आहे. मुस्लिम लीगनें किंवा कॉंग्रेस यापैकीं कोणत्याही पक्षानें—किंवा दोघांनींही—जर

हा निर्णय स्वीकारला नाहीं तरी देखील सोळा मेची योजना स्वीकारणाऱ्या दुसऱ्या मंडळीचें प्रातिनिधिक स्वरूपाचें असें 'मध्यंतर सरकार' आपण बनविल्यावांचून राहणार नाहीं अशीही धमकी व्हॉईसरॉयांनीं दोन्ही पक्षांना देऊन ठेवलेली आहे.

'**संमिश्र** सरकार' बनविण्याचे बाबतीत व्हॉईसरॉयानी जो हा निवाडा दिलेला आहे आणि जीं नांवें सुचविलीं आहेत त्याबद्दल कोणाला काय वाटतें हें पाहण्यासारखें आहे. महात्मा गांधी ह्यानीं तर सध्या पृथ्वीतलावरील माणसांना कळेल अशी भाषा वापरण्याचें जवळ जवळ सोडूनच दिलें आहे. शिष्टमंडळ देशांत येईपर्यंत ते राजकारणी मुत्सद्याप्रमाणें बोलत होते, पण शिष्टमंडळ आल्यापासून तर ते खरोखरच एकाद्या हिमालयामधल्या साधू-प्रमाणें कांहीं तरी अज्ञय आणि अद्भुत बोलू लागले आहेत. ते म्हणाले, व्हॉईसरॉयांचा हा निवाडा चंद्रासारखा आहे. म्हणजे त्यात सौंदर्य आहे आणि डागही पण आहे. चांगल्या दृष्टीनें बघायचें तर त्या डागानें ह्या चंद्राचें सौंदर्य उलट वाढलेलेंच आहे !" देशांमधील अनेक स्वातंत्र्यवादी लोकांना व्हाइसरॉयांच्या निवाड्याचा हा चंद्र खग्रास ग्रहण लागलेल्या परवाच्या चंद्राप्रमाणें अमंगल आणि भेसूर दिसत असतांना महात्माजींना मात्र तो एऱ्हवीच्या चंद्राप्रमाणें क्षणभर कां होईना पण—आल्हाद्कारक दिसूं शकावा हें एक नवलच नव्हे काय ! तथापि, त्याबरोबर महात्माजींनीं असेंही म्हणून ठेविलेलें आहे हें विसरू नये की, साम्राज्यशाहीच्या परंपरेचें माठोडें शिष्टमंडळ आपल्या पाठीवर घेऊन जें आलेलें आहे तें एका रात्रीमध्यें कसें बरें फेंकून देऊं शकेल ? शिष्टमंडळाच्या किंवा व्हाईसरॉयाच्या निवाड्यांमध्यें साम्राज्यशाहीचें गांठोडें सर्वस्वीं फेंकलेलें नाही हें महात्माजींचें म्हणणें मात्र बरोबर आहे.

**व्हॉइसरॉयांच्या** यादीमध्यें मुस्लिम लीगवाले पांच मुसलमान आहेत आणि एक हरिजन सोडून दिला म्हणजे पांच कॉंग्रेसवादी हिंदु राहतात. म्हणजे सर्व हिंदु आणि मुसलमान यांच्यामधल्या समानतेचें तत्त्व या यादीमध्यें गृहित धरलेलें आहे अशी मुस्लिम लीगवाल्यांनीं आणि हिंदुसभावाल्यांनीं आपली सम-

जूत करून घेतलेली आहे. त्यामुळें काहीं मुस्लिम लीगवाले या यादीवर बेहद्द खूष आहेत. ते म्हणतात, "आम्हीं मागितलेल्या सर्व मागण्या जरी व्हॉईसरॉयनीं मान्य केलेल्या नसल्या तरी हिंदु आणि मुसलमान यांची समानता तर त्यांनी मान्य केलेली आहे, इतकेंच नव्हे तर या यादीत निवडलेले पाचही मुसलमान मुस्लिम लीगवाले असल्यानें देशामधील सर्व मुसलमानांची प्रतिनिधि संस्था एकटी मुस्लिम लीगच आहे असा जो आतापर्यंत लीगचा दावा होता त्याला व्हॉइसरॉयनीं कबुली दिलेली आहे." कॉंग्रेस हरिजन श्री. जगजीवनराम यांची व्हॉइसरॉयनीं निवड केल्याबद्दल 'मुस्लिम लीग'च दिल्लीचें मुखपत्र 'डॉन' हें अत्यंत चिडलेलें आहे. तें म्हणतें, "केवळ कॉंग्रेसला खूष करण्यासाठीं व्हॉइसरॉयांनीं हा माणूस निवडलेला आहे. कॉंग्रेसमधला हरिजन हा शेड्यूल्ड कास्टचा प्रतिनिधि होऊंच शकत नाहीं. केवळ शे. का. फे. चा सभासद् हाच त्याचा प्रतिनिधि होऊ शकतो!" कॉंग्रेसचा द्वेष करणारा एखादा शे. का. फे. चा मनुष्य व्हॉइसरॉयानी निवडला असता म्हणजे तो साहजिकच मुस्लिम लीगच्या गटाला मिळाला असता म्हणून जगजीवनरामाच्या निवडीमुळें मुस्लिम लीगवाल्यांच्या जिवाचा एवढा तडफडाट झालेला दिसतो आहे. डॉ. आंबेडकर तर त्यामुळें अतिशयच भडकून गेलेले आहेत. ते म्हणतात, "आम्ही हरिजन सहा कोटी आहोंत. आम्हांला एक प्रतिनिधि देऊन चाळीस लक्ष शीख आणि तीस लक्ष ख्रिस्ती यांच्या बरोबरीनें आणून ठेविलेलें आहे. आम्हांला वास्तविक तीन प्रतिनिधि पाहिजे आहेत. पण मी दोनाला तयार आहें आम्हांला दोन प्रतिनिधि तरी द्या, नाहीं तर कांहीच देऊ नका!" (हरिजन चार कोटी असतां आंबेडकर अजून सहा कोटीच्या थापा मारीत आहेतच!)

**व्हॉईसरॉयांच्या** यादीचा आतां आपण कॉंग्रेसच्या दृष्टीनें विचार करू. व्हॉईसरायांची ही यादी म्हणजे एक तडजोड आहे. तडजोड म्हणजे आपण मागतों तें सारें थोडेंच मिळतें? तुझें थोडेंसें, माझें थोडेंसें असें मिळूनच तडजोड होते. आणि तडजोड म्हटली कीं, तत्त्वाला मुरडही बसलीच. केवळ कामचलाऊपणाचीच दृष्टि बाळगावी लागते. त्या दृष्टीनेंच आपण या यादीचा विचार करावयाला पाहिजे. कोणत्याही तऱ्हेच्या समानतेला कॉंग्रेसनें स्पष्टपणें

कार दिलेला होता. कोणत्याही तऱ्हेच्या म्हणजे हिंदुमुसलमानांच्या किंवा ॅग्रेसलीगच्या ! हें कॉंग्रेसचें म्हणणें व्हॉईसरॉयांनीं सपूर्णपणें मान्य केलेलें आहे. स्लिम लीगच्या वाट्याला आलेली पांच ही सख्या जरी त्याच्या प्राणापेक्षां धिक असली तरी कॉंग्रेसच्या वाट्याला सहा प्रतिनिधी आलेले आहेत हें सरून चालणार नाहीं ! म्हणजे कॉंग्रेस व लीग यांची समानता या यादींत हीं. आता कॉंग्रेसच्या यादींमधील हरिजन बाजूला सवर्ण हिंदु आणि (मुस्लिम गवाले ) मुसलमान याच्यामधील समानता या यादींत आहे, असें म्हणणें हा व्वळ चावटपणा आहे. 'सवर्ण हिंदु' हा शब्द कॉंग्रेस विचारसरणींत बसत हीं. पुणें करारामप्रमाणें हरिजन हा हिंदूपासून विभक्त होऊं शकतच नाहीं. ा दृष्टीनें कॉंग्रेसचे सहाजण म्हणजे सहा हिंदूच समजावयाला पाहिजेत. म्हणू- व आम्ही म्हणतों कीं, या यादींमध्यें समानतेचें तत्त्व व्हाइसरॉयांनीं मान्य लेलें नसल्यानें त्या दृष्टीनें कॉंग्रेसचा जयच झालेला आहे.

**मध्यंतर** सरकारमध्ये पाच कॉंग्रेसचे, पांच लीगवाले आणि दोन ल्पसख्याक असे बाराजण असावेत, अशी लीगची मूळ मागणी होती. तर, सख्या पंधरा असावी व त्यांत लीगवाले पांचच असावेत, असें कॉंग्रेसचें णणें होतें. अखेर व्हाइसरायांनीं चौदाची यादी जाहीर केली. हा मुस्लिम गचा पराभव तर आहेच आहे; पण तो कॉंग्रेसचाच निःसशय जय आहे. तां कॉंग्रेसच्या यादींमध्यें शरद्चंद्र बोस यांच्या नांवाऐवजीं श्री. हरेकृष्ण ताब यांचें नाव व्हॉइसरॉयांनीं आपल्या अखत्यारांत घातलेलें आहे, किंवा हद्द प्रांतामधील सरदार अबदूर रब निश्तार या कॉंग्रेस उमेदवाराकडून पराभूत लेल्या मुसलमानाची लीगच्या यादींमध्यें वर्णी लागलेली आहे किंवा लाल ल्ल्यामधील तीन आझाद वीरांच्या खटल्याच्या वेळीं सरकारी वकिलाचें काम ठेले सर एन्. पी. एंजिनियर याच्यासारख्या सरकारी नोकराची पारशी प्रति- धि म्हणून या यादींमध्ये निवड करण्यांत आलेली आहे, असे किरकोळ दोष निवाड्यांत आहेत; पण ते महत्त्वाचे नाहींत. श्री. मेहताबांचे ऐवजीं श्री. बोस ॥ सर एंजिनियरच्या ऐवजी दुसरा कोणी तरी राष्ट्रीय वृत्तीचा पारशी घ्याव- ॥ व्हॉइसरॉय कबूल आहेत असें म्हणतात. मद्रास प्रांतांत ज्यांना कॉंग्रेस-

जनांचा मुळींच पाठिंबा नाहीं त्या राजाजींना जर कॉंग्रेसतर्फे यादींत निवडतां येतें तर मग सरदार अबदूर रब निश्तार यानेंच बिचाऱ्यानें काय पाप केलें आहे बरें ? पण आम्ही या गोष्टीला फारसें महत्त्व देत नाहीं. व्हॉइसरॉयांच्या या दोघांजणांच्या यादींत बहुसंख्य ही ठणठणितपणें कॉंग्रेसच्या बाजूची आहे यांत मुळींच शंका नाहीं. मुस्लिम लीगचे पांच सभासद जर नेहमींप्रमाणें अडेल-तट्टूपणा करूं लागले तर त्यांना डावलून कॉंग्रेसपक्षाला आपला कारभार बहुमताच्या जोरावर या चौदा जणांच्या मंत्रिमंडळामध्यें करतां येईल याविषयीं आम्हांला कांहीं संदेहच वाटत नाहीं ! असें जर आहे तर मग कॉंग्रेस या यादीचा स्वीकार का करीत नाही ? आणि इथेंच तर सारी 'ग्यानबाची मेख' आहे !

**व्हॉइसरॉयांच्या** या निवाड्यामध्यें कॉंग्रेसच्या दृष्टीनें दोन गोष्टी अत्यत घातुक आहेत. प्राण गेला तरी या गोष्टी कॉंग्रेस मान्य करणार नाहीं. ह्या गोष्टी कॉंग्रेसनें मान्य केल्या म्हणजे कॉंग्रेस खलास झाला असें म्हणावयाला पाहिजे. पहिली गोष्ट म्हटली म्हणजे, सोळा मेच्या मंत्रिशिष्टमंडळाची योजना स्वीकारल्याखेरीज कॉंग्रेसला या 'मध्यंत सरकार' मध्यें भाग घेतां येत नाहीं ! वास्तविक सोळा मेची त्रिमंत्रियोजना कॉंग्रेसला मान्य नाहीं. देशाच्या पूर्ण स्वातंत्र्याचें चित्र कॉंग्रेसला त्यात मुळींच दिसत नाहीं. शिवाय आसाम—बंगाल कायदेमंडळांतील गोऱ्या सभासदांना मताधिकारी देणारी 'ब' आणि 'क' गटांमध्यें सरहद्दप्रांत आणि आसाम यांना सक्तीनें दडपणारी आणि संस्थानी प्रजेच्या स्वातंत्र्याची सपशेल पायमल्ली करणारी ही योजना चौदा जून रोजीं कॉंग्रेसनें सपशेल फेटाळलेली आहे. म्हणून 'मध्यंतर सरकार' आमिष दाखवून त्या योजनेला अप्रत्यक्षपणें कॉंग्रेसकडून मान्यता मिळाविण्याचा हा व्हॉइसरॉयांचा ( आणि शिष्टमंडळाचा ) एक धूर्त डाव आहे. कॉंग्रेस या डावानें फसणार नाहीं. याहीपेक्षां या निवाड्यांतली दुसरी अत्यंत घातुक गोष्ट म्हणजे चौदा जणांमधील पांचही मुसलमान हे मुस्लिम लीगच्या वांट्याला घालून आणि सहा हिंदु कॉंग्रेसच्या वांट्याला घालून कॉंग्रेस ही केवळ हिंदूंची प्रतिनिधि संस्था आहे असें व्हाइसरॉयांनीं ठरविलें आहे.

**कॉंग्रेस** ही राष्ट्रीय संस्था नसून केवळ हिंदूंची एक जातीय संस्था आहे आणि आपण तेवढे मुसलमानांचे एकमेव प्रतिनिधि असें ठरविण्याचा मुस्लिम लीगचा अनेक वर्षांपासूनचा डाव आहे हा डाव आतापर्यंत कॉंग्रेसनें यशस्वी होऊ दिलेला नाहीं, पण व्हाईसरॉयच्या यादीमुळें मात्र कॉंग्रेस ही सर्वस्वीं हिंदु संस्था ठरते. आणि त्या दृष्टीनें व्हाईसरॉयांचा हा निवाडा म्हणजे कॉंग्रेसला हिंदुसंस्था आणि लीगला मुसलमानाची एकमेव प्रतिनिधि ठरविणारा म्हणजे एका धोंड्यानें दोन पक्षी मारणारा असा मुस्लिम लीगचा एक प्रचंड विजयच म्हणावयाला हवा ! म्हणून कॉंग्रेसला या यादीचा स्वीकार करणें सर्वस्वीं अशक्य आहे. सरहद्द प्रांतांतील बहुसंख्य मुसलमान हे कॉंग्रेसच्या मागें आहेत. पंजाब व सिंधमधील बहुसंख्य मुसलमान हे पाकिस्तानवादी असले तरी मुस्लिम लीगच्या विरुद्ध आहेत. हिंदुस्थानामधील अकरा प्रांतापैकी अवघ्या दोन प्रांतांतच मुस्लिम लीगची मंत्रिमंडळें आहेत. ही गोष्ट स्पष्टपणें दिसत असतां केवळ मुस्लिम लीगला खूष करण्याच्या हेतूनेंच 'मध्यतर सरकारा' मधील पांचही मुस्लिम जागा लीगवाल्यांच्या हवालीं करून देशांतील लक्षावधि राष्ट्रीय आणि स्वतत्र मुसलमानांच्या बाबतींत व्हाईसरॉयांनीं मोठाच अन्याय केलेला आहे. हा अन्याय सहन करून स्वतःच्या राष्ट्रीयत्वाला डाबर फांसून घेण्याचें पाप कॉंग्रेस केव्हांही पत्करणार नाहीं. कॉंग्रेसच्या यादींत एक तरी राष्ट्रीय किंवा लीगेतर मुसलमानांचें नाव समाविष्ट झाल्यावांचून कॉंग्रेस ही यादी मान्य करणें शक्य नाहीं. ज्या लक्षावधि कॉंग्रेसप्रेमी आणि राष्ट्रीय वृत्तीच्या मुसलमानांनी देशाच्या स्वातंत्र्यासाठीं कुर्बानी केलेली आहे त्यांचा विश्वासघात झालेला उघड्या डोळ्यांनीं कॉंग्रेस कसा पाहील ? या यादीमध्यें एका राष्ट्रीय मुसलमानाचा समावेश करण्यासाठीं काय वाटेल ती किंमत कॉंग्रेसनें दिली तरी ती कमीच ठरेल !

**येथें** साऱ्या वाटाघाटींचें गाडें अडून बसलेलें आहे. 'मध्यंतर सरकार' मध्यें राष्ट्रीय मुसलमानांचा समावेश होऊं नये म्हणून जनाब जीना आणि मुस्लिम लीग जिवावर उदार होऊन लढण्याची भाषा करीत आहेत. जनाब जीनांनीं व्हॉईसरॉय साहेबांना एक लांबलचक पत्र लिहून त्यामध्यें नाना तऱ्हेचे

आडवे तिडवे प्रश्न विचारून ठेवलेले आहेत आणि आतां जर कां यांत बिगरलीग मुसलमानाचा समावेश करण्यांत आला तर मुस्लिम लीग या योजनेवर आणि मध्यंतर सरकारवर कडकडीत बहिष्कार टाकल्यावांचून रहाणार नाहीं अशीही त्यांनीं धमकी देऊन ठेवलेली आहे. एकूण काय कीं, राष्ट्रीय मुसलमानांच्या समावेशाच्या एका प्रश्नाच्या निकालावर कॉंग्रेस ' मध्यंतर सरकारा ' मध्यें सामील होणार किंवा नाहीं हें ठरविणार आहे ! हा प्रश्न शेवटीं धसाला लावण्याचें श्रेय महात्मा गांधीजींचें आहे हे विसरता कामा नये आतांपर्यंत म्हताऱ्यानें गोड गोड सैल सैल आणि पोकळ पोकळ बोलून शिष्टमंडळाला खूपच मोकळें सोडलें, पण शेवटीं ऐन खिंडींत येऊन त्यांनी त्याचा गळा पकडला! व्हॉईसरॉय ( आणि शिष्टमंडळ ) ह्यांच्यावर पुन्हां आतां तिसरा आणि बहुधा शेवटचा निवाडा देण्याची कामगिरी येऊन पडली आहे. हा निवाडा तितक्या तांतडीनें व्हॉईसरॉयांना देता येणें शक्य नाहीं. म्हणूनच मधल्या वेळांत पंडित जवाहरलालजीनीं वस्तुतः अप्रासंगिक आणि गैर लागू दिसणारें काश्मीरचें खेंगटें पत्करलेलें आहे. हा तिसरा निवाडा देताना मात्र व्हॉइसरॉयांना या बोटावरची थुंकी त्या बोटावर टाकावयाला सवड मिळणार नाहीं. अगदीं कॉंग्रेस म्हणजे तसाच निर्णय व्हाइसरॉयाना या वेळीं द्यावा लागेल. नाहीं तर मध्यंतर सरकारवर किंवा घटना समितीच्या कारभारावर चौदा जूनच्या ठरावाप्रमाणें कॉंग्रेस संपूर्णपणें बहिष्कार टाकील आणि तीन महिन्यांच्या एकंदर कामगिरीच्या साऱ्या अस्थि गोळा करून त्या टेम्स नदीमध्यें टाकण्याकरितां सुतकी चेहरे करून शिष्टमंडळाला इथून परत जावें लागेल! शिष्टमंडळाच्या सद्धेतूची आणि कर्तबगारीची आतां खरी कसोटी लागणार आहे !



## ' मध्यंतर सरकार 'च्या योजनेचा

## वेव्हेलनें बोऱ्या वाजविला बरें का : : : ७

**मागल्या** अंकांत आम्हीं भाकित केल्याप्रमाणें ' मध्यतर सरकार 'मध्यें सहा कॉंग्रेस प्रतिनिधींच्या यादींत राष्ट्रीय किंवा बिगर लीग मुसलमानाचा समावेश करण्याचा कॉंग्रेसचा हक्क व्हाइसरॉयांनीं मान्य करण्याचें नाकबूल केल्यावरून सोळा जूनचा संमिश्र ' मध्यंतर सरकारचा ' व्हाइसरॉयांचा निवाडा कॉंग्रेसनें सपशेल फेटाळून लावला ! तथापि शिष्टमंडळाच्या सोळा मेच्या दीर्घकालीन घटनेच्या योजनेला कॉंग्रेसनें मान्यता देऊन, शिष्टमंडळ आणि व्हाइसरॉय यांच्या अब्रूचें, नाहींतर जे अगदीं सपशेलच दिवाळें निघालें असतें तें तात्पुरतें वांचविलेलें आहे ! त्यामुळें तीन महिने तीन दिवस ह्या देशामध्यें राहून आणि ह्या देशाच्या स्वातंत्र्याच्या मार्गांत मुस्लिम लीगच्या आणि संस्थानिकांच्या मदतीनें अनेक तऱ्हेचे अडथळे उत्पन्न करण्याच्या भल्याबुऱ्या अनंत कारवाया करून काल रोजी निजधामाला परत जाताना या शिष्टमंडळाला आनंदाचें आणि समाधानाचें हसूं तोंडावर ओढून आणायला थोडा तरी वाव मिळाला ! घटना-समितीच्या कार्यांत कॉंग्रेस आणि लीग यांनीं भाग घ्यावयाचें ठरविलें याबद्दल आम्हाला अत्यंत आनंद वाटतो आहे." असें पत्रक सव्वीस जून रोजीं शिष्टमंडळ आणि व्हाइसरॉय यांनी जरी जाहीर केलें असलें तरी ' मध्यंतर सरकार ' मध्यें भाग घेण्याला सपशेल नकार देऊन कॉंग्रेसनें या ' गोऱ्या चौकडी 'च्या कानशीलांत अशी कांहीं झणझणीत चपराक लगावलेली आहे कीं, तिच्या वेदना त्यांनाच ठाऊक ! या वेदना ही चौकटी आपल्या हयातींत

तरी विसरणें शक्य नाहीं! चला, तीन महिने या देशाला लागून राहिलेला हा शिष्टमंडळाचा रोग या देशांतून एकदांच झाला! ठीक झालें. तीन महिने दिल्लीच्या वाटाघाटी ऐकून देशाला जी अर्धशिशीची व्याधी जडलेली होती ती तरी आतां कमी होईल! परमेश्वर करो आणि पुन्हां हें असलें गोऱ्या कोल्ह्यांचें लबाड आणि कावेबाज शिष्टमंडळ या देशांत कधींही न येवो!

या तीन महिन्यांच्या भीषण अग्निदिव्यामधून कॉंग्रेस आपल्या जीवानिशीं आणि अब्रूनिशीं सहीसलामत बाहेर पडली याबद्दल तिचें जेवढें अभिनंदन करावें तेवढे थोडेंच आहे. या तीन महिन्यांत कॉंग्रेसची बदनामी करण्याची, कॉंग्रेसला घोटाळ्यांत पाडण्याची आणि जनतेवरील कॉंग्रेसच्या अमर्याद वजनाला सुरुंग लावण्याची सरकारनें आणि कॉंग्रेसशत्रूंनीं अगदीं पराकाष्ठा केली. कॉंग्रेस चुकत तर नाहीं ना, कॉंग्रेस फसत तर नाहीं ना, अशी शंका कॉंग्रेसजनांच्या अंत:करणांत उत्पन्न होण्यासारखे अनेक क्षण तीन महिन्यांत निर्माण झाले, पण शेवटीं त्या सर्व भयांचें निराकरण झालें. संशयाचें, घोटाळ्याचें आणि गोंधळाचें दाट धुकें देशामध्यें पसरलें होतें. त्यामधून कॉंग्रेसनें आपलें राजकारणाचें तारूं साम्राज्यशाहीच्या आणि लीगशाहीच्या घातकी सामुद्रधुनीमधून आतां सुरक्षितपणें बाहेर आणलेलें आहे. म्हणून कॉंग्रेसचें सुकाणू ज्याच्या हातीं आहे त्या सर्व धुरंधर नेत्यांना आपण धन्यवादच द्यावयाला पाहिजेत! राष्ट्राध्यक्ष मौलाना अबुल कलम आझाद यांची तर जेवढी तारीफ करावी तेवढी थोडीच आहे. त्यांचीं एकेक पत्रकें आणि निवेदनें म्हणजे कॉंग्रेसच्या मुत्सद्दीगिरीचे तेजस्वी विलासच होत. 'मध्यंतर सरकार'च्या योजनेला नकार देतांना आणि घटनेच्या योजनेचा स्वीकार करतांना त्यांनीं पंचवीस जून रोजीं व्हॉइसरॉयसाहेबांना जें पत्र पाठविलें आहे त्यांत त्यांनीं 'एकाक्ष' वेव्हलची अशी कांहीं भंबेरी उडवून टाकलेली आहे कीं सांगतां सोय नाहीं! हें पत्र म्हणजे मुत्सद्दीगिरीचा एक अद्वितीय विक्रमच होय!

सर्व हिंदी जनतेच्या स्वातंत्र्यासाठी गेलीं साठ वर्षे तळहातावर शीर घेऊन झगडणाऱ्या कॉंग्रेसची भूमिका किती राष्ट्रीय, नैतिक आणि न्यायाची

आहे हें या सर्व वाटाघाटींमधून जगाच्या निदर्शनाला आलेलें आहे. राजकारणाच्या क्षेत्रांत ब्रिटिश मुत्सद्दी कितीहि वाकबगार असले आणि त्यांच्या राजकारणाला हजार वर्षांची केवढीही लांबलचक तेजस्वी परंपरा असली तरी आपल्या कुटिल भेदनीतीनें ते हिंदी जनतेला आतां यापुढें फसवू शकत नाहींत. त्यांच्या सर्व डावपेंचांना अगदीं तोडीस तोड या न्यायानें टक्कर देण्याचें सामर्थ्य हिंदी मुत्सद्यामध्यें आता निर्माण झालेलें आहे हें कॉंग्रेसनें या प्रकरणीं अगदीं निर्विवादपणें सिद्ध केलेलें आहे. कॉंग्रेसच्या या निर्णयानें, आंतरराष्ट्रीय मुत्सद्याच्या हिशेबी, कॉंग्रेसची किंमत पूर्वींपेक्षा अधिक वाढेल याविषयीं आम्हांला मुळींच संशय नाहीं. तीन महाधूर्त आणि पाताळयंत्री इंग्रज शिष्टांना खडे चारून आणि नामोहरम् करून आले तसे हात हालवीत परत पाठविणें हा काही सामान्य पराक्रम नाहीं ! कॉंग्रेसचें हें यश अपूर्व आहे !

**कॉंग्रेसच्या** या यशाचे खरे धनी महात्मा गांधी हे होत, हें बिनतक्रार कबूल केलें पाहिजे. खरोखरच हिंदी राजकारणांत महात्मा गांधी हें एक विलक्षण कोडें होऊन बसलेलें आहे. कारण महात्माजींचें राजकारण हें बाहेरच्या आवाजावर अवलंबून नसल्यानें त्याविषयी आधींपासून कांहींच अटकळ करता येत नाहीं. त्यांच्या हृदयाच्या खोल गाभाऱ्यात उठणारे जनताजनार्दनाचे हुंकार फक्त त्यांनाच ऐकूं येतात. इतराना ते कसे ऐकूं येतील ? त्याचे हे हृदयस्थ साक्षात्कार जगाला जरी गूढ आणि अज्ञेय वाटले तरी परिणामीं ते सत्य आणि कल्याणकारकच ठरतात. याचा पडताळा गेलीं पचवीस वर्षें या देशाला आलेला आहे, तो पुन्हां याही वेळीं आला. पहिल्यापासूनच शिष्टमंडळाचा सत्कार आणि तारीफ महात्माजींनी अशी कांहीं अघळ पघळ चालविली होती कीं, विचारूं नका. त्यामुळें मी मी म्हणणाऱ्या मोठमोठ्या लोकांची दिशाभूल झाली. शिष्टमंडळाची ही काय लोचट आणि चिकट 'पब्लिसिटी' महात्माजींनीं चालविलेली आहे, म्हणून तुमच्या आमच्यासारखे चांगले चांगले लोकदेखील त्यांच्यावर नाराज होऊन गेले ! खुद्द शिष्टमंडळ मात्र त्यांच्यावर अगदीं बेहद्द खूष होऊन गेले. त्यांना वाटलें कीं, बावळट म्हाताऱ्याच्या मदतीनें आपण आपल्या योज-

नेचा खोडा काँग्रेसच्या पायामध्यें बेमालूम अडकवुन देऊ ! पण त्यांना म्हातान्याचा इगा शेवटीं कळला !

राष्ट्रीय मुसलमानाचा प्रश्न धसाला लावण्याला कॉंग्रेस तेवीस जूनच्या संध्याकाळपर्यंत तयार नव्हती. केवळ हिंदूचें प्रतिनिधित्व स्वीकारून समिश्र सरकारमध्यें भाग घेण्याचें जवळ जवळ तिनें ठरविलेंच होतें. म्हणून तर जवाहरलाल नेहरू काश्मीरला निघून गेले; पण म्हातान्यानें राष्ट्रीय मुसलमानांचा प्रश्न अगदीं ताणून धरला ! त्या बाबतींत ते इंचभर देखील मागें सरकायला तयार नव्हते, त्यांनीं त्या बाबतीत इतकें ओढून धरलें म्हणून समिश्र सरकारच्या या वाटाघाटी एकदम तुटल्या आणि कॉंग्रेस ही देशांतील मुसलमानांसह सर्व जनतेची प्रतिनिधि आहे हा तिचा आजपर्यंतचा दावा खरा ठरला. कॉंग्रेस ही केवळ हिंदूची संस्था आहे हें अगदीं ठरण्याच्या बेताला आलें होतें; पण ती काँग्रेसची बेअब्रू अगदीं शेवटच्या घटकेला महात्माजींनीं वांचविली. गेले तीन महिने शिष्टमंडळाला वाटेल तितके लाब आणि सैल दोरखंड महात्माजींनीं देऊन ठेवलें होतें. आधींच त्यांनी हरकती घ्यावयाला सुरुवात केली असती तर, काँग्रेसच्या हातून हजामत करून घेऊन स्वदेशी जाणाऱ्या शिष्टमंडळाच्या फजितीचें हें गंमतदार दृश्य आपल्याला पहायलाच मिळालें नसतें. काल परत जातांना महात्माजींच्या नांवानेंच खडे फोडीत फोडीत शिष्टमंडळ गेलें असलें पाहिजे !

ब्रिटिश शिष्टमंडळामध्यें खरा कोणी जर ' कालिपुरुष ' असेल तर ते सर स्टॅफर्ड क्रिप्स हे सद्गृहस्थ होत, ही गोष्ट आतां प्रत्येकाला माहींतच झालेली आहे. मुस्लिम लीगला हातीं धरल्यावांचून ब्रिटिश साम्राज्यशाहीचा तग या देशामध्यें लागणार नाहीं ही गोष्ट क्रिप्ससाहेबांनीं पुरेपूर ओळखून ठेवलेली आहे ! म्हणूनच गेल्या तीन महिन्यामध्यें हजार लटपटी आणि खटपटी करून मुस्लिम लीगला कसें खूष करता येईल आणि काँग्रेसची नाचक्की कशी करतां येईल या एकाच खटपटींत क्रिप्ससाहेब आणि त्याचे साथीदार शिष्ट आहेत. सोळा मेच्या योजनेपासून तों सोळा जूनच्या निवाड्यापर्यंत त्यांची ही एकच तळमळ दिसून येते. पाकिस्तानला जो नकार दिला आहे तो केवळ आपला नांवापुरता ! बाकी मुस्लिम लीगची प्रत्येक लहानसहान मागणी त्यांनीं मान्य

केलेली आहे आणि त्यांनीं तिचा प्रत्येक हट्ट पुरविलेला आहे. दरेक बाबतींत कॉंग्रेसला मात्र ओढीत खाली आणलेलें आहे. नाहीं तर सरहद्द प्रांत आणि आसाम प्रांत या कट्टर कॉंग्रेसी प्रांतांचे गळे मुस्लिम लीग प्रांताच्या दावणीमध्यें अडकवून देण्याचें कांहीं कारण होतें काय? अकरा प्रांतापैकी केवळ दोन प्रांतांमध्येंच ज्या पक्षाचें मन्त्रिमंडळ आहे त्या मुस्लिम लीगला मध्यवर्ति सरकारामध्यें घसघसीत पांच जागा द्यावयाच्या या गाढवपणाला कांहीं सीमा आहे कां? पण मुस्लिम लीगला खूष करण्याकरिता हे शहाणपणाचा टेंभा मिरविणारे गोरे शिष्ट मूर्खपणाच्या वाटेल त्या पराकोटीला जावयाला तयार होते! त्याची त्यांना मुळीच लाज वाटली नाहीं! सर स्टॅफर्ड क्रिप्स स्वतः पडद्याआड राहून ही सारी बेवकूफ कारवाई त्यांनीं व्हॉइसरॉय लॉर्ड वेव्हेल यांच्या हातून करवून घेतली. खरोखर, लॉर्ड वेव्हेल यानीं या प्रकरणात अतिशय बेजबाबदार आणि बेशरम थारेबाजी करून स्वतःच्या नावाला अगदीं काळोखी लावून घेतली! संमिश्र सरकारच्या योजनेचा जो अकस्मात् बोजवारा वाजला त्याचें खापर आम्ही जनाब जीनांच्या डोक्यावर फोडीत नाही! तें खापर लॉर्ड वेव्हेल यांच्याच डोक्यावर आपण फोडलें पाहिजे. कारण या 'एकाद्या' कळीच्या नारदानें त्या योजनेचा खरा 'बट्याबोळ' वाजविला!

**कॉंग्रेसला** एक सांगायचें आणि लीगला दुसरीच थाप मारावयाची असले पोरकट डावपेंच लॉर्ड वेव्हेलनी या प्रकरणी लढविले 'मध्यतर सरकार' मध्यें कॉंग्रेसचे पांच, लीगचे पांच आणि इतर दोन असे बारा प्रतिनिधि घेऊं असें आश्वासन त्यांनीं अधींपासूनच लीगला देऊन ठेविलें होतें. कॉंग्रेसला तें मान्य नव्हतें. कॉंग्रेसला पंधरा सभासद पाहिजे होते. त्यांत पांच जागा ती मुस्लिम लीगला द्यावयाला तयार होती. आपल्या यादीमध्यें कोणाकोणाचीं नावें घालावयाची तें कॉंग्रेसनें आधीं अनौपचारिक तऱ्हेनें व्हॉईसरॉयांना सांगूनही ठेवलें होतें. तथापि, सोळा जूनला वेव्हेलनीं जो निवाडा प्रसिद्ध केला, त्यांत त्यांनीं निराळेंच कांहीं तरी तिरपगडें करून ठेविलें. चौदा जणांच्या मंडळांत पूर्वीं ज्यांच्या नांवाचा कधीं उल्लेखही झाला नव्हता, अशीं नावें त्यांनीं दडपून दिली. कॉंग्रेसच्या यादींत शरच्चंद्र बोस यांच्या ऐवजीं हरे कृष्ण मेहताब यांचें

नांव घालण्याचा चोंबडेपणा त्यांना कुणी करावयाला सांगितला होता ? सर नाशेरखान एंजिनियर या सरकारी नोकराचें नांव या यादींत कसें आलें ! आणि सरहद्द प्रांतामधला तो पहेल अबदुर रब निश्तार राजापूरच्या गगेप्रमाणें या यादीमध्यें कुठून उपटला ! बरे, कॉंग्रेसने अधींपासून आपल्यातर्फे एका राष्ट्रीय मुसलमानाचें नांवही सुचवून ठेविलें होतें. तें तें मात्र वेव्हेलनें नेमकें निवडून बाहेर काढलें आणि निर्भेळ हिंदु प्रतिनिधित्वाची माळ कॉंग्रेसच्या गळ्यांत अड कविली. मेहताबच्या बाबतींतला कॉंग्रेसचा आक्षेप वेव्हेलनें मान्य केला आणि कॉंग्रेसवर मोठी मेहेरबानी केल्यासारखें दाखविलें, पण अबदुर रब निश्तारच्या बाबतींत कॉंग्रेसनें घेतलेल्या हरकतीला त्यांनीं असें उत्तर दिलें कीं, " कोण-त्याही एका पक्षाला दुसऱ्या पक्षाच्या यादीमधल्या नांवाला आक्षेप घेण्याचा हक्क मी मान्य करीत नाही. " बरे, या तरी म्हणण्याला वेव्हेलनें शेवटपर्यंत चिकटून रहायचें नाही ? पण तेंही नाहीं. बावीस जून रोजी त्यांनीं कॉंग्रेसला आपण होऊन पत्र पाठविलें की, ' तुम्ही तुमच्या यादीमध्यें एक मुसलमान घालणार आहांत असें आम्हांला कळतें. पण त्याला आम्ही मान्यता देणार नाहीं ! '

**कॉंग्रेसनें** दुसऱ्याच्या यादीमधल्या नांवाला मात्र हरकत घेतां कामा नये आणि त्यानी मात्र कॉंग्रेसच्या यादीमधल्या नावाला हरकत घ्यावयाची, हा कोणत्या मुलखाचा न्याय आणि हें कोणत्या जगांतलें तर्कशास्त्र ? कॉंग्रेसचें राष्ट्रीयत्व शिष्टमंडळाला मान्य आहे, राष्ट्रीय मुसलमान निवडण्याचा हक्क कॉंग्रेसला आहे, हेंही शिष्टमंडळाला कबूल आहे, असें तोंडानें म्हणावयाचें आणि त्याच तोंडानें तो हक्क कॉंग्रेसनें या वेळीं मात्र तेवढा बजावू नये असें सांगावयाचें हा वेव्हेल साहेबांचा शुद्ध गाढवपणा होता असें म्हणावयाचें नाहीं तर दुसरें काय म्हणावयाचें ? बरें, इतकीही मानहानि पत्करून आणि आपल्या मूलभूत हक्काला एवढीहि मुरड घालून कॉंग्रेस ' मध्यंतर सरकार ' मध्यें जाव-याला तयार होती; पण जणू कांहीं पुरेसा गाढवपणा आपल्या हातून झाला नाहीं म्हणूनच की काय वेव्हेलसाहेबांनीं आणखीही एक भानगड निर्माण करून ठेविली. चौदा जणांच्या संमिश्र सरकारमध्यें कॉंग्रेसची बाजू नेहमीं लंगडी रहावी

म्हणून जनाब जीनांनीं वेव्हेलला एक मोठें कावेबाजपणानें लांबलचक पत्र लिहिलें. त्या पत्रांत अनेक महत्त्वाचे आणि मूलभूत हक्कांचे प्रश्न जीनांनीं उपस्थित केलेले होते. वास्तविक त्या मुद्यावर वेव्हेलनीं कॉंग्रेसशीं चर्चा करावयाला पाहिजे होती, कॉंग्रेसचा अभिप्राय विचारायला पाहिजे होता; पण त्यांनीं तसें कांहीं एक न करतां ताबडतोब दुसऱ्या दिवशीं त्या पत्राचें उत्तर लिहून जीनांच्या सर्व मागण्या एकदम मान्य करून टाकल्या आणि कॉंग्रेसचा सपशेल विश्वासघात केला. जीना यांनीं कांही खुलासे विचारायला आणि त्याचीं उत्तरें वेव्हेल यांनी परस्पर देऊन टाकावयाला इतकी घिसाडघाई केली कीं, आम्हांला तर हें एक निव्वळ सिद्धसाधकगिरीचें नीच कारस्थान आहे असें वाटतें! जीनाच्या पत्राला वेव्हेल यांनीं उत्तर दिलें नसतें तर 'समिश्र सरकार' ची योजना कॉंग्रेसनें कधींही फेटाळली नसती! सोळा मे च्या निवाड्यांत आपण अक्षराचाही फरक करावयाला तयार नाहीं, असें तोंपर्यंत म्हणणाऱ्या वेव्हेलनीं वीस जूनच्या जीनाला दिलेल्या जबाबामध्यें त्या निवाड्याचें स्वरूप सर्वस्वीच बदलून टाकलें! त्याबरोबर सर्पाचा दंश व्हावा तशी कॉंग्रेस एकदम चमकून उठली आणि तिनें एका क्षणाचाही अधिक विचार न करतां सोळा जूनच्या वेव्हेलच्या निवाड्यावर ताडकन् लाथ मारून त्याच्या ठिकऱ्या ठिकऱ्या करून टाकल्या!

हें जिना-वेव्हेलच्या पत्रापत्रीचें काय भयंकर कारस्थान होतें बरें? तें कारस्थान असें होतें, वेव्हेलच्या चौदा जणाच्या यादीमध्यें पांच मुसलमान, पांच हिंदु आणि एक हरिजन होता. लीगला त्यांनीं तिकडे असें भासविलें कीं, बघा, पांच सवर्ण हिंदूबरोबर पांच मुसलमान देऊन तुम्हाला मीं समानता दिली. आणि इकडे कॉंग्रेसला त्यांनी असें सांगितलें कीं, पहा, तुमच्या यादीमध्यें सहा हिंदु घालून आणि लीगच्या वांट्याला पांच मुसलमान देऊन मी हिंदु-मुसलमान किंवा कॉंग्रेस लीग समानतेच्या तत्त्वाला कशी मूठमाती देऊन टाकली आहे! म्हणजे हरिजन हा हिंदु आहे, असें तेवढ्यापुरतें वेव्हेलनें मान्य केलें. आतां या हरिजनाला कॉंग्रेसच्या यादीमधून कसा फोडावयाचा त्याची वेव्हेलना चिंता पडली. म्हणून एकोणीस जूनचें पत्र त्यांनीं जीनांकडून

लिहून घेतलें. त्या पत्रांत जीनांनी मोठ्या कावेबाजपणानें विचारलें कीं, " हरिजन खिश्चन, शीख आणि पारशी या अल्पसंख्यांक जमातींच्या प्रतिनिधींपैकीं एकादी जागा जर मोकळी पडली तर ती भरतांना लीगच्या नेत्याची संमति तुम्ही घ्याल काय ? " व्हॉइसरॉयांनी त्याला उत्तर देऊन टाकलें कीं, " हो दोन्ही पक्षांच्या नेत्यांना विचारूनच आम्ही या जागा भरूं ! " हें उत्तर देऊन वेव्हेलनीं ' हरिजन ' प्रतिनिधीला अल्पसंख्यांक ठरवून टाकलें आणि ' हिंदु ' म्हणून त्याची निवडणूक करण्याचा कॉंग्रेसला जो निर्विवाद हक्क होता आणि जो त्यानीं पूर्वीं मान्य केलेला होता, त्या हक्कावर मुस्लिम लीगची ही गहाण चिठ्ठी डकवून टाकिली. वेव्हेलचें हें उत्तर म्हणजे हलकटपणाची परिसीमा आहे. एवढीच कारवाई करून साहेबमजकूर थांबले नाहीत, तर चौदा जणांच्या या ' मध्यंतर सरकारा ' मध्यें जातीय प्रश्नावर हरकत घेण्याचा, म्हणजे ' व्हेटो 'चा अधिकारही त्यानीं मुस्लिम लीगला देऊन टाकला आणि वर दडपून असें सांगितलें कीं, कॉंग्रेसच्या अध्यक्षांची या गोष्टीला संमति आहे म्हणून ! वास्तविक घटनासमितीमध्यें किंवा कायदेमंडळाला जबाबदार असें ' मध्यतर सरकार ' स्थापन झालें असतें तर 'व्हेटो चा अधिकार लीगला देण्याची कॉंग्रेसची तयारी होती ! सोळा जूनच्या निवाड्यात सुचविलेल्या ' मध्यंतर सरकार ' च्या कारभारांत ' व्हेटो 'चा अधिकार मुस्लिम लीगला देण्याचे कॉंग्रेसनें कधींही कबूल केलें नव्हतें. कॉंग्रेसच्या नावावर वेव्हेलनें ही जी मखलाशी केली ती निव्वळ पाजीपणाची होय. या दडपेगिरीबद्दल वेव्हेलला जर कांहीं अब्रू असेल तर त्याला स्वतःची लाज वाटावयाला हवी ! मुस्लिम लीगचा ' व्हेटो ' चा अधिकार मान्य करून ' मध्यतर सरकार ' मध्यें सामील होणें ही गोष्ट कॉंग्रेसला अगदीं अशक्यच होती ! प्रत्येक पावलोपावलीं पेंचप्रसंग निर्माण करून घ्यायचे आणि मग व्हॉइसरॉयचा निर्णय घेत बसावयाचा हा ' ये रे बैला, खुपस शिंग ' छापाचा धंदा कॉंग्रेसला कुणीं सांगितलेला आहे ? म्हणूनच कॉंग्रेसनें ' मध्यंतर सरकार 'ची योजना सपशेल झिडकारली !

**सोळा** जूनचा निवाडा कोणत्याही पक्षानें स्वीकारला नाहीं तरी ' मध्यंतर सरकार ' बनविण्याचें काम आपण तसेंच नेटानें पुढें चालवूं, अशी

जी वेव्हेलनें धमकी देऊन ठेविली होती ती शेवटी पोकळच ठरली. ' मध्यंतर सरकार ' च्या योजनेला कॉंग्रेसनें नकार दिलेला असला तरी मुस्लिम लीगनें तिचा स्वीकारच केलेला आहे. म्हणून लीगला मध्यवर्ति सरकार बनविण्याला व्हॉइसरॉयनीं सांगितलें असतें; तर तें त्यांच्या पूर्वीच्या घोषणेशीं सुसंगत झालें असतें; पण तसें करण्याची वेव्हेलची छाती झाली नाहीं. त्यामुळें जनाब जीना आणि लीगवाले सरकारवर व कॉंग्रेसवर खूपच भडकलेले आहत. चोर, डाकू, बदमाष अशा शिव्याचा लीगवाल्यांनी अगदी वर्षाव चालविलेला आहे. सगळें मध्यवर्ती सरकार घशांत घालण्याची केवढी मोठी संधि त्यांच्याकडे चालून आली होती, ती गमावली ! देशाचे तुकडे पाडून पाकिस्तान बनवू पाहणाऱ्या मुस्लिम लीगने अखंड हिंदुस्थानचें मध्यवर्ती सरकार बनविण्याचा आपल्याला अधिकार आहे असा कांगावा करायचा म्हणजे निव्वळ जुलूम आहे ! बाकी पाकिस्तानचाही लीगच्या हाती हिंदुस्थानची मध्यवर्ती सत्ता द्यावयाची म्हणजे चोराच्या हातीं जामदारखान्याच्या किल्ल्या देण्यासारखेंच आहे ! तसें करण्याची बुद्धी शिष्टमंडळाला किंवा व्हॉईसरॉयाला झाली नाही हें आपलें नशीबच म्हटलें पाहिजे. सध्या तरी सरकारी अधिकाऱ्यांचें ' तात्पुरतें राखणदार सरकार' स्थापन करून शिष्टमडळ स्वदेशीं परत गेलेलें आहे. तेथें मुख्य प्रधानाशीं विचारविनिमय करून तें ' मध्यंतर सरकार ' बनविण्याच्या बाबतीतली आपली नवी योजना पुढील महिन्याअखेर जाहीर करतील असें म्हणतात. तोंपर्यंत प्रांताप्रांतांमधून घटनासमितीच्या निवडणुका सुरू होतील आणि समितीचें काम सुरू होईल. तथापि घटनासमितीच्या पहिल्याच सभेंत कॉंग्रेस आणि लीग यांची लढाई जुंपून समितीचें गाडें पुन्हां खड्ड्यात कोलमडून पडेल ही अगदीं काळ्या दगडावरची रेघ आहे. कारण गटांत सामील होण्याची प्रांतावरची सक्ति कॉंग्रेसला मान्य नाहीं, आणि ही सक्ति कॉंग्रेसनें मान्य केली नाहीं तर देशाच्या घटनेचीं आरंभींच शकलें शकलें होऊन जातील अशी जनाब जीनांनीं आपल्या सत्तावीस जूनच्या पत्रांत धमकी देऊन टाकलेली आहे ! म्हणून घटनासमितीला कॉंग्रेसनें आणि लीगनें मान्यता दिलेली आहे या गोष्टीबद्दल आम्हांला तरी मुळींच आनंद वाटत नाहीं. त्या आघाडीवरील आजचें मरण उद्यांवर गेलें

एवढेंच काय तें ! कॉंग्रेस आणि मुस्लिम लीग यांचे सबंध धूर्त शिष्टमंडळ आणि व्हाइसरॉय यांनीं आतां इतके बिघडवून टाकलेले आहेत कीं, हे दोन पक्ष घटनासमितींत आले तर एकमेकांशीं सहकार्य करावयाच्या ऐवजीं एकमेकांच्या उरावरच बसतील ! त्या यादवीमधून देशाचें स्वातंत्र्य कसें निर्माण होणार ? महात्मा गांधीप्रमाणें आमच्याही डोळ्याला भविष्यकाळांत अधार दिसतो आहे. त्यांतून शंभर टक्के नोकरशाहीचें मध्यवर्ती सरकारही आतां दिल्लीला स्थापन झालेलें आहे. म्हणजे पहिल्याच सभेंत घटना-समितीचा बाजा वाजल्यानंतर यदाकदाचित् कॉंग्रेसनें फिरून झगडा सुरू केला तर आपण तयार असावें असाच सरकारचा डाव सुरू दिसतो आहे. खरेंच, 'राखणदार सरकार' स्थापन करतों आहोंत या सबबीखालीं कॉंग्रेसचा भावि लढा जमीनदोस्त करण्याची सरकारनें एव्हांपासून तयारी तर चालविलेली नाहीं ? आम्हाला आपली शंका येते.

**ताजा कलम**...हें लिहितां लिहितांच आतां अशी बातमी आली आहे कीं, घटनासमितीची आणि 'मध्यंतर सरकार' ची योजना एकजिनसी आहे, असें ब्रिटिश सरकारचें आणि मुस्लिम लीगचें मत असल्यानें 'मध्यंतर सरकार' चा प्रश्न समाधानकारक रीतीनें मिटेपर्यंत घटनासमितीच्या निवडणुकी पुढें ढकलाव्यात, अशी जनाब जीनांनीं सरकारला सूचना केलेली आहे. ही सूचना वेव्हेलनें जर मान्य केली नाहीं तर घटनासमितीच्या निवडणुकीवर बहिष्कार टाकण्याचा तर जीनांचा डाव नाहीं ? असें झालें तर घटनेच्या योजनेचा आतांच बाजा वाजला असें म्हणावयाला हरकत नाहीं !



# स्वातंत्र्याच्या दारामध्यें आपण उभे : : : ८

"आतां एकच पाऊल पुढें टाकलें कीं, स्वातंत्र्य आपल्या हातांत !

**बेचाळीसच्या** ऑगस्टमध्ये अखिल भारतीय कॉंग्रेस—समितीचे मुंबईच्या गवालिया रणक्षेत्रावर जें क्रांतिकारक अधिवेशन भरलेलें होतें, त्यानंतर तीन वर्षांच्या वनवासामधून बाहेर पडल्यावर, पंचेचाळीसच्या सप्टेंबर महिन्यांत त्याच ठिकाणीं तीन दिवसपर्यंत भरलेलें अधिवेशनही अनेक दृष्टीनें अभूतपूर्व झालेलें होतें. प्राणांतिक अग्निदिव्यामधून बाहेर पडलेल्या राष्ट्राच्या आवडत्या पुढाऱ्याचें दर्शन घेण्यासाठीं आणि भविष्यकालीन स्वातंत्र्य लढ्याचा संदेश त्याच्या तोंडून ऐकण्यासाठीं लक्षावधि जनता त्या वेळीं गवालिया मैदानावरील विराट मंडपामध्यें जमलेली होती. त्या संमेलनाच्या उत्साहाचें ते अविस्मरणीय दृश्य अद्यापि आमच्या डोळ्यांसमोर नाचते आहे. आणि 'नवयुग' मधून त्या संमेलनाचें जें सविस्तर काव्यमय वर्णन आम्हीं आमच्या वाचकांना सांगोपांग सांगितलेलें होतें ते आमचे सहस्रावधि वाचकही कदापि विसरणें शक्य नाहीं. त्यानंतर बरोबर नऊ महिन्यानी ह्या भारतीय कॉंग्रेस समितीचें अधिवेशन मुंबई येथें सर कॉवसजी जहांगिर सभागृहामध्यें गेल्या शनिवारीं आणि रविवारीं भरलें होतें. कॉंग्रेस कार्यकारिणीनें ब्रिटिश शिष्टमंडळाच्या घटनासमितीबाबतच्या सोळा मे च्या योजनेचा जो स्वीकार केलेला होता, त्याला केवळ औपचारिक अनुमति मिळविण्यासाठींच भारतीय समितीचें हें अधिवेशन भरलें होतें असें म्हणावयास हरकत नाहीं. मावळत्या अध्यक्षांनीं आपली जागा उगवत्या

अध्यक्षाना खालीं करून घ्यावयाची हाही विधि या समेलनाचे वेळीं झाला हें खरें. तथापि, पूर्वीच्या दोन अधिवेशनांपेक्षां या संमेलनाचें स्वरूप म्हणूनच अत्यंत मर्यादित आणि सौम्य होतें. गेल्या सप्टेंबरचें विराट अधिवेशन, हें तशा प्रकारचें शेवटचें जाहीर अधिवेशन होय. असें त्याच वेळीं मौलाना आझाद यांनीं जाहीर केलें असल्यानें, सहाजिकच हें परवाचें अधिवेशन केवळ समितीच्या सभासदां-पुरतेंच मर्यादित होतें. वृत्तपत्रीय मंडळींना या अधिवेशनामध्यें प्रवेश मिळणार नाही अशा भूमिका आरंभापासून एकसारख्या उठत होत्या आणि कोण उठवीत होते याचें कारण आम्हाला कांही माहित नाही. वास्तविक, कॉंग्रेस वर्किंग कमिटीच्या ठरावाला संमति देण्याचें अगदी मामुली काम या अधिवेशनामध्यें होणार होतें. त्यांत अशी काय मोठी गुप्त खलबतें किंवा रहस्यमय वाटाघाटी होणार होत्या कीं, त्या बाहेर जगात कोणालाहि समजूं नयेत म्हणून वृत्तपत्रीय वार्ताहरावर निर्बंध घालण्याच्या कल्पना समेलनाच्या चालकांच्या डोक्यामध्यें निर्माण झाल्या होत्या ! शेवटीं हो, ना म्हणता म्हणता वृत्तपत्रीय संस्था आणि दैनिक वृत्तपत्रें मिळून शंभर पत्रपंडितांना या अधिवेशनामध्यें प्रवेश मिळाला. 'नवयुग' हें साप्ताहिक असल्यानें आम्हाला या अधिवेशनात बंदी होती. प्रवेश मिळविण्यासाठीं आम्हीं कांहीं कमी प्रयत्न केला नाहीं. पण आमची कांहीं दाद लागली नाहीं 'अध्यक्षांच्या आज्ञेबाहेर आम्हांला जाता येत नाहीं' असा अधिकाऱ्यांकडून आम्हांला जबाब मिळाला आणि आम्ही मनगटें चावीत आपले जागचे जागीं स्वस्थ बसलों. त्या वेळीं आमच्या डोळ्यांत अक्षरशः पाणी आलें 'नवयुग' सारख्या कट्टर कॉंग्रेससेवक साप्ताहिकाला या अधिवेशनाला नुसता प्रवेशहि मिळूं नये हें आमचें आणि आमच्या सहस्त्रावधी वाचकांचें दुर्दैवच म्हटलें पाहिजे. म्हणून मागील अधिवेशनाचा वृत्तांत आम्हीं आमच्या अभिनव पद्धतीनें रंगवून आमच्या वाचकांना जशी एक अपूर्व मेजवानी दिलेली होती, तशी या वेळीं आम्हांला देतां येत नाहीं, त्याबद्दल आम्हांला अत्यंत वाईट वाटतें. केवळ दैनिक वृत्तपत्रामध्यें प्रसिद्ध झालेल्या मजकुराच्या पुनर्मुद्रित उष्टावळीवरच आमच्या वाचकांना या वेळीं आपली तहान शमविणें भाग पडत आहे याबद्दल त्यांनीं आम्हांला क्षमा करावी.

## नवीन रक्ताचें स्वागत

**नवीनच** निवडलेल्या कॉंग्रेसच्या अखिल भारतीय समितीचें अधिवेशन शनिवारीं दि. ६ जुलै रोजीं दुपारी अडीच वाजतां सर कॉवसजी जहांगीर सभागृहामध्यें मोठ्या थाटामाटात सुरू झालें. समितीच्या एकंदर तीनश ऐंशीं सभासदांपैकीं दोनशें पंचावन्न सभासद उपस्थित होते. कॉंग्रसचे मावळते अध्यक्ष मौलाना अबुल कलम आझाद यांनीं आपलें अध्यक्षपद उगवते अध्यक्ष पंडित जवाहरलाल याच्या स्वाधीन करण्यापूर्वीं, मागील अधिवेशनानतर गेल्या नऊ महिन्यात घडलेल्या राजकीय घडामोडींचें सिंहावलोकन केलें. त्या भाषणांत ते म्हणाले, "सहा वर्षानतर आज आपण भेटत आहोंत. युद्धकालीन परिस्थितीमुळें मध्यंतरीं निवडणुकी भरविणें शक्यच नव्हतें. या सहा वर्षांच्या दीर्घकाळामध्यें, आंतरराष्ट्रीय परिस्थितीमध्यें आणि आपल्या स्वातंत्र्य युद्धाच्या स्वरूपामध्यें फारच मोठी क्रांति घडून आणली. आज आपण आपल्या स्वातंत्र्याच्या उंबरठ्यावर उभें आहोंत. आपल्या देशाचें स्वातंत्र्य आता वाट चालत आहे. कशामुळें म्हणाल ? आतरराष्ट्रीय परिस्थितीमुळें ? नव्हे ! आपल्या देशामध्ये जी अपूर्व क्रांति झाली आहे, जी महान् लोकजागृति झालेली आहे, तिच्यामुळें ! नवीन निवडून आलेल्या भारतीय समितीमध्यें साहजिकच नवीन रक्त आलेलें आहे. मी त्या नवीन रक्ताचें स्वागत करतों. कारण, नवीन रक्तामधून शरीरामध्यें नवीन उत्साह आणि नवीन बळ निर्माण होत असतें. कॉंग्रेसचें वार्षिक अधिवेशन सध्यांच्या चमत्कारिक परिस्थितीमध्यें भरवितां येत नाहीं. म्हणून या नवीन निवडून आलेल्या भारतीय समितीच्या अधिवेशनामध्येंच माझ्या कार्याचीं सूत्रें मी नवीन अध्यक्षांच्या हवालीं करण्याची संधि घेतों. सहा वर्षांपूर्वीं कॉंग्रेसच्या रामगड अधिवेशनाच्या वेळीं मीं अध्यक्षाचीं सूत्रें प्रथम हातीं घेतलीं. त्या वेळीं स्वातंत्र्यासाठीं आपण झगडत होतों. पण आज हीं सूत्रें खालीं ठेवतांना मला अतिशय आनंद होतो आहे. कारण स्वातंत्र्यासाठीं झगडण्याचा आज सवालच उरलेला नाहीं. आज आपण स्वातंत्र्याच्या उंबरठ्यावर येऊन उभे राहिलेलों आहोंत. आज सवाल जर कसला असेल, तर तो येणाऱ्या स्वातंत्र्याचें ग्रहण

करण्याच्या तयारीचा आहे ! आतां आपण एक पाऊल पुढें टाकलें कीं, आपलें ध्येय गाठलेंच म्हणून समजा ! ब्रिटिश शिष्टमंडळाशीं वर्किंग कमिटीनें ज्या वाटाघाटी चालविल्या होत्या त्या तुम्हांला न विचारतां आम्हीं चालविल्या अशी आमच्यावर कांहीं ठिकाणीं टीका झाली. पण ही टीका बरोबर नाहीं. वाटाघाटी-मधून स्पष्ट निर्णय बाहेर येतांच आम्ही त्यांवर आपल्या पसंतीचा शिक्कामोर्तब घ्यावयाला मुळींच वेळ घालविला नाहीं. आपण वर्किंग कमिटीच्या निर्णयाचा शांतपणें विचार करा. म्हणजे मग देशाच्या अंतिम हिताच्या दृष्टीनें वर्किंग कमिटीनें आपलें कर्तव्य किती जबाबदारीनें पार पाडलें आहे हें आपणांला कळून येईल ! ”

## खडतर काळांतील उज्ज्वल कारकीर्द

**असें** बोलून मौलाना आझाद आपल्या आसनावरून उठले व त्यांनीं आपल्या जागेवर पंडित नेहरू यांना येऊन बसण्यास विनंति केली. दोघांनीही मोठ्या प्रेमानें हस्तांदोलन केलें व नतर टाळयाच्या गजरांत पंडितजींनीं कॉंग्रेसच्या अध्यक्ष-स्थानाचा स्वीकार केला. माजी अध्यक्षांच्या कारकीर्दीचा गौरव करतांना सरदार वल्लभभाई पटेल म्हणाले, “सतत सहा वर्षे कॉंग्रेसच्या अध्यक्षस्थानीं विराजमान झालेले मौलाना आझाद हे एकच अद्वितीय पुरुष आहेत. या सहा वर्षांत कॉंग्रेसवर अनेक संकटें आलीं; पण मौलाना आझाद यांच्या जबरदस्त आणि तेजस्वी नेतृत्वाखालीं त्या सर्व संकटांना कॉंग्रेसनें उत्तम तऱ्हेनें तोंड दिलें. बेचाळीसच्या ऑगस्टमध्यें ‘ हिंद छोडो ’चा ठराव करून आम्ही येथून गेलों. तों तीन वर्षें-पर्यंत अहमदनगरच्या किल्ल्यामध्यें आम्ही एकत्रच होतों. सुटकेनंतर आम्ही सिमल्यालाही बरोबरच गेलों. गेले तीन महिने या राजकीय वाटाघाटी चालू असतां आम्ही दिल्लीलाही पुन्हां एके ठिकाणीं आलों. या सर्व काळामध्यें मौलाना साहेबांचें मीं अहर्निश अवलोकन केलेलें आहे. म्हणून मी छातीला हात लावून सांगतों कीं, सहा वर्षांच्या संकटमय काळामध्यें एक क्षण कधीं मी त्यांना असें पाहिलें नाहीं कीं, ज्या वेळीं त्यांना आपल्या उच्चस्थानाचा रुबाब आणि वैभव राखतां आलेलें नाहीं ! कॉंग्रेसच्या अब्रूला त्यांनीं यत्किंचित्

देखील डाग लावून दिलेला नाहीं. आपलें कर्तव्य बजावतांना त्यांनीं जें धैर्य आणि निर्धार दाखविला तो निःसंशय अलौकिक होता. आपल्या स्वातंत्र्याच्या झगड्याला सध्या जें स्वरूप प्राप्त झालेलें आहे, त्याचें सर्व श्रेय मौलाना साहेबांनाच द्यावयाला पाहिजे. बेचाळीस सालीं आपण ब्रिटिशांना सांगितलें, 'चले जाव!' त्याप्रमाणें ते आतां आपणांला सांगत आहेत कीं, आम्ही हा देश सोडून जावयाला तयार आहोंत. म्हणून त्यांनीं हा देश किती निमूटपणें आणि कसा शिस्तशीरपणें सोडून जावयाला हवें त्याचा आपण सध्यां विचार करीत आहोंत. ही सारी कामगिरी मौलाना साहेबानीं केलेली आहे!"

## प्रचंड क्रांतीचीं सहा वर्षें

**त्यानंतर** नवीन अध्यक्ष पंडित जवाहरलाल नेहरू यांनी भाषण केलें. ते म्हणाले, "कॉंग्रेसचें रामगड अधिवेशन ज्या दिवशीं भरलें होतें, त्या दिवशीं तेथें मोठे वादळ झालें. त्या वादळाची आज मला येथें आठवण होत आहे. मौलाना साहेबांची सहा वर्षांची कारकीर्द म्हणजे एक वादळच होय. हिंदुस्थानच्या आणि कॉंग्रेसच्या इतिहासांत प्रचंड क्रांतीचीं म्हणून हीं सहा वर्षे नमूद होतील. मी आपणास सरळ असा प्रश्न विचारतों कीं, मौलानासाहेबांच्या पावलावर पाऊल टाकून जाणारा आणि त्यांच्या इतक्या धैर्यानें आणि कर्तृत्वानें जबाबदारीचे ओझें शिरावर बाळगणारा आपल्यामध्यें एकादा तरी माणूस कोणी आहे काय? मी ही अध्यक्षस्थानाची जबाबदारी स्वीकारावी का नाहीं, याविषयीं पुष्कळ बुचकळ्यांत पडलों होतों. पण महात्मा गांधी व माझे इतर सहकारी यांच्या सांगण्यावरून मी शेवटीं रुकार देण्यास तयार झालों.

"**आपण** आता स्वातंत्र्याच्या दरवाजाच्या पायरीवर उभे आहोंत. आतां आणखी एकच झटका देण्याचा अवकाश आहे. म्हणजे आपलें उद्दिष्ट ध्येय आपण गांठलेंच म्हणून समजा. आज आपल्यापुढें जो प्रश्न आहे, तो कांहीं एका ठरावाला मंजुरी किंवा विरोध करण्याचा नाहीं किंवा संकल्पित घटना समितीच्या गुणदोषाची चर्चाही करण्याचा नाहीं. देशाच्या स्वातंत्र्याचा प्रश्न आपल्यापुढें आहे. राष्ट्राला स्वातंत्र्य मिळेल या आशेनें आणि श्रद्धेनें गेल्या

पंचवीस वर्षांमध्यें लक्षावधि लोक कॉंग्रेसच्या मागें डोळे मिटून चालत आलेले आहेत. आजपर्यंत कॉंग्रेस इतकी बलाढ्य कधींच नव्हती, पण त्याबरोबर आजच्या कॉंग्रेसच्या अंतर्गत जीवनांत पुष्कळच दुबळेपणा उत्पन्न झालेला आहे हेंही मला कबूल करावयाला हवें. हिंदुस्थानच्या स्वातन्त्र्यप्राप्तीसाठीं निरनिराळ्या मतांच्या आणि पक्षांच्या लोकांना एकत्र आणणारें कॉंग्रेस हें एकच व्यासपीठ आहे. स्वातन्त्र्याचें हें अंतिम ध्येय साध्य करण्याचे आड हा आपला अंतर्गत दुबळेपणा केव्हांही येता कामा नये ! ब्रिटिश साम्राज्यशाही नष्ट करण्याचें अत्यंत अवघड काम आपण हातीं घेतलें आहे म्हणून हा दुबळेपणा आपण आपल्या अंगामधून आधीं काढून टाकला पाहिजे. आपल्या मागें असणाऱ्या सर्व लोकांचें ऐक्य आणि बल आपण संघटित केलें पाहिजे. या देशामधील ब्रिटिश अंताचा आतां आरंभ झालेला आहे. ब्रिटिश कारकीर्दीवर आतां शेवटचा पडदा पडण्याची घटा वाजलेली आहे. हा मोठ्या निर्वाणीचा क्षण आहे. या वेळीं आपण आपलें असेल नसेल तेवढें सारें बळ एकवटलें पाहिजे. नवीन प्रश्नांना तोंड द्यावयास आपण तयार झालें पाहिजे. आज आपणांपुढें अनेक गंभीर असे आर्थिक प्रश्न आहेत. दुष्काळ समोर उभा आहेच. तिकडे दक्षिण आफ्रिकेंत आपली अब्रू पणाला लागलेली आहे. वास्तविक लंका हा हिंदुस्थानचा भाग; पण तेथेंही आपल्यापुढें एक पेंचप्रसंग निर्माण झालेला आहे. सबंध जगाचीच आज विलक्षण ओढाताण चाललेली आहे. आज जगांत जें कांहीं घडत आहे त्याचा नुकत्याच संपून गेलेल्या युद्धाशीं कांहीं एक संबंध नाहीं. पुढचें महायुद्ध केव्हां सुरू होणार हा आतां आपल्यापुढें प्रश्न आहे. स्वातंत्र्याचा पुरस्कार हिंदुस्ताननें नेहमींच केलेला आहे. आपण फॅसिझम् आणि नाझीवाद् यांचे कट्टे दुष्मन आहोंत. कोणत्याही लहान मोठ्या देशाचें स्वातंत्र्य हिरावून घेणाऱ्या राष्ट्राशीं आपण केव्हांही सहकार्य करणें शक्य नाहीं. प्रत्येक राष्ट्राच्या स्वातंत्र्याच्या हक्काचें आपण नेहमींच समर्थन करूं. या दृष्टीनें आज कॉंग्रेसला साऱ्या जगामध्यें मोठ्या मानाचें स्थान प्राप्त झालेलें आहे." ब्रिटिश शिष्टमंडळाशीं वाटाघाटी चालू असतां अखिल भारतीय समितीची सभा मध्येंच बोलावणें कसें शक्य नव्हतें हें त्यानंतर पंडित नेहरू यांनीं समजावून सांगितलें.

त्यानंतर ब्रिटिश शिष्टमंडळाच्या सोळा मेच्या योजनेच्या सशर्त स्वीकाराबाबत आणि सोळा जूनच्या योजनेच्या अव्हेराबाबत कॉंग्रेस वर्किंग कमिटीनें २६ जून रोजीं दिल्ली येथें जो ठराव पास केला तो अखिल भारतीय समितीच्या मंजुरीसाठीं मौलाना अबुल कलम आझाद यांनीं पुढें मांडला.

## परिस्थिति बदलल्याचें चिन्ह

"**देशाला** तावडतोब स्वातंत्र्य मिळावयाला पाहिजे आणि जनतेची आर्थिक आणि सामाजिक दृष्ट्या प्रगति झाली पाहिजे या कॉंग्रेसच्या ध्येयाच्या दृष्टीनें वर्किंग कमिटीनें शिष्टमंडळाच्या सोळा मे च्या आणि सोळा जूनच्या दोन्हीही योजना तपासून पाहिल्या आणि त्या योजना कॉंग्रेसच्या अपेक्षेपेक्षां फारच अपुऱ्या आहेत असें कमिटीचें मत झालें. हिंदुस्थानात संयुक्त आणि लोकशाही संघराज्य स्थापन व्हावयाला पाहिजे. मध्यवर्ती सरकाराबद्दल सर्व जगाला आदर वाटेल असें तें असावयाला हवें. त्याखेरीज प्रांतांना शक्य तेवढें स्वातंत्र्य आणि देशातील सर्व स्त्री–पुरुषांना समान हक्क मिळावयाला हवेत, हें कॉंग्रेसचें ध्येय आहे. त्या दृष्टीनें शिष्टमंडळाच्या योजनेंत दोष असले तरी स्वतंत्र, संयुक्त आणि लोकशाही प्रधान अशी हिंदुस्थानची घटना बनविण्यासाठीं कॉंग्रेसनें घटनासमितीमध्यें जावें असें वर्किंग कमिटीचें मत आहे." या ठरावावर बोलतांना मौलाना आझाद म्हणाले, "वर्किंग कमिटीच्या निर्णयावर आज जी टीका होते आहे त्यावरून तिच्या समोर काय प्रश्न होता याचा लोकांना जणूं काय विसरच पडलेला आहे असें मला वाटतें. योजना एक स्वीकारा नाहीं तर नाकारा, हा तिच्यापुढें सवाल टाकलेला होता. आज इतकीं वर्षें कॉंग्रेस सरकार-कडे जें मागत होती तें मागणें ध्यानांत धरूनच वर्किंग कमिटी वागत होती. हिंदुस्थानचें भविष्य आणि घटना ठरविण्याचा हक्क केवळ हिंदी जनतेलाच आहे असें आतापर्यंत कॉंग्रेसचें म्हणणें होतें. ब्रिटिश सरकारला हें म्हणणें मान्य नव्हतें. पण परिस्थिति इतकी बदलली की, स्वतंत्र हिंदुस्थानची घटना बनवि-ण्यासाठीं घटनासमिति बोलाविण्याचा हिंदुस्थानचा मूलभूत हक्क ब्रिटिश सरकार-लाच मान्य करणें भाग पडलें. शिष्टमंडळाच्या सोळा मेच्या योजनेमध्यें हा

हक्क मान्य करण्यात आला. जें इतकीं वर्षे आपण घसा खरडून मागत होतों तें आपणांला मिळालें. तें आपण नाकारलें तर आपली परिस्थिति काय होईल बरें ? म्हणजे आपलें आतापर्यंतचें मागणें निरर्थक ठरल्यासारखें होईल. आजपर्यंत आपण जें मागत होतों तें आपलें मागणें त्यांनीं मान्य केलें तेव्हां आतां त्यांतून पुढें वाट काढण्याची जबाबदारी आपल्यावरच आहे. त्यामुळें वर्किंग कमिटीला गत्यंतरच नव्हतें. कॉंग्रेसनें मान्य केलेल्या ध्येयाच्या मार्गावरच आपण चाललों आहोंत, अशा भरंवशानेंच या योजनेचा स्वीकार वर्किंग कमिटीनें केलेला आहे. सोळा मेच्या योजनेचे दोन भाग पडतात. एक राजकीय व दुसरा जातीय. राजकीय दृष्टच्या घटनासमितीला स्वतंत्र हिंदुस्थानची घटना ठरविण्याचें संपूर्ण स्वातंत्र्य देण्यात आलेलें आहे. आपण जी घटना तयार करू तिला मान्यता देण्याचें ब्रिटिश सरकारनें कबूल केलें आहे. ब्रिटिश साम्राज्यामध्यें रहावयाचें का बाहेर जाऊन संपूर्णतया स्वतंत्र व्हावयाचें हें ठरविण्याची आपणांला मोकळीक मिळालेली आहे. आता या बाबतींत ब्रिटिश सरकारचें आपल्यावर कोणत्याही तऱ्हेचें नियंत्रण नाहीं. शिष्टमंडळाला मीं माझ्या पहिल्याच भेटींत हडसून खडसून सांगितलें कीं, घटनासमितीला स्वतंत्र हिंदुस्थानची घटना ठरविण्याचें संपूर्ण स्वातंत्र्य मिळालें पाहिजे, तें त्यांनीं मान्य केलें तेव्हां देशाच्या स्वातंत्र्याबद्दल आतां मुळीं संशयच उरलेला नाहीं. ब्रिटिश सरकारनें जेथें याबाबत अगदीं स्पष्ट घोषणा करून ठेविलेली आहे, तेथें आपण आपल्या डोक्यांत विनाकारण संशय उत्पन्न करण्यामध्यें काय हशील आहे बरें ? हिंदुस्थानच्या फाळणीचा प्रश्नही शिष्टमंडळानें अगदीं स्पष्टपणें आणि कायमचा मिटवून टाकलेला आहे. हिंदुस्थान अखंड राहिला, त्याचें मध्यवर्ति सरकार निरनिराळ्या प्रांतांचें मिळून एकजिनसी आणि सामर्थ्यवान् राहील, ही घोषणा शिष्टमंडळानें अगदी निःसंदिग्धपणें केलेली आहे. आतां त्याबद्दल यत्किंचित् देखील शंका राहाण्याचें कारण नाहीं ! आमच्या मुख्य मागण्या अशा रीतीनें मान्य झाल्यानंतर शिष्टमंडळाच्या योजनेमधील दोषाचें दिग्दर्शन करून ती मान्य करणें आम्हांला भागच होतें. ही योजना जर आपण आतां नाकारली तर आपणांला मान्य होण्याजोगी दुसरी योजना पुन्हां लौकर आपणांपुढें येणें अशक्य आहे. संपूर्णतया केंद्रीभूत

असलेलें मध्यवर्ति सरकार हिंदुस्थानला जुळणारें नाहीं. कारण तें अव्यवहार्य आहे. त्याचप्रमाणें मुस्लिम लीगच्या म्हणण्याप्रमाणें देशाची फाळणी करणें ही गोष्ट घातुक आहे, अशी कॉंग्रेसची विचारसरणी आहे, म्हणून या दोन टोंकां-मधला ' सुवर्णमध्य ' आम्हाला चोखाळावा लागला. शेषाधिकारासह प्रांताला जास्तींत जास्त स्वायत्तता देऊन मध्यवर्ति स्वराज्य ठेवण्याची योजना म्हणून कॉंग्रेसला पत्करावी लागली. या कल्पनेमधलें तत्त्व तेवढें शिष्टमंडळानें स्वीकारलें म्हणजे मध्यवर्ति केंद्र संयुक्त ठेवलें, पण त्याचे हक्क मर्यादित ठेविले आतां या केंद्रीय सरकारचें सामर्थ्य वाढवून घेण्याचें काम आपणाला घटनासमितीमधून करून घेतलें पाहिजे. शिष्टमंडळाच्या योजनेमधील गटबाजी कॉंग्रेसला मान्य नाहीं. कोणत्या गटात किंवा विभागात प्रांतांनीं सामील व्हावयाचें ह्याबाबत प्रांतावर सक्ति असता कामा नये, असें आमचें म्हणणें आहे. योजनेमधील गटबाजीच्या नियमाचा आम्हीं जो अर्थ लाविलेला आहे तोच बरोबर आहे असेंच आमचें म्हणणें आहे ! "

## पाठिंबा तरी द्या नाहीं तर फेंटाळून लावा !

या ठरावाला पाठिंबा देताना सरदार वल्लभभाई पटेल म्हणाले, " आम्ही ठराव आपल्या मंजुरीसाठीं मांडलेला आहे. त्याला एक पाठिंबा तरी द्या नाहीं तर तो फेंटाळून तरी लावा ! शिष्टमंडळ, कॉंग्रेस, मुस्लिम लीग आणि संस्थानिक अशा चौघांनीं ही सोळा मेची योजना मान्य केलेली आहे. या योजनेमधील गटबाजीचें तत्त्व अत्यंत घातुक आहे; पण त्या नियमाचा आमचा अर्थ निराळा आहे. प्रांतावर सक्ति करतांच येत नाहीं असें आमचें म्हणणें आहे. या योजनेमुळें ब्रिटिश सरकारच्या हातामधील सर्व सत्ता हिंदी जनतेच्या हातामध्यें अगदीं शांतपणें आणि सुरळीतपणें येईल. म्हणून देशाला झगड्याच्या खाईत न लोटतां या योजनेचा आपण फायदा घ्यावा असें आम्हांला वाटतें. केवळ स्वतंत्र हिंदुस्थानच्या भूमिकेवरूनच आम्ही तुमच्याशीं बोलणें करूं, असें आम्ही शिष्टमंडळाला आरंभींच बजावून सांगितलें. त्यांनीं आमचें म्हणणें अगदीं निरक्ष-

वादपणें मान्य केलें, एवढें त्यांनीं आतां आश्वासन दिल्यानंतर त्यांच्यावर विश्वास न ठेवणें आम्हांला शक्य आहे काय ? मुस्लिम लीगला या योजनेंत पाकिस्तान दिसतें. पण आम्हांला या योजनेंत तर अखंड हिंदुस्थान दिसतो. कोण बरोबर आहे हें घटना समिती ठरवील ! या योजनेमध्यें शीखांचा मात्र अन्याय झालेला आहे. त्यांचे हातपाय बांधून आणि त्यांची गठडी करून त्यांना ' ब ' गटामध्यें फेंकून देण्यांत आलेलें आहे. मुसलमानांप्रमाणें त्यांना नकाराचा हक्क आणि संरक्षण कां मिळूं नये बरें ? ' व्हेटो ' चें तत्त्व मूलतः वाईट खरें; पण तो हक्क जर एकाला द्यायचा तर मग दुसऱ्याला कां द्यायचा नाहीं ? ब्रिटिश या देशांतून गेल्यानतर देशी संस्थानांवर कोणाचीही सार्वभौम सत्ता राहणार नाहीं ही या योजनेमधील घोषणा योग्यच आहे. आजपर्यंत संस्थानानें सार्वभौम सत्तेला खूष करण्याचा प्रयत्न करीत असत, आतां यापुढें त्यांना जनतेला खूष करावें लागेल. "

## संधिसाधूंपासून सावधान !

**समाजवादी** कॉंग्रेस पक्षाचे पुढारी श्रीयुत जयप्रकाश नारायण यांनीं या ठरावाला कसून विरोध केला. ते म्हणाले, " कॉंग्रेस ज्या हिंदी जनतेच्या स्वातंत्र्यासाठीं " इतकीं वर्षे झगडत आहे तें स्वातंत्र्य ब्रिटिश सरकारनें निर्माण केलेल्या या घटना समितीमधून आपणांला मिळणें अशक्य आहे. ब्रिटिश साम्राज्यशाही नष्ट करण्याच्या हेतूनें बेचाळीसचा ' चले जाव ' चा लढा सुरू झाला. पण तो यशस्वी झाला नाहीं. त्या लढ्यांतून नवीन चैतन्य निर्माण झालें. या चैतन्याचा योग्य तो उपयोग करून ब्रिटिशांना या देशामधून कसें घालवून द्यावयाचें हा एकच आपल्यापुढें आज सवाल आहे, ब्रिटिश साम्राज्यवाद्यांनीं बनविलेल्या या तकलादू घटना सामितीचा स्वीकार करावयाचा कीं नाहीं, हा आपल्यापुढें सवाल नाहीं हें लक्षांत ठेवा ! शिष्टमंडळ या देशांत तुम्हांला स्वातंत्र्य देण्यासाठीं आलें नाहीं. तें कॉंग्रेस आणि मुस्लिम लीग यांच्यामध्यें तडजोड घडवायला आलें. देशांत जातीय झगडे ब्रिटिशांनींच निर्माण केले. मुस्लिम लीगला मुसलमानांचें मोठें पाठबळ असेल; पण कांहीं केलें तरी ' लीग ' ही

ब्रिटिशांचीच जानी दोस्त आहे. बेचाळीसचा झगडा हा ब्रिटिशांच्या विरुद्ध नसून मुसलमनांच्या विरुद्ध होता, हिंदूंचें अधिराज्य देशांत स्थापन करण्याचा तो प्रयत्न होता, असें म्हणणाऱ्या मुस्लिम लीगच्या पुढाऱ्यांबरोबर कॉंग्रेसनें पडखाऊन तडजोड करावी असें शिष्टमंडळाचें म्हणणें होतें. हें कसें शक्य आहे ? आपल्या शत्रूचे जे उघड उघड दोस्त आहेत त्यांच्याशीं आपण कशी तडजोड करणार ? ' मध्यंतर सरकार ' ची योजना कॉंग्रेसनें धुडकावून लावली हें उत्तम केलें. घटना—समितीची मूळ कल्पना पंडित नेहरूंची ! पण त्यांच्या त्या कल्पनेप्रमाणें कांहीं ही घटना—समिति होणार नाहीं. हा ब्रिटिशांनीं बनविलेला ' माल ' आहे. स्वतंत्र हिंदुस्थानची घटना बनविण्याचें तुम्हाला पूर्ण स्वातंत्र्य दिलेलें आहे; असें हे ब्रिटिश तोंडानें खूप म्हणत असतील, पण पडद्यामागें उभे राहून व अशा तऱ्हेनें सूत्रें हालवितील कीं, तुम्हांला हिंदी स्वातंत्र्याची घटना मनाप्रमाणें बनविण्याचें काम ते अगदीं अशक्य करून सोडतील ! घटना—समितीमध्यें पदोपदीं मतभेद निर्माण होतील आणि ते मतभेद मिटविण्यासाठीं तुम्हांला दर वेळेला ब्रिटिशाकडे धांव घ्यावी लागेल. या परिस्थितीचा फायदा ब्रिटिश घेतल्यावाचून राहतील होय ? घटना—समिति जनतेच्या सामर्थ्यांमधून निर्माण झाली तरच प्रभावी होऊं शकेल ! स्वातंत्र्याच्या वातावरणानेंच घटना-समितीचें कार्य यशस्वी होईल. ब्रिटिश सत्ता जोंपर्यंत या देशांत नांदत आहे, तोंपर्यंत हें स्वातंत्र्याचें वातावरण या देशांत कसें निर्माण होईल ? आपण सरकारला स्पष्टपणें सांगू या कीं, असली मर्यादित स्वरूपाची घटना समिति आम्हांला नको आहे. प्रांतीय राज्यकारभार स्वीकारून आम्ही आधींच दुबळे झालेलों आहोंत. आतां ही घटना समिति पत्करून आपण यामुळेंही आधिक दुबळे व्हावयाला नको ! नुसत्या वाटाघाटींनें आपलें ध्येय साध्य व्हावयाचें नाही. पुन्हां झगडा सुरू करणें हा एकच मार्ग आपल्यापुढें आहे. तेवढ्यासाठीं कॉंग्रेसच्या संघटनेचें सामर्थ्य आपल्याला वाढविलें पाहिजे. त्या सामर्थ्याची तयारी झाली कीं, त्या क्षणीं झगड्याचें शिंग फुंकून आपण ब्रिटिशांना या देशांमधून हांकून द्यावयाला पाहिजे. त्यांना आपण सांगायला पाहिजे कीं, केवळ कॉंग्रेसशीं वाटाघाटी करूनच त्यांना आपल्या सत्तेचा त्याग

करतां येईल ! ” मूळ ठरावाला विरोध करतांना रावसाहेब पटवर्धन म्हणाले कीं, “ अगदीं थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे ब्रिटिश शिष्टमंडळानें कॉंग्रेस वर्किंग कमिटीला अगदी सपशेल बनविलेलें आहे. वर्किंग कमिटीनें शिष्टमंडळाच्या योजनेला मान्यता देणें हा राजागोपालाचारियरसारख्या माणसांचा विनय आहे ! कारण ‘ ब्रिटिशांशीं ’ संपूर्ण सहकार्य करा असा संदेश राजाजींनीं दोन वर्षांपूर्वीं लिहिलेल्या एका पुस्तकामध्यें देशाला देऊन ठेवलेला आहे ! मला नाहीं वाटत कीं, ही योजना स्वीकारून देशाला स्वातंत्र्य मिळेल. अधिकारग्रहण आणि घटनासमिति–स्वीकार हा कॉंग्रेसजनाचा मार्ग नाहीं ! त्यांचा मार्ग अगदीं स्वच्छ आहे ! आणि तो म्हणजे ‘ चले जाव ’ चा झगडा पुन्हां सुरू करणें हा होय ! अद्यापिहि या देशांत ब्रिटिश सत्ता बलाढ्य आहे. ब्रिटिशांना या देशांतून घालवून देणें हा एकच मार्ग आपल्यापुढें मोकळा आहे. ”

## दुसरा दिवस

दुसऱ्या दिवशीं म्हणजे रविवारीं दुपारीं दोन वाजतां अधिवेशनाचें काम सुरू झालें. सव्वा दोन वाजतां महात्मा गांधी सभेंत आले आणि त्यांनीं ठरावाच्या बाजूनें एक तासभर भाषण केलें. ( तें भाषण पान एक वर दिलेलें आहे. ) त्यानंतर दक्षिण आफ्रिकेमधील सत्याग्रहाबद्दल बोलून महात्मा गांधींनीं आपलें भाषण संपविलें.

## गोऱ्या भांडवलदारांना सुसंधि !

कॉंग्रेस समाजवादी पुढारी भाई अच्युत पटवर्धन यांनीं ठरावाला विरोधाचें भाषण केलें. ते म्हणाले, “ मुख्य प्रधान ॲटली असें म्हणाले होते कीं, आतां शेहेचाळीस सालीं वीस सालची किंवा बेचाळीस सालची आमची ‘ उष्णता ’ राहिलेली नाहीं. ॲटलीसाहेबांचा हा भावार्थ या शिष्टमंडळाच्या योजनेमध्यें कुठें प्रतिबिंबित झालेला आहे तें मला दाखवा ! बेचाळीस सालीं आपण क्रिप्स योजना लाथाडली. त्या योजनेपेक्षां या योजनेमध्यें अधिक काय सुधारणा आहे ? घटनासमितीमधल्या गटबाजीच्या नियमाचा अर्थ कॉंग्रेस

वर्किंग कमिटीच्या दृष्टीनें एक असला तरी तो जीनांच्या दृष्टीनें दुसरा आहे. दोघांचेही अर्थ परस्पर-विरोधी आहेत. शिष्टमंडळानें कॉंग्रेसचा अर्थ मान्य केल्याचें कुठेंही दिसत नाहीं. उलट तो आपल्याला अमान्य असल्याचेंच शिष्ट-मंडळानें सांगितलेलें आहे. मध्यवर्ति सरकारच्या अधिकारकक्षेमधून 'खजिना खातें' काढून घेण्यांत आलेलें आहे. देशाची तिजोरी ज्याच्या हातात नाही आणि देशाचें आर्थिक धोरण ठरविण्याचा ज्याला अधिकार नाहीं तें मध्यवर्ति सरकार 'बलिष्ट' कसें म्हणता येईल ? गटबाजीच्या तत्त्वाला माझा विरोध आहे. तो तें तत्त्व मुस्लिम लीगला अनुकूल आहे म्हणून नव्हे, तर त्या गटबाजीच्या आड 'क्लाईव्ह स्ट्रीट' मधल्या गोऱ्या भांडवलवाल्यांना दडा-वयाला भरपूर वाव मिळणार आहे म्हणून मी त्याच्याविरुद्ध आहें ! या गोऱ्या भांडवलवाल्यांनीं इतकीं वर्षे देशाला पिळून खाल्लें आहे. आणि या नवीन योजनेमध्येंही त्यांच्या या पिळवणुकीला भरपूर वाव मिळणार आहे. ब्रिटिश राज्यकर्ते म्हणताहेत कीं, 'आम्ही जातों !' पण दीडशें वर्षे या देशांत चरणारे हे गोरे ब्रिटिश भांडवलवाले म्हणताहेत का 'आम्हीही जातों' म्हणून ? एकदा आपण या घटनासमितींत शिरलों कीं, जातीय भांडणांच्या गुतळ्यामध्यें आपण कायमचेंच अडकलों म्हणून समजा ! मग आपल्याला कांहीही काम करतां यावयाचें नाहीं. देशामधली यादवी कशी वाढवावी याची सोय मात्र या शिष्टमंडळाच्या योजनेनें उत्तम तऱ्हेनें करून ठेविलेली आहे यांत शंका नाहीं !"

## आतां तुम्ही आमचें ऐका !

त्यानंतर श्रीमती अरुणा असफअली या ठरावाला विरोध करतांना म्हणाल्या कीं, वर्किंग कमिटीचे लोक तुरुंगामधून बाहेर आल्यापासून 'चले जाव' च्या गाण्याची चाल विसरून गेल्यासारखे दिसताहेत. तडजोडीनें आणि वाटाघाटीनें का ब्रिटिश सत्ता शरण येणार आहे ? तिच्याशीं युद्ध करून तिच्या छातीवर बसलें तरच ती वठणीस येईल; एऱ्हवीं नव्हे ! झगडा केल्यावांचून जनतेच्या हातीं सत्ता येणें शक्य नाहीं ! कॉंग्रेस श्रेष्ठींचें सध्याचें धोरण ब्रिटि-

शांशी सहकार्य करण्याचें आहे. लोकमताची जर या वेळीं नोंदणी केली तर निर्णय काँग्रेस श्रेष्ठींच्या विरुद्ध लागेल हें मी निश्चयानें सांगतें. काँग्रेसनें घटना समितीचा स्वीकार करणें हा ब्रिटिश मुत्सद्यांच्या युद्धोत्तर धोरणाचा विजय आहे. आतां दडपशाहीचें राजकारण या देशांत चालणार नाहीं हें ब्रिटिश कळून चुकले आहेत. म्हणून त्यांनीं आपल्या धोर–णाचा मोह बदलला आहे इतकेंच ! पण त्याचें 'काळीज' मात्र बदललें नाहीं तें आहे तसेंच आहे ! घटनासमितीचा स्वीकार करून कॉंग्रेस वर्किंग कमिटीनें स्वतःची 'मुस्लिम लीग' करून घेतली आहे, दुसरें काय ? जनतेनें ब्रिटिश सत्तेचा बालेकिल्ला अद्यापि जिंकलेला नाहीं! म्हणून त्यांनीं देऊं केलेली ही घटनासमिति जनतेला मान्य नाहीं ! आगाखान वाड्यामध्यें महात्मा गांधी उपास करून मरत असतांनाही आणि 'गांधींना सोडा, गांधींना सोडा,' असा सारें राष्ट्र आक्रोश करीत असताही ज्या ब्रिटिश सरकारनें पर्वा केली नाहीं, तें ब्रिटिश सरकार आज गांधींची स्वातंत्र्याची मागणी त्यांच्या पदरामध्यें आपण होऊन टाकत आहे या गोष्टीवर तुमचा विश्वास बसला तरी कसा ? मी गांधीजींनाच बजावतें कीं, 'बापूजी', इतक्या वर्षें आम्हीं तुमचें ऐकलं आणि तुमच्या म्हणण्याप्रमाणेंच केलें. आतां तुम्हीं आमचें म्हणणें ऐकलें पाहिजे आणि तुम्हीं आमच्या म्हणण्याप्रमाणें वागलें पाहिजे!" टाळ्यांच्या प्रचंड कडकडाटामध्यें श्रीमती अरुणा असफअली खालीं बसल्या.

## वेळींच सुचलेला शहाणपणा

**यानंतर** मूळ ठरावाला अनुकूल प्रतिकूल अशीं कांहीं भाषणें झाल्या-नंतर चर्चेचें चऱ्हाट अधिक लांबूं लागलें म्हणून, अध्यक्षांनीं चर्चा थांबविली आणि मौलाना अबुल कलम आझाद यांना उत्तर देण्यास बोलावलें. मौलाना-साहेब म्हणाले, " घटना समिति " ही ब्रिटिशांनीं आपल्याला दिलेली आहे अशी आक्षेपकांनीं आपली समजूत करून घेतली आहे हें चूक आहे. ब्रिटिश सरकारनें आपण होऊन या देशांत शिष्टमंडळ पाठविलें आणि घटना समितीचा मोफत नजराणा आपल्याला देऊं केला असें समजण्याइतका मूर्ख कोण आहे ? मेली

पन्नास वर्षें आम्ही जिवावर उदार होऊन लढलों आणि आपल्या सर्वस्वाची आहुती दिली म्हणून ही घटना समिती आपल्या हातीं आली ! बेचाळीस सालीं महात्मा गांधींनीं जो निर्वाणीचा लढा सुरू केला त्यामुळें आमच्या स्वातंत्र्याच्या चळवळीचा वेग इतका वाढला ! हिंदुस्थानच्या लोकांनीं स्वातंत्र्य मिळविण्याचा निर्धार केलेला आहे. आतां आकाश कोंसळून पडलें तरी ते आपला स्वातंत्र्याचा लढा थांबविणार नाहींत, ही गोष्ट ब्रिटिश जनता आणि जनतेचें मजूर सरकार यांना पक्की उमगून चुकलेली आहे ! आपल्या हातामधून हिंदी जनतेनें स्वातंत्र्य हिसकावून घेण्यापेक्षां तें आपण होऊनच त्यांना शहाणपणानें आणि शांततेनें दिलेलें बरें असें आता त्यांनीं ठरविलेलें आहे. घटना समितीमध्यें शिरल्यानें काँग्रेस संघटनेमध्यें दुबळेपणा उत्पन्न होईल असें कोणीसें म्हणाले ! तें कसें काय ? आपल्या अंतिम ध्येयाच्या मार्गांत जे जे अडथळे येतील ते ते आपण उचलून फेंकून देऊं. आपल्या लढ्याची मूलभूत तत्त्वें आपण केव्हांही बळी देणार नाहीं ! तशी वेळ आली तर आपण घटना समितीचाच बळी देऊन बाहेर पडूं ! विरोधकांना कसल्या तरी अज्ञात भयाचा मनोगंड झाल्यासारखा दिसतो आहे. मी म्हणतों, ज्याच्यात अडचणी नाहीत असा एक तरी प्रश्न जगांत आहे काय ? या अडचणींत आपण नुसतें भीतच बसलों तर आपला कार्यभाग कसा होणार ? घटना समितीमध्यें काँग्रेसला निःसंशय बहुमत मिळणार आहे. असें असूनही देशाचें भवितव्य आपण कसें ठरवूं कोणास ठाऊक, अशी काहींना शंका वाटत आहे, हें हास्यास्पद नव्हे काय ? मोठमोठाले त्याग करून आणि दुःखें पचवून आपण जो लढा जिंकला आणि जो जय मिळविला त्याचीं फळें असे भेदरट रडतराऊपणानें वागून गमावूं नका असें माझें तुम्हांला सांगणें आहे. ”

## घटनासमिति ‘ सांपळा ’ नव्हे !

“ **कोणताही** प्रश्न आपण व्यवहारी माणसाप्रमाणें सोडविला पाहिजे, तरच ती खरी मुत्सद्देगिरी. आपल्या ध्येयाच्या दृष्टीनें जी संधि आपल्यापुढें येईल तिचा फायदा आपण घेतलाच पाहिजे. कधीं आपल्याला लढावें लागलें

तर कधीं वाटाघाटी कराव्या लागतील ! जो दरवाजा उघडा असेल त्यांतूनच आपण आंत शिरलें पाहिजे झगड्याचें तत्त्व कॉंग्रेसनें कधी सोडलें आहे ? आपण तर स्वातंत्र्यासाठीं झगडा करण्याची शपथच घेतलेली आहे. शिष्टमंडळ येण्याच्या पूर्वींपासून आपण ब्रिटिश सरकारला बजावतों आहोंत कीं, आमचें स्वातंत्र्य आम्हांला देऊन टाका नाहीं तर झगड्याला तयार व्हा ! तर त्या वेळीं सरकारने आम्हाला असें उत्तर दिलें की, या तुमच्या निव्वळ धमक्या आहेत ! आम्ही सरकारला त्याच वेळीं समजावून सांगितले कीं, ह्या धमक्या नव्हेत ! आणि असें सांगून आम्ही दिल्लीच्या वाटाघाटी सुरू केल्या घटना-समिति हा एक 'सांपळा' आहे असें म्हणणें चूक आहे. स्वतंत्र हिंदुस्थानची घटना बनविण्यासाठीं आम्ही होऊन घटना समिति मागितली. ती शिष्टमंडळानें मान्य केली. मग ही घटनासमिति 'सांपळा' कशी बरे होते ? उलट मला ठांसून असें सांगावयाचें आहे कीं, घटनासमितीचा स्वीकार करून आम्हीं देशातील एका दीर्घकालीन वैऱ्याला मूठमाती देऊन टाकली आहे. 'हिंदुस्थान' आणि 'पाकिस्तान' असे या देशाचे दोन निरनिराळे तुकडे करा आणि दोहोंच्या घटनासमित्या नेमा, अशी मुस्लिम लीगची पुष्कळ वर्षांपासूनची मागणी होती. तथापि सोळा मेची शिष्टमंडळाची योजना मान्य करून मुस्लिम लीगनें या आपल्या दोन्ही मागण्यांवर स्पष्टपणें पाणी सोडलेलें आहे ! सोळा मेची योजना म्हणजे अखंड हिंदुस्थानची घोषणा आणि एका केंद्रीय राज्याच्या घटनासमितीचा पुकार होय ! हा आमचा अलौकिक विजय नव्हे तर काय आहे ? या घटनासमितीमध्यें तुम्ही जाऊं नये अशाच तुमच्या शत्रूंची मनामधली खरी इच्छा आहे. बोला, तुमच्या ओंजळींत येऊन पडलेला हा विजय तुम्ही फेंकून देऊन त्या पराभवाला आमंत्रण देणार कीं काय ? (प्रचंड टाळ्या) असें करू नका ! घटनासमितीचा दरवाजा उघडला आहे. आंत शिरा आणि आपल्या देशाची घटना बनविण्याचें काम पूर्ण करून टाका !"

## आमची स्वातंत्र्याची कल्पना

"**मौलाना** साहेबांच्या भाषणानंतर अध्यक्षांनीं ठराव मताला घातला. दोनशेंचार सभासदांनीं ठरावास संमति दिली आणि एकावन्न जणांनीं विरोध केला.

अर्थात्, टाळ्यांच्या प्रचंड कडकडाटामध्यें मूळ ठराव प्रचंड बहुमतानें मान्य झाला. त्यानतर दक्षिण आफ्रिकेमधील सत्याग्रहाच्या लढ्याबाबतचा ठराव मंजूर झाल्यानंतर आणि इतर ठराव या खास अधिवेशनामध्यें घेतां येत नाहींत असा अध्यक्षांनीं निर्णय दिल्यानतर त्यांचें समारोपाचें भाषण झालें. त्या भाषणांत पंडित जवाहरलाल नेहरू म्हणाले, "स्वातंत्र्याविषयीं या देशामध्ये आपण पुष्कळ वर्षांपासून बोलतों आहोंत. प्रत्येकाची स्वातंत्र्याविषयींची कल्पना निरनिराळी आहे. व्हाइसरॉय आणि मुस्लिम लीगदेखील 'हिंदुस्थानच्या स्वातंत्र्या'विषयीं बोलतातच. कॉंग्रेसची हिंदी स्वातंत्र्याविषयीं कल्पना या लोकांच्यापेक्षां निराळी आहे. आमची स्वातंत्र्याची कल्पना अशी कीं, हिंदुस्थानमध्यें परकी राज्यसत्ता अजिबात असतां कामा नये! बेहत्तर आहे ब्रिटिशांशीं आपल्याला संबंध तोडावे लागले तरी! आम्हांला हिंदुस्थानचें प्रजासत्ताक राज्य स्थापन करावयाचें आहे. आतां घटनासमितीबाबत तुम्ही माझें मत विचाराल तर मी असें स्पष्टपणें म्हणेन की, ज्या घटनासमितीची आम्ही इच्छा करीत होतों आणि जिच्यासाठीं आम्ही झगडत होतों ती कांहीं नव्हे. ह्या घटनासमितीमध्यें पुष्कळ चोरकप्पे आहेत. तथापि, असेंहि म्हणतां येईल कीं, ती कांहीं तितकीशी वाईट नाहीं! या घटना समितीमधून काय निष्पन्न होईल बरें? कदाचित् ती फार वेळ टिकणार नाहीं, बद पडेल. किंवा कदाचित् आपण टिकाव धरला तर तिच्यांतून देशाची एकादी कामचलाऊ घटना निर्माणही होऊं शकेल! दोन्हीहि तऱ्हेची शक्यता आहे एक गोष्ट मात्र मला आवडली नाहीं दहा वर्षांनतर तुम्हीं असें करा आणि तसें करा असें शिष्टमंडळानें या योजनेमध्यें आम्हाला सांगितलें आहे. आम्ही दहा वर्षांनंतर काय करूं हे आम्हांला सांगणें हा निव्वळ मूर्खपणा आहे. हिंदुस्थान स्वतंत्र झाल्यानंतर आम्ही काय वाटेल तें करू! तुम्ही आम्हांला कोण सांगणारे? - त्या वेळीं कदाचित् आम्ही आमची क्रांतिकारक घटनासमिति बोलावूं! म्हणून सध्यांच्या या घटनासमितीचा आपण फायदा कां घेऊं नये? नाहीं आपलें जमलें त्याच्याशीं तर आपण आपलें धोरण बदलूं शकतों! शिष्टमडळाच्या दीर्घकालीन किंवा तात्पुरत्या योजनेचा स्वीकार करावयाचा कां नाहीं

असा आपल्यापुढें प्रश्न नाहीं.घटनासमितीमध्यें शिरावयाचें कां नाहीं हा आपल्यापुढें प्रश्न आहे, इतकेंच. याच्यापेक्षां कांहींहि जास्त आपण करीत नाहीं की, कशाचा स्वीकारही करीत नाहीं. ”

## घाबरून जाऊं नका !

“ **घटनासमितीमध्यें** राहणें जोंपर्यंत देशाच्या हिताचें आहे असें आम्हांला वाटतें तोंपर्यंत आम्ही तेथें राहूं ! नाही तसें वाटलें, तर आम्ही त्या समितीवर लाथ मारून बाहेर येऊं आणि पुढील झगडा सुरू करू ! आम्ही कशानेंही बांधले गेलों नाहीत ! देशाचे कांहीं मूलभूत प्रश्न सोडविण्यासाठीं आपण घटना-समितीमध्यें जावयाचें ठरविलेलें आहे इतकेंच ! सुरुवातीला एकादी गोष्ट आपल्या मनाप्रमाणें आपल्याला मिळाली नाहीं म्हणून तिला भ्यायचें काय कारण आहे ? नुसते हावभाव, शब्द, घोषणा आणि वीरश्रीच्या गर्जना याना फाजील महत्त्व देण्याचें आपण आतां सोडलें पाहिजे. या गोष्टी घातुक आहेत, हें लक्षांत ठेवा ! हिंदुस्थान एक महान् राष्ट्र आहे. ब्रिटिशाच्या दरवाजाशी स्वातंत्र्याची भीक मागणारें हें कांहीं एकादें भिकारडें राष्ट्र नाहीं ! आपण स्वातंत्र्याच्या हद्दीवर आतां उभे आहोंत ! जे आपल्या आड येतील त्यांचा आपण कांटा काढूंच ! पण क्रांतिकारक व्हानयाचें म्हणजे मुत्सद्देगिरीकडे पाठ फिरवून बसावयाचें असें थोडेंच आहे ? राजकीय प्रश्नांकडे संधिसाधूच्या भावनेनें बघूं नका ! क्रांतिकारक मुत्सद्यांच्या दृष्टीनें बघा, एवढेंच माझें तुम्हांला सांगणें आहे. कॉंग्रेसकडून सारें जग महान्. निर्णयाची अपेक्षा करीत आहे अशा वेळी तोंडाचा चंबू करून दुसऱ्यावर चडफडत आणि दुसऱ्यांना शिव्यागाळी देत स्वस्थ बसूं नका ! ” पंडित नेहरू यांच्या समारोपानंतर ‘ वंदे मातरम् ’ हें राष्ट्रगीत होऊन अधिवेशन संपलें. या अधिवेशनामध्यें झालेल्या ठरावावरील निरनिराळ्या पुढाऱ्यांच्या वक्तव्यावरील आमचें सचित्र भाष्य पुढील अंकीं देण्याचें आम्ही आमच्या वाचकांना वचन देतों.



# नऊ ऑगस्टची क्रांति चिरायु होवो ! : : : १

**आज** नऊ ऑगस्ट. देशाच्या स्वातंत्र्याच्या इतिहासांतला हा एक अमर दिवस. शेंकडों स्वातंत्र्यवादी पुरुषांनीं, स्त्रियांनी आणि मुलांनीं आपल्या रक्तानें लिहून ठेवलेला हा बालदिनाचा दिवस. महात्मा गांधींनीं आठ ऑगस्ट रोजीं परकी राज्यकर्त्यांना ' चले जाव ' असे गर्जून सांगितलें. जगाच्या आणि मानव- तेच्या स्वातंत्र्यासाठीं आपण युद्ध करीत आहोंत असें ब्रिटिश म्हणाले. महात्मा गांधींनीं त्यांना विचारलें कीं, हिंदुस्थान स्वतंत्र झाल्यावांचून त्याला या जागतिक स्वातंत्र्यसंग्रामात कसा भाग घेतां येईल ? देश स्वतंत्र झाला पाहिजे आणि तो आज या क्षणीं झाला पाहिजे. आज स्वातंत्र्य मिळालें तर त्याची चव ! ती स्वातंत्र्या- ची चव उद्यां मिळणार नाहीं. चाळीस कोटी हिंदी जनता आज स्वतंत्र झाली, तरच ती जिवंत होईल आणि स्वातंत्र्यासाठीं लढेल ! गांधीजींच्या आणि कॉंग्रेसच्या या मागणीचा सरकारनें अव्हेर केला ! तेव्हां आठ ऑगस्ट रोजीं या देशांत ब्रिटिश सत्तेचा अंत होईपर्यंत आपण कांहीं तरी ' करूं वा मरूं ' असा कॉंग्रेसनें निर्धार केला. या निर्धारामधूनच ' चले जाव 'ची क्रांतिकारक घोषणा जन्माला आली.

**देशाचें** स्वातंत्र्य मिळविण्यासाठीं प्राण पणाला लावण्याचा आठ ऑगस्ट रोजीं जनतेनें निर्धार केला. त्या निर्धाराला साम्राज्यशाहीनें नऊ ऑगस्ट रोजीं उत्तर दिलें. जनतेचे पुढारी सरकारनें जबरदस्तीनें कैद करून त्यांना कारागृहांत टाकलें. देशातल्या हजारों कॉंग्रेस कार्यकर्त्यांवर दडपशाहीचा प्रचंड वरवंटा फिरवला. तथापि सरकारच्या जुलुमाचें हें भेसूर आणि भयानक स्वरूप बघून जनता घाबरून गेली नाहीं. कारण महात्मा गांधींनीं जनतेला आधींच

सांगून ठेवलें होतें कीं, आतां यापुढें जो तो आपला पुढारी. त्या संदेशाचें रहस्य जनतेनें बरोबर ओळखलें आणि सरकारी दडपशाहीला टक्कर देण्यासाठीं जनता दांत ओंठ खाऊन आपल्या पायावर उभी राहिली. जनतेवर सरकारनें अगदीं जंगली पशूप्रमाणें हिंस्र अत्याचार केले. पण ते सारे अत्याचार, जुलूम आणि छळ जनतेनें पचवून टाकले आणि आपला निर्धार जिवत ठेवला. देशाच्या स्वातंत्र्याच्या इतिहासात नऊ ऑगस्टला हें महत्त्व आहे कीं, त्या दिवशी आपल्या स्वातंत्र्यासाठीं साम्राज्यशाहीशीं लढण्याची सर्व जबाबदारी जनतेनें आपल्या शिरावर घेतली. नऊ ऑगस्ट रोजीं जनता जागृत झाली, जनता जिवत झाली. म्हणून नऊ ऑगस्ट हा जनतेच्या जयजयकाराचा दिवस आहे.

साम्राज्यशाहीशी झगडण्याचे नवीन तत्र जनतेने या दिवशी शोधून काढलें. देशावर राज्य करणारें सरकार हें बलिष्ठ होतें. त्याचें पाशवी सामर्थ्य अमर्याद होतें. तथापि, असा उन्मत्त आणि सशस्त्र सरकारला वठणीवर आणण्याचें तत्र देशामधल्या निःशस्त्र आणि दुबळ्या जनतेनें शोधून काढलें. भूमिगत होऊन सरकारी दडपशाहीचा प्रतिकार करण्याचें शास्त्र याच वेळीं जनतेला सुचलें या शास्त्रामधूनच प्रतिसरकारचा उगम झाला मिदनापूर, बालिया, बिहार आणि सातारा येथें जनतेनें ब्रिटिश सरकारला नेस्तनाबूद करून टाकलें आणि तेथें जनतेच्या सत्तेची आणि सरकारचीं निशाणें रोंवलीं. जनतेच्या प्रतिकारशक्तीचा विध्वंस करण्याची सरकारनें अगदीं पराकाष्ठा केली; पण जनता मारली गेली नाहीं—जनता मेली नाहीं. जनता अधिक जिवंत झाली. स्वातंत्र्य मिळविण्याबद्दलचा तिचा आत्मविश्वास आणि तिचें सामर्थ्य शतपटीनें अधिक वाढलें.

नऊ ऑगस्टला जनतेनें जें स्वातंत्र्ययुद्ध सुरू केलें, त्याची एक तेजस्वी आघाडी देशामध्यें भूमिगत वीरांनीं उघडली. या आघाडीचें नेतृत्व अच्युत पटवर्धन, अरुणा असफअली आणि नाना पाटील यांनीं स्वीकारलें तर या युद्धाची दुसरी तेजस्वी आघाडी देशाबाहेर नेताजी सुभाषचंद्र बोस यांनीं ‘ आझाद हिंद फौजे ’च्या साहाय्यानें उघडली. गेल्या दिडशें वर्षांच्या निःशस्त्र

गुलामगिरीमध्यें जें कोणाला करून दाखवितां आलें नाहीं तें नेताजी बोस यानी करून दाखविलें आणि साम्राज्यशाहीच्या अभेद्य लष्करी सामर्थ्याला एक प्रचंड खिंडार पाडलें. हें खिंडार साम्राज्यशाहीला पुन्हां कधींही बुजवितां येणार नाहीं एवढें तें जबरदस्त आहे. ' चले जाव 'च्या घोषणेमधून ' नऊ ऑगस्ट ' जन्माला आला. तर ' नऊ ऑगस्ट 'च्या जनता क्रांतीमधून ' जय हिंद 'ची सिंहगर्जना जन्माला आली. ' जय हिंद ' ही चाळीस कोटी स्वातंत्र्यप्रेमी जनतेची केवळ घोषणा नाहीं. तें ब्रिटिश साम्राज्यशाहीला जनतेनें दिलेलें एक आव्हान आहे !

**' नऊ ऑगस्ट '** हा बलिदानाचा दिवस आहे. हा हुतात्म्यांच्या पुण्यस्मरणाचा आणि वंदनाचा दिवस आहे. बेचाळीसच्या स्वातंत्र्ययुद्धामध्यें ज्या ज्या वीर पुरुषांनीं, वीरांगनानीं आणि चिमुकल्या वीर अभिमन्यूनी देशाच्य स्वातंत्र्यासाठीं दडपशाहीच्या होमकुंडांत आपल्या प्राणांच्या आहुत्या दिल्या त्यांना आज आपण वंदन करूं या. त्याप्रमाणें सशस्त्र क्रांतीच्या झेंड्याखालीं ज्या आझाद हिंद फौजेंतल्या शेंकडों वीरांनीं देशाच्या आझादीसाठीं लढतां लढता आपले प्राण दिले त्यांनाही आपण आज ' जय हिंद ' पूर्वक प्रणाम करूं या. जनतेच्या क्रातिकारक लढ्याचें नेतृत्व ज्या ज्या वीरांनीं पत्करलें आणि जनते-मध्यें जागृत झालेला प्रतिकाराचा अंगार ज्यांनीं ज्यांनी विझूं न देतां आजपर्यंत प्रज्वलित ठेवला त्या क्रांतिवीरांच्या चरणी आज आपण आपलें मस्तक आदरानें ठेवूं या !

**नऊ ऑगस्ट** हा दिवस कांहीं सुतकाचा नाही. जे जे वीर स्वातंत्र्यासाठीं लढतां लढतां पडले त्याच्या त्यांच्या स्मृतीला वंदन करण्याचा हा दिवस आहे. त्यांच्यासाठीं रडण्याचा नाहीं. त्यांच्यासाठीं दुःखानें छाती पिटण्याचा हा दिवस नाहीं. स्वातंत्र्यवीरांसाठीं रडायचें नसतें. कारण जो मरतो त्याच्यासाठी रडतात. जो मरत नाहीं त्याच्यासाठीं कोण रडतो ? स्वातंत्र्यवीर हे कधींही मरत नाहींत. ते मरून अमर होतात. ' जो देशासाठीं मरतो तो जगीं अजरामर होतो ! ' जे मरणाला मारतात त्यांना कोण मारणार ? बेचाळीसच्या लढ्यामध्यें कामीं

आलेलें सर्व स्वातंत्र्य सैनिक हे देशाच्या इतिहासांत अमर झालेले आहेत. म्हणून नऊ ऑगस्टचा दिवस हा सुतकाचा दिवस आहे, हा दिवस आपण गंभीर चेहरे करून आत्मपरीक्षणांत किंवा आत्मसंशोधनांत घालविला पाहिजे असें जे म्हणतात त्यांना 'नऊ ऑगस्ट' चें महत्त्व कळालें नाहीं असें म्हटलें पाहिजे. तो जनतेच्या क्रांतीच्या विजयाचा दिवस आहे. अलौकिक त्यागाचा आणि पराक्रमाचा हा दिवस आहे. दीडशें वर्षें गुलामगिरीच्या वरवंट्याखालीं चेंचलेलें आमचें भुके कंगाल आणि दुबळें राष्ट्र स्वातंत्र्य मिळविण्याच्या निर्धारानें या दिवशीं प्रथम जिवंत होऊन आपल्या पायावर उभें राहिलें. म्हणून हर्षानें जयजयकार करण्याचा हा दिवस आहे.

**नऊ ऑगस्टचें** महत्त्व आणि तेज सूर्यापेक्षांहि स्वच्छ आणि स्पष्ट आहे. हा दिवस कसा पाळावयाचा याबद्दल कोणाच्याही मनांत कसलेंही संशयाचें धुकें असण्याचें कारण नाहीं. म्हणून कांहीं थोर थोर काँग्रेस कार्यकर्त्यांच्या मनामध्यें या दिवसासंबंधानें जो मतभेद निर्माण झालेला आहे, त्याबद्दल आम्हांला वाईट वाटतें. या दिवशीं मोठमोठ्या मिरवणुका काढावयाच्या नाहींत, हरताळ पाडावयाचे नाहींत किंवा जहाल भाषणें करावयाचीं नाहींत किंवा दोन तीन काँग्रेस पुढाऱ्यांव्यतिरिक्त इतरांच्या नांवांचा जयजयकार करावयाचा नाहीं अशीं फर्मानें काँग्रेसच्या अधिकाऱ्यांनीं काढलेलीं वाचून आम्हांला खरोखरच विषाद वाटला. आज पंचवीस वर्षें जनता स्वातंत्र्याचा लढा लढते आहे. या लढ्या-मधले अनेक महत्त्वाचे दिवस कसे पाळावयाचे याचें शिक्षण आजपर्यंत जनतेला उत्तम तऱ्हेनें मिळालेलें आहे. तेव्हां कोणता दिवस जनतेनें कसा पाळावा हें जनतेला कोणाही पुढाऱ्यानें सांगण्याची वास्तविक जरूरी नाहीं. नऊ ऑगस्ट रोजीं जनता क्रांतिकारक बनली. स्वातंत्र्याच्या लढ्याचें नेतृत्व जनतेनें आपण होऊन त्या दिवशीं स्वीकारलें. त्या महान् दिवसाचा उत्सव कसा साजरा करावयाचा हें जनतेला आतां दुसऱ्यानें सांगण्याची आवश्यकता आहे काय ?

**काँग्रेसच्या** अधिकारी पुरुषांमध्यें आज ही उरफाटी क्रांति अचानक कशी झाली ! त्यांना जनतेच्या निदर्शनांचें, भाषणांचें आणि हरताळांचें भय

केव्हांपासून बरें वाटूं लागलें ? नऊ ऑगस्ट या दिवशीं मुंबई शहराच्या चौकाचौकामधून पोलिस शिपाई आणि अधिकारी सुसज्ज होऊन बसलेले आम्हीं जेव्हां पाहिले, तेव्हां प्रांतिक काँग्रेस सरकारलाही आपल्या प्रांतामधल्या जनतेचें आतां भय वाटूं लागलें आहे हें आम्हांला कळून आलें. अरेरे, 'नऊ ऑगस्ट' रोजीं जागृत झालेल्या ज्या बहखोर जनतेच्या मतावर आणि पाठिंब्यावर काँग्रेसचें सरकार या प्रांतामध्यें प्रतिष्ठित झालें त्या काँग्रेस सरकारला 'नऊ ऑगस्ट'च्या जुन्या आठवर्णानें जनता आज प्रक्षुब्ध होईल याचें भय वाटावें ना ?

**गोऱ्या** शिष्टमंडळाच्या आगमनापासून काँग्रेसच्या क्रांतिकारक नेतृत्वावर सनदशीर राजकारणाचें एक जाडजूड सांवटच पडल्यासारखें झालें आहे. देशाचें स्वातंत्र्य हें देशाच्या दरवाज्याच्या पायरीवर येऊन उभें राहिलेलें आहे याबद्दल त्यांची तर खात्री होऊन चुकलेली आहे. आतां घटनासमितीमध्यें नुसतें शिरायचें आणि स्वातंत्र्याची घटना तयार करून तें दाराबाहेर कुडकुडत उभें राहिलेलें बिचारें स्वातंत्र्य नुसतें घरांत घ्यावयाचें एवढेंच काम राहिलेलें आहे, असें त्यांना प्रामाणिकपणें वाटतें. म्हणून 'नऊ ऑगस्ट'च्या दिवशीं लोकांनीं फारच क्रांतिकारक घोषणा केल्या किंवा त्या दिवशीं जनतेनें आपल्या प्रक्षोभाचीं फारच जहाल निदर्शनें केलीं तर हें दरवाज्याच्या पायरीवर येऊन उभें राहिलेलें लाजाळू आणि भित्रें स्वातंत्र्य एकदम बुजून किंवा घाबरून भुर्कन् उडून जाईल अशी त्यांना भीति वाटते. आम्हांला काँग्रेस पुढाऱ्यांच्या या म्हाताऱ्या मनोवृत्तीचें हास्यास्पद केविलवाणें प्रदर्शन त्यांनीं याच 'नऊ ऑगस्ट'च्या क्रांतिकारक पुण्य दिवशीं करावयाला तयार व्हावें याबद्दल आम्हांला दया वाटते !

**नऊ ऑगस्ट** हा सरकारच्या अमानुष दडपशाहीचा दिवस आहे. सरकारचा हा निषेध जहाल शब्दांत करावयाचा नाहीं तर कसल्या शब्दांत करावयाचा ? इंग्रजांना या देशामधून आपण 'चले जाव' असें ज्या दिवशीं सांगावयाला सिद्ध झालों, त्या 'चले जाव' च्या घोषणेचा पुनरुच्चार आपण त्याच संतापानें, त्याच त्वेषानें आणि त्याच निश्चयानें करावयाचा नाहीं तर काय दूधभात आणि भेंड्याची भाजी खाल्यासारख्या नेभळ्या स्वरांत करावयाचा ?

नऊ ऑगस्ट हा जनतेच्या क्रांतीचा सण आहे. हा जनतेच्या जागृत शक्तीचा जयजयकार करण्याचा दिवस आहे. हा जयजयकार काय गंभीर आणि सुतकी चेहरे धारण करून करावयाचा! देशाच्या इतिहासामधला हा एक अविस्मरणीय असा दिवस आहे. याचें स्मरण जनतेमध्यें चिरंजीव रहावें अशी जर इच्छा असेल तर गगनभेदी जयघोषानींच आणि हर्षोत्कट घोषणांनींच तो दिवस साजरा करावयाला नको काय? जनतेचें मानसशास्त्र ज्याना माहित आहे त्याना हें सांगण्याची वास्तविक काय जरूरी आहे? नऊ ऑगस्ट या दिवशीं लोकांनीं कोणत्या पुढाऱ्यांच्या नावानें जयघोष करावा आणि कोणाच्या नावानें करूं नये असें कॉंग्रेसमधल्या कांहीं मंदिराधिष्ठित गुरवांनीं आणि पुजाऱ्यानीं त्यांना सांगावें म्हणजे जनतेचा धडधडीत उपमर्द करण्यासारखें आहे! नऊ ऑगस्ट-च्या क्रांतीचें खरें श्रेय कोणाला द्यावयाचें हें जनता पूर्ण ओळखून आहे. जनता 'नऊ ऑगस्ट' रोजीं त्यांच्याच नांवाचा जयजयकार करीत राहणार हें उघड आहे! 'नऊ ऑगस्टच्या' या पवित्र दिवशीं स्वातंत्र्य मिळेपर्यंत साम्राज्यशाहशीं आणि भांडवलशाहीशीं लढण्याचा जनतेचा निर्धार पुन्हां प्रज्वलित होवो! या जनतेच्या निर्धारामधूनच आपल्या देशामध्यें समतेचा आणि स्वातंत्र्याचा उदय होईल हें अगदीं निश्चित आहे.

'नऊ ऑगस्ट'



# मध्यंतर सरकारच्या सांपळ्यामध्यें

## कॉँग्रेस अडकणार काय? : : : १०

**शिष्टमंडळाच्या** घटना समितीच्या योजनेवर बहिष्कार घालण्याचा आणि पाकिस्तानच्या प्राप्तीसाठीं 'प्रत्यक्ष' लढा करण्याचा ठराव गेल्या महिन्यामध्यें मुस्लिम लीगनें मान्य केल्यापासून देशाच्या राजकारणामध्यें एक निराळेंच वातावरण निर्माण होऊं बघत आहे. या वातावरणाचें पर्यवसान कोणत्या तऱ्हेनें होणार हें या क्षणीं कांहीं सांगतां येत नाहीं! पण कॉंग्रेसचा भविष्यकाळ कांहीं आम्हांला चांगला दिसत नाहीं! कॉँग्रेसला एका महान् संकटामध्यें अडकविण्याचा ब्रिटिश सरकारचा आणि मुस्लिम लीगचा आंतून डाव शिजत असला पाहिजे अशी आतां आमची खात्री झाली आहे. कसें तें बघू!

**मुंबईमधल्या** मुस्लिम लीगच्या घटनासमितीच्या बहिष्काराला कॉंग्रेस वर्किंग कमिटीनें वर्ध्याहून आठ दिवसांपूर्वीं उत्तर दिलें. घटनासमितीमधल्या कांहीं गोष्टी आम्हांला मान्य नाहींत हें खरें; तरी देखील त्या समितीची योजना आम्हीं पूर्णपणें स्वीकारलेली आहे असें कॉँग्रेसनें लीगला सांगितलें आणि घटनासमितीच्या कामीं आपल्याशीं सहकार्य करावें अशी लीगला विनंति केली. पण कॉँग्रेसची ती विनंति जीनांनीं मान्य केली नाहीं. कॉंग्रेसनें आपली भाषा बदलली; पण भूमिका सोडली नाहीं, असा जीनांनीं खुलासा केला. पाकिस्तानसाठीं आतां

प्रत्यक्ष लढ्याचें शिंग फुकून बसलेले माथेफिरू जीना घटनासमितीच्या कार्यांत कॉंग्रेसशीं यापुढें सहकार्य करतील ही आशा करणेंच मुळीं वेडगळपणाचें होतें !

**घटनासमितीचा** आपण संपूर्णतया स्वीकार केलेला आहे आणि त्या योजनेंतील सर्व कार्यपद्धति आपणावर बंधनकारक आहेत असा कबुलीजवाब मुस्लिम लीगचें समाधान करण्याच्या मिषानें कॉंग्रेसच्या तोंडामधून मिळविल्या-नंतर बारा ऑगस्ट रोजीं व्हाइसरॉयसाहेबांनीं ' मध्यंतर सरकार ' बनविण्याची योजना सादर करण्यासाठीं पंडित जवाहरलाल नेहरू यांना पाचारण केलें. व्हाइसरॉयसाहेबांचा हा नवीन पवित्रा बघून सारें हिंदुस्थान चकित झालें. स्वाभाविकच आहे. हिंदुस्थानात कॉंग्रेसच्या मागें कोणीही नाहीं असें कांहीं वर्षांमागें म्हणणाऱ्या ब्रिटिश सरकारला आज या देशांतलें ' मध्यंतर सरकार ' बनविण्यासाठी कॉंग्रेसच्या अध्यक्षाकडे धांव घ्यावी लागते ही कांहीं सामान्य गोष्ट नाहीं. घटनासमिति मान्य करणारा एकच पक्ष किंवा बहुसंख्य हिंदी जनतेचा पाठिंबा असणारा मोठा पक्ष म्हणून व्हाइसरॉयांनीं ' मध्यतर सरकार ' बनविण्यासाठीं कॉंग्रेसला आमंत्रण दिलें हें वस्तुत: ठीकच झालें. तथापि असें करण्यांत मुस्लिम लीगची उपेक्षा करावी आणि कॉंग्रेसच्या सामर्थ्याला मान्यता द्यावी असा व्हाइसरॉयांचा हेतु आहे असें समजण्याचा मात्र मूर्खपणा कोणी करू नये !

**व्हाइसरॉयांचें** आमंत्रण राष्ट्रपति नेहरू यांनीं स्वीकारलें. तें नाकारणें कॉंग्रेसला आतां शक्यच नाहीं. त्यानंतर ' मध्यंतर सरकारा'त मुस्लिम लीगनें यावें म्हणून नेहरूंनीं जीनांना पत्र लिहून कळविलें आणि त्यांना समक्ष भेटण्या-साठीं ते स्वतः मुंबईंत आले. जीनांच्या बंगल्यावर गेले, चांगले ऐशीं मिनिटें त्यांच्याशीं बोलले. थोडासा पत्रव्यवहारही त्यांच्याशीं केला; पण यामधून कांहींही निष्पन्न झालें नाहीं. जनाब जीना व्हाइसरॉयांवर खूपच रुसलेले आहेत. ते नेहरूंना म्हणाले, " तुम्हांला ' तिकडचें ' बोलावणें आलें आहे. मला आलेलें नाहीं. तुमच्या दोघांचं आंतून काय मेतकूट चाललें आहे तें मला माहीत नाहीं. मला तुमच्यात सामील होतां येत नाहीं ! " मध्यंतर सरकारसंबंधीं आपल्याला

काांहीं एक बोलावयाचें नाहीं; वाटलें तर हिंदु-मुसलमानांच्या प्रश्नावर आपण चर्चा करूं या असें नेहरूना सांगून जीनांनीं त्यांची चांगलीच टवाळी केली ! ' मध्यंतर सरकारां 'त मुस्लिम लीग सामील होत नाहीं. ही गोष्ट आतां स्पष्ट झाली. जीनांचा नकार घेऊन नेहरूना दिल्लीला परत जावें लागलें.

या मोठ्या नाटकांत शीख मंडळींचेही एक उपनाटक चालू आहे. हल्लीं आपल्या देशात घरसोडपणा आणि चचलपणा हा राजकीय पक्षाचा एक स्वभावधर्मच होऊन बसलेला आहे. त्या नियमाला शीख तरी कसे अपवाद असणार ? त्यांनीं एका महिन्यांत चार वेळां आपली पगडी का फेटा ?— फिरविली ! घटना समितीवर कडक बहिष्कार घालावयाचें पहिल्यानें त्यांनीं ठरविलें होतें. त्यानंतर दुसऱ्या दिवशीं त्यांनीं घटनासमितीच्या निवडणुकीचे अर्जही भरून दिले. त्यानंतर चार दिवसांनी त्यांनीं ते अर्ज एकदम परत घेतले आणि पुन्हां घटनासमितीवर बहिष्कार पुकारला. आतां ' मध्यंतर सरकार ' बनविण्यासाठीं व्हाइसरॉयांनीं कॉंग्रेसला बोलाविलें आहे असें जेव्हां त्यांनीं पाहिलें तेव्हां त्यांनीं घटनासमितींत भाग घेण्याचें ठरविलें आहे. त्याचें कारण अगदीं उघडउघड आहे. तेव्हां मुस्लिम लीग आणि आंबेडकरी महार या दोन पक्षां-खेरीज मध्यंतर सरकारमध्यें भाग घेण्याच्या बाबत देशामध्यें कोणाचाही सध्या विरोध नाहीं असें मानावयास हरकत नाहीं !

' **मध्यंतर सरकार** ' बनविण्याची योजना सादर करण्यासाठीं व्हाइसरॉ-यांनीं नेहरूना सांगितलें आहे. याचा असा अर्थ नव्हे कीं, ते जी योजना सादर करतील. तिचा त्या स्वरूपांत व्हाइसरॉय स्वीकार करतील. कोणत्याही चांगुलपणाची व्हाइसरॉयांकडून अपेक्षा करण्यांत अर्थ नाहीं. ' राष्ट्रीय मुसलमानां '-च्या आग्रह कॉंग्रेसनें सोडावा म्हणून फिरून एकदां व्हाइसरॉय कोशीस करून पहातील. बहुधां त्या मुद्यावर कॉंग्रेस नमतें घेण्याचाही संभव दिसतो. तथापि, तेवढ्यानेंही जनाब जीनांचें समाधान होणें शक्य नाहीं. ' पाकिस्तान ' साठीं प्रत्यक्ष लढा करण्याचें त्यांनीं आज जें नाटक उभें केलेलें आहे त्यावर ते इतक्या सुखासुखी

धडदा टाकणें मुळींच शक्य नाहीं ! म्हणून मुस्लिम लीगला वगळूनच कॉंग्रेसला हें ' मध्यंतर सरकार ' बनवावें लागलें, ही गोष्ट उघड आहे.

ब्रिटिश सरकारच्या राज्याला विरोध करून देशामध्यें कॉंग्रेसनें स्वतः-चें सामर्थ्य जसें वाढविलें तसें कॉंग्रेसच्या राज्याला विरोध करून स्वतःचें महात्म्य वाढवावें असा जनाब जीना आणि मुस्लिम लीग यांनीं आतां बेत केलेला दिसतो आहे. आणि त्याच्या बेतांत ब्रिटिश सरकारचें त्यांना आंतून पूर्ण सहाय्य आहे, अशी आमची खात्री आहे. ' मध्यंतर सरकार ' च्या हातांत कोणतीही सार्वभौमसत्ता नसतांना आणि व्हाइसरॉयाच्या हातांतलें तें आज तरी एक खेळणें असतांना असल्या दिखाऊ सत्तेच्या पोकळ सिंहासनावर कॉंग्रेसला मारून मटकून बसवावयाचें आणि तिला पदोपदीं प्राणसंकटांत घालून तिची साऱ्या जगासमोर फटफजिती करावयाची हा ब्रिटिश सरकार आणि मुस्लिम लीग यांचा एक भयंकर डाव आहे. ' मध्यंतर सरकार' चा कॉंग्रेसनें स्वीकार करणें याचाच अर्थ जनतेच्या स्वातंत्र्याचा लढा पांगळा होणें असा आहे. सनदशीर राजकारणाच्या चरकांत कॉंग्रेसचें पाय एकदां गुंतले कीं, तिचा ' चलेजाव ' चा लढा नेस्तनाबूद झालाच म्हणून समजा, हें ब्रिटिश सरकार ओळखून आहे.

हिंदी राजकारणांत काय वाटेल तें करून जीनांचा आणि मुस्लिम लीगचा भाव वाढवावयाचा हें ब्रिटिश सरकारचें आजचें एकच राजकारण आहे. जीना आणि मुस्लिम लीग यांना आज देशामध्यें काय वाटेल तें बोलावयाला आणि वाटेल तें करावयाला ब्रिटिश सरकारनें पूर्ण मुभा देऊन ठेवलेली आहे. आम्हीं देशामध्यें चिंगीझखानापेक्षांही भयंकर कत्तल करून दाखवूं किंवा रशियाला या देशावर स्वारी करावयाला बोलवूं असें मुस्लिम लीगचे पुढारी उघड उघड बोलत असतांना ब्रिटिश सरकार काय करीत आहे ? कांहीं सुद्धां नाहीं ! ' चलेजाव ' चा नुसता ठराव कॉंग्रेसनें केला नाहीं, तोच सरकारनें देशामध्यें दडपशाहीचें केवढें राक्षसी सत्र सुरू केलें ! आणि गेल्या महिन्यांत मुस्लिम लीगनें प्रत्यक्ष लढ्याचा ठराव केला. सनदशीर ( Constitutional ) राज-

कारणाचा मार्ग आतां आम्हीं सोडला. आम्ही कायदेभग करूं. करबंदीची चळवळ हातीं घेऊं, वाटेल त्या शस्त्रांचा उपयोग करूं. कॉंग्रेसच्या बेचाळीस-च्या लढ्यापेक्षांही कांहीं तरी भयंकर करून दाखवूं. अशा लीगच्या पुढाऱ्यांनीं घोषणा केल्या, तरी सरकार अजून मख्खासारखें स्वस्थ बसलेलें आहे! सिंधचे मरहूम मुख्य प्रधान अल्लाबक्ष यांनीं 'खानबहादूर' पदवी टाकल्याबरोबर सरकारनें त्यांना स्थानभ्रष्ट करून टाकलें आणि आतां 'सर' गुलाम हुसेन हिदायतुल्ला यांनीं आपल्या 'सर' की वर लाथ मारली तरी सरकार त्यांना गचांडी मारीत नाहीं!

**बंडाच्या**, कायदेभंगाच्या आणि रक्तपाताच्या धमक्या देण्याचा लीगवाल्यांनीं तर आतां सपाटाच लावला आहे! 'लीगला चिरडून टाकाल तर मेलेल्या मुसलमानांची किंमत हिंदूंच्या रक्तानें सव्याज वसूल करण्यांत येईल!' अशी सिंधच्या एका लीग पुढाऱ्यानें परवांच घोषणा केलेली आहे. तर बंगालचे मुख्य प्रधान सुऱ्हावर्दी यानीं अशी धमकी दिलेली आहे कीं, कॉंग्रेसला राज्या-धिकार देण्याचें आणि मुस्लिम लीगला डावलण्याचें धोरण जर अंगिकारिलें तर आम्ही बगाल हा पूर्ण स्वतंत्र आहे असें जाहीर करू आणि बंगालमध्यें प्रति-सरकार स्थापन करूं! सगळ्यांत गंमत म्हणजे ज्या व्हाइसरॉयांनीं किंवा ब्रिटिश सरकारनें कॉंग्रेसला 'मध्यतर सरकार' बनविण्यासाठीं पाचारण केलें त्यांना हे लेकाचे मुस्लिम लीगवाले मुळींच शिव्या देत नाहींत! ते कॉंग्रेस आणि हिंदू यांनाच शिव्या देत सुटले आहेत! म्हणजे जुलूम आहे कीं नाहीं? ब्रिटिशांच्या पदव्या टाकण्याचेंही मुस्लिम लीगवाल्यांनीं खूपच नाटक केलें; पण एकाही 'दौलतजाद्या' नें तसें लेखी पत्र अजून सरकारला लिहिलेलें नाहीं! नुसत्या थापा आणि धमक्या यावरून ब्रिटिश सरकार आणि मुस्लिम लीग यांची दोस्ती किती अभेद्य आहे हें दिसून येतें.

**जनतेचा** स्वातंत्र्य लढा हतबल करण्यासाठीं व्हाइसरॉयांनीं हा 'मध्यं-तर सरकार' चा सांपळा कॉंग्रेसपुढें उघडून ठेवलेला आहे असें आम्हांला वाटतें. कॉंग्रेसनें या सांपळ्यांत अडकून पडूं नये अशी आमची इच्छा आहे. निदान

'मुस्लिम लीग'नें बहिष्कारलेल्या घटना समितीचें काम त्यांना वगळूनही पुढें चालविणार किंवा काय याचा स्वच्छ खुलासा ब्रिटिश सरकारकडून मिळविल्यावांचून तरी कॉंग्रेसनें या सांपळ्यांत शिरण्याची घाई करू नये ! 'मध्यंतर सरकार'च्या जोखडांत कॉंग्रेसनें आपली मान अडकवून घेतल्यानें देशांतील निर्भेळ स्वातंत्र्याच्या राजकारणाला फारच मोठा धोका पोंहोंचणार आहे, असे आम्ही दुःखानें सांगतों.



# स्वराज्याचा अरुणोदय झाला ! : : : ११

## आतां स्वातंत्र्याचा सूर्य कधीं उगवणार ?

'**मध्यंतर सरकार**' बनविण्याचें जें काम व्हाइसरॉय वेव्हेल यांनीं राष्ट्रपति जवाहरलाल नेहरू यांच्याकडे बारा ऑगस्ट रोजीं सोंपविलें होतें, तें अनेक वाटाघाटींनंतर शेवटीं एकदांचें गेल्या रविवारीं संपलें. आणि त्या दिवशीं सायंकाळीं 'मध्यंत सरकार' मधल्या कॉंग्रेसप्रणीत सभासदांचीं नांवें दिल्लीहून जाहीर करण्यांत आलीं. तदनंतर रात्रौ व्हाइसरॉयसाहेबांनीं आकाशवाणीवरून या नव्या सरकारची द्वाही पुकारली. वास्तविक हें द्वाहीचें भाषण हर्षाचें, आनंदाचें आणि अभिनंदनाचे हवें होतें, आणि खरें पाहता व्हाइसरॉयांच्या ऐवजीं तें भाषण राष्ट्रपति नेहरू यांनींच करावयाला पाहिजे होतें. कारण हें नवीन सरकार जर खरेंच 'स्वराज्याचें मंत्रिमंडळ' असेल, तर पंडित नेहरू हें त्या मंत्रिमंडळाचे अग्रणी, म्हणजे पंतप्रधान ठरतात. म्हणून स्वराज्याची द्वाही पुकारण्याचा हक्क पंतप्रधान नेहरू यांचा होता. पण व्हाइसरॉयांनीं नेहरूंच्या हक्कावर आक्रमण करून हें द्वाहीचें भाषण स्वतःच करून टाकलें. देशाच्या मध्यवर्ति राज्यकारभाराची जबाबदारी या अत्यंत बिकट काळामध्यें कॉंग्रेसनें स्वीकारण्यामध्यें जें अलौकिक धैर्य दाखविलें, त्याबद्दल व्हाइसरॉयांनीं आपल्या भाषणांत कॉंग्रेसचें जाहीर अभिनंदन करावयाला पाहिजे होतें; पण तें करण्याऐवजीं 'मध्यंतर सरकार'मध्यें मुस्लिम लीग सामील होऊं शकली नाहीं आणि 'मध्यंतर सरकार' हें संमिश्र सरकार होऊं शकलें नाहीं, याबद्दल आपलें काळीज किती तुटतें आहे आणि आंतडीं किती पिळवटत आहेत हें मात्र व्हाइसरॉयांनीं अगदीं हुंदके देत सांगितलें. स्वराज्याच्या द्वाहीचें हें भाषण हिंदुस्थानच्या विशाल जनतेसाठीं

नव्हतेंच नव्हतें! तें केवळ मुस्लिम लीग पक्षाचा रुसवा काढण्यासाठीं म्हणूनच केलेलें होतें आणि ही गोष्ट खुद्द व्हाइसरॉयांनीच भाषणाच्या सुरुवातीला कबूल केली!

हें नवीन 'मध्यतर सरकार' म्हणजे हिंदुस्थानचें राष्ट्रीय सरकार आहे, अशी कॉंग्रेसची भूमिका आहे. तथापि व्हाइसरॉयांची मात्र तशी मुळींच समजूत नाहीं. त्यांच्या मतें जुन्या कार्यकारी मंडळामध्यें आणि नवीन मध्यंतर सरकार-मध्यें कायद्याच्या दृष्टीनें मुळींच फरक नाहीं. कारण हें 'मध्यतर सरकार' बस्तीसच्या घटना कायद्यान्वयेंच अस्तित्वांत आलेलें आहे. "देशांमधील एका महान् राजकीय पक्षाचे प्रतिनिधि राज्यकारभारांत माझे सहकारी झालेले आहेत याबद्दल मला आनद वाटत आहे! माझ्या मंडळांत मी त्यांचें स्वागत करतों." या व्हाइसरॉयांच्या उद्गारांवरून नवें 'मध्यतर सरकार' म्हणजे व्हाइसरॉयांच्या मतें त्यांचें जुनें कार्यकारी मंडळच होय हं अगदीं उघड आहे. तथापि, देशाच्या दैनंदिन राज्यकारभारांत देतां येईल तितकें स्वातंत्र्य नवीन सरकारला देण्यांत येईल असा व्हासइरॉयांनीं निर्वाळा देऊन ठेवलेला आहे. त्यावरून आपला 'नकार' (veto)चा अधिकार आपण शक्य तितक्या कमी उपयोगांत आणूं असेंच आभिवचन त्यानी कॉंग्रेसला देऊन ठेवलेलें आहे असें मानावयाला हरकत नाहीं. तथापि, याबद्दल फारसा आनंद मानण्याचें कारण नाही. कारण एका हातानें गोष्ट दिसल्यासारखी दाखवायची आणि दुसऱ्या हातानें ती हळूच काढून घ्यावयाची, ही ब्रिटिश राज्यकर्त्यांची नेहमींचीच लबाडीची युक्ति असते. तिचा अवलंब याही घोषणेंत व्हाइसरॉयांनीं मोठ्या धूर्तपणानें केलेला आहे. दैनंदिन राज्यकारभारांत नवीन सरकारला शक्य तेवढें स्वातंत्र्य मिळेल असें व्हाइसरॉय एका तोंडानें म्हणतात, तर दुसऱ्या तोंडानें ते असे जाहीर करतात कीं, प्रांतिक राज्य-कारभाराच्या क्षेत्रांत हस्तक्षेप करण्याचा नवीन सरकारला मुळींच अधिकार राहणार नाहीं! हाच प्रकार त्यांनी सैन्यखात्याबद्दलही केलेला आहे. नवीन सरकारमधलें युद्धखातें म्हणे हिंदी सभासदांच्या हातीं देण्यांत येणार आहे आणि गोरे सेनापति म्हणे या हिंदी सभासदांच्या हाताखालीं काम करणार आहेत! हें ऐकून हिंदी लोक कदाचित् क्षणभर हर्षानें हुरळून जातील; म्हणूनच

कीं काय त्या हर्षावर विरजण घालण्यासाठीं व्हाइसरॉयांनीं तावडतोब असा खुलासाहि करून टाकलेला आहे कीं, हिंदी सैन्य हें आपल्या शपथेप्रमाणें केवळ बादशाहाशींच एकनिष्ठ राहील. या नवीन सरकारशीं नव्हे!

**कलकत्त्याच्या** दंग्याबाबत याच भाषणांत बोलतांना हिंदी सैन्याच्या उपयोगाबद्दल व्हॉइसरॉयांनीं जो खुलासा केलेला आहे तोहि मोठा मासलेवाईक आणि मुत्सद्देगिरीचा आहे. ते म्हणाले, " जनतेमधले दंगेधोपे मिटविणें हें कांहीं सैन्याचें काम नाही. तें प्रांतिक सरकारचें काम आहे. सगळे उपाय सपले, आणि अगदीं निरुपाय झाला म्हणजे सैन्याचा उपयोग करण्यांत येईल ! " व्हाइसरॉयांच्या या सगळ्या वक्तव्यामध्यें आणि स्पष्टीकरणामध्यें केवळ 'मुस्लिम लीग'ला खूष करणें हा एकच सूर वाहतो आहे हे न कळण्याइतकी हिंदु जनता मूर्ख आहे अशी त्यांची समजूत आहे कीं काय ? समजा, उद्यां सिंध किंवा बंगाल या प्रांतांमध्यें तेवढ्या पाकिस्तानी सरकारच्या प्रेरणेनें पुन्हां कलकत्त्याप्रमाणें हिंदु जनतेवर मुसलमान गुंड अन् मवाली अत्याचार करू लागले तर त्यांच्या संरक्षणासाठीं या 'मध्यतर सरकार'ला कांहींही करतां येणार नाहीं ही गोष्ट व्हाइसरॉयांच्या या घोषणेमध्यें मात्र उघड झालेली आहे. प्रांतिक राज्यकारभारात हात घालण्याचा 'मध्यतर सरकार'ला तर आतां अधिकारच राहिलेला नाहीं. बरें हिंदी युद्धमंत्र्याला आपल्या अखत्यारामध्यें त्या प्रांतांत सैन्यही पाठवितां येणार नाहीं कारण सैन्यावर हुकमतही बादशहाची आहे. प्रांतिक सरकारचे सगळ उपाय संपले म्हणजे मग सैन्याची त्या ठिकाणीं रवानगी करण्याचा निर्णय व्हाइसरॉय आणि सेनापति घेणार ! तोंपर्यंत दंग्यांत सांपडलेल्या हिंदु जनतेच्या घरादारांची तिकडे राखरांगोळीही होऊन जाणार ! प्रांतिक सरकार अशा दंग्याच्या वेळीं काय मासल्याची उपाययोजना करू शकते, याचें उत्कृष्ट प्रात्यक्षिक नुकतेंच सुऱ्हावर्दी सरकारनें देशाला दाखविलेलें आहे ! म्हणून नव्या 'मध्यंतर सरकार'ची दिल्लीहून व्हाईसरॉयांनीं केलेली घोषणा ही अप्रत्यक्षपणें प्रधान प्रांतामधल्या पाकिस्तानाची तर घोषणा नव्हे अशीच आम्हांला राहून राहून शंका येते !

**नवीन** 'मध्यतर सरकार'मध्यें एकंदर सभासदांची संख्या चौदा राहणार आहे. सहा कॉंग्रेसचे, पांच मुस्लिम लीगचे आणि तीन अल्पसंख्याकांचे असे मिळून हे चौदा सभासद होतात. मुस्लिम लीगनें सध्यां या सरकारवर बहिष्कार टाकला असल्यानें चौदाही सभासदांची निवड करण्याचें काम कॉंग्रेसकडेच आलेलें आहे. त्याप्रमाणें कॉंग्रेसनें आतांपर्यंत बारा सभासद निवडलेले आहेत. त्यांपैकीं सात कॉंग्रेसपक्षीय आहेत. त्यांत एक राष्ट्रीय मुसलमान आणि एक कॉंग्रेस हरिजन आहे. हरिजन हे अल्पसंख्यांक नाहींत हें कॉंग्रेसचें म्हणणें व्हाइसरॉयांना मान्य झालेलें दिसतें. उरलेल्या पांचांमध्यें दोन स्वतंत्र मुसलमान आणि तीन अल्पसंख्याकांचे प्रतिनिधी आहेत. आतां राहिलेले दोन स्वतंत्र मुसलमान सभासद निवडण्याचा विचार कॉंग्रेस सध्यां करीत आहे. तथापि, या ' मध्यंतर सरकार 'ची पुनर्घटना केव्हां होईल हें कांहीं सांगतां येत नाहीं. कारण मुस्लिम लीगसाठीं व्हाइसरॉयांनीं आपला दरवाजा एकसारखा उघडाच ठेवून दिलेला आहे. मुस्लिम लीग जर या सरकारांत सामील झाली तर महत्त्वाच्या प्रश्नावर बहुमताचें दडपण तिच्यावर चालण्यांत येणार नाहीं; असें व्हाइसरॉयांनीं स्वतःच्या आणि काँग्रेसच्या वतीनें तिला स्पष्ट आश्वासन देऊन ठेविलेलें आहे. एवढेंच नव्हे तर शिष्टमंडळाच्या सोळा मेच्या घटनासमितीच्या योजनेमध्यें कसलाही मुलभूत फरक करण्यांत येणार नाहीं, असेंही व्हाइसरॉयांनीं अगदीं जीव तोडून लीगला विनविलें आहे. ' मध्यतर सरकार 'मध्यें आणि घटनासमितींत सामील होण्याकरितां हरउपायानें मुस्लिम लीगचें मन एकसारखें वळवीत रहावयाचें हें सध्यांच्या बारा सभासदांचें प्रधान कर्तव्य होऊन बसणार आहे ! देशामधला बाकीचा राज्यकारभार एक वेळ नाहीं चालला तरी चालेल, पण मुस्लिम लीग आधीं खूष व्हावयाला पाहिजे, इकडे व्हाइसरॉयांचा ज्यास्त कटाक्ष आहे !

**' मध्यंतर सरकार '** जाहीर झाल्यापासून जीनांच्या क्रोधाचा पारा इतका उंच चढून बसला आहे कीं, सांगतां सोय नाहीं ! मुस्लिम लीग आणि देशामधील मुसलमान जनता यांजवर व्हाइसरॉयांनीं फारच जबरदस्त प्रहार

केलेला आहे, अशी जीनांनीं आरोळी ठोकली आहे. " मुस्लिम लीगची उपेक्षा करण्यांत आलेली आहे. सर्व दोषांचें खापर तिच्या डोक्यावर फोडण्यासाठीं देशांत प्रचंड खोटा प्रचार करण्यांत येत आहे. व्हाइसरॉय आणि ब्रिटिश सरकार काँग्रेसला शरण गेलेले आहेत ! आपण प्रतिपक्षाशीं चर्चा केली, वादविवाद केले. त्यांना विनंत्या केल्या, त्याना मोठमोठ्या सवलती दिल्या, पण त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं. आतां भयंकर झगडा केल्यावाचून गत्यतर नाहीं." हा जनाब जीनांनीं ' ईद ' च्या सणाच्या दिवशीं देशामधील आपल्या मुसलमान बांधवांना संदेश दिलेला आहे. मुस्लिम लीगचे कांहीं पुढारी व्हाइसरॉयांच्या आश्वासनावर विश्वास ठेवून लीगनें ' मध्यतर सरकारां ' त शिरावें अशा मताचे आहेत आणि लीगच्या पांच जागा मोकळ्या कां ठेवण्यात आल्या नाहींत म्हणून ' चगीझखान ' नून कॉंग्रेसवर अतिशय चिडून गेले आहेत ! हें जरी खरें असलें तरी ' मुस्लिम लीग ' च्या सर्व मागण्या कॉंग्रेसनें बिनतक्रार मान्य केल्यावांचून, म्हणजे काँग्रेस ही मुस्लिम लीगला सर्वस्वी शरण गेल्यावांचून जनाब जीना ' मध्यंतर सरकारा ' मध्यें किंवा घटनासमितीमध्यें जाण्यास तयार होतील असें आम्हांला वाटत नाहीं. शिष्टमंडळानें दफन केलेलें ' पाकिस्तान ' चें भूत जीनांनी पुन्हां जिवत केलेलें आहे. निर्भेळ पाकिस्तान मिळाल्यावांचून आतां आपलें समाधान होणार नाहीं, अशा किंकाळ्या मारावयाला पूर्वीप्रमाणें त्यांनीं सुरुवात केली आहे. म्हणून ' मुस्लिम लीग ' शीं कॉंग्रेसची तडजोड होणें ही एक अत्यत अशक्य गोष्ट होऊन बसलेली आहे. याचाच अर्थ असा कीं, ' मध्यंतर सरकारां ' त किंवा घटनासमितीमध्यें मुस्लिम लीग आतां सहजासहजीं येऊं शकेल असें आम्हांला वाटत नाहीं.

त्या खेरीज कलकत्त्याच्या कत्तलीपासून देशामधील हिंदु आणि मुस्लिम या दोन जमातींमध्यें भयाचें आणि संशयाचें दाट धुकें निर्माण झालेलें आहे. कोणत्या ठिकाणीं आणि कधीं हिंदु–मुसलमानांच्या दंग्याचा ज्वालामुखी एकदम स्फोट घेईल याचा आतां धरबंध राहिलेला नाहीं. प्रत्येक प्रांतामधल्या सरकारांनीं जातीय दंगेधोपे चिरडून टाकण्याचा कडेकोट बंदोबस्त करावयाचें

ठरविलेलें आहे. तशांत ‘ रमझान ’ आणि ‘ गणपति ’ हेही दोन सण नव्हते ते अगदीं समोरासमोर येऊन ठाकलेले आहेत. त्यामुळें दंग्याच्या गटारगप्पा, अफवा आणि भुमका यांना हल्लीं असा ऊत आलेला आहे कीं, विचारू नका ! जातीय यादवीचें हे भयानक वातावरण आज देशामध्यें जें निमार्ण झालेलें आहे ती सारी ब्रिटिश सरकारची कारवाई आहे हें साऱ्या देशाला कळून चुकलेलें आहे. मुस्लिम लीगवाले हे गेले पांच महिने जातीय अत्याचाराला एकसारखें उघड उघड प्रोत्साहन देत आहेत. कलकत्त्याची अमानुष कत्तल झाल्यानंतरही त्याची हिंस्र भाषा अद्यापि थांबलेली नाहीं. उलट त्यांनीं हिंदूच्या नांवानें आतां अधिकच ठणठणा करावयाला सुरूवात केलेली आहे. याबाबत व्हाइसरॉय वेव्हेल हे डोळ्यावर कांतडें ओढून खुशाल स्वस्थ बसलेले आहेत. वास्तविक बंगालचें सुऱ्हावर्दी मंत्रिमंडळ आणि गव्हर्नर बरोज यांची आतां-पर्यंत हकालपट्टी व्हावयाला पाहिजे होती. निदान कलकत्त्याच्या अत्याचारांची चौकशी करण्यासाठीं व्हाइसरॉयानीं एकादें ‘ कमिशन ’ नेमल्याचें तरी तांतडीनें जाहीर करावयाला हवें होतें, पण यापैकीं एकही गोष्ट व्हाइसरॉयांनीं केलेली नाहीं. किंवा ते करतील असा रंगही दिसत नाहीं. उलट ‘मध्यंतर सरकार ’ मध्यें समील होण्यासाठीं तुम्ही मुस्लिम लीगची आणखी मनधरणी करा, असें टुमणें त्यांनीं कॉंग्रेसच्या मागें लावलेलें आहे. म्हणजे हा सारा निव्वळ जुलूम नव्हे काय ?

काय चमत्कारिक माणसें आहेत या जगांत ? जो उठतो तो म्हणतो कीं, कॉंग्रेसनें मुस्लिम लीगशीं काय वाटेल तें करून तडजोड करावी आणि त्यांना ‘ मध्यंतर सरकार ’मध्यें ओढून आणावें. सर चिमणलाल सेटलवाड सारख्या मवाळ पक्षांतल्या बुद्रुक म्हाताऱ्यांची देखील आपली हीच टुरटुर ! मुस्लिम लीगला खूष करावयाचें म्हणजे कॉंग्रेसनें काय तिच्यापुढें आपलें डोकें फोडून घ्यावयाचें ? का स्वतःच्या काळजांत कट्यार खुपसून घेऊन तिच्या पायावर मरून पडावयाचें ! मुस्लिम लीग काय म्हणेल तें मान्य करून तिच्याशीं कॉंग्रेसनें तडजोड करावयाला हवी असें म्हणणाऱ्याच्या मुस्कटांत चांगल्या दोन झणझणीत चपराका लगवावयाला हव्यात ! नाहीं,, यापुढें मुस्लिम लीगचें

कोणतेंही म्हणणें कॉंग्रेस ऐकून घेणार नाहीं ! दिल्ली येथें परवां कॉंग्रेस वर्किंग कमिटीची जी सभा झाली, तिच्यांत मुस्लिम लीगची अधिक आराधना करावयाची नाहीं आणि त्यांच्या अत्याचाराच्या धमक्याना यापुढें धूप घालावयाचा नाहीं असेंच कॉंग्रेस नेत्यांनीं ठरविलें आहे.

'**मध्यंतर सरकार**'च्या सांपळ्यांत कॉंग्रेसला अडकवून मुस्लिम लीगच्या सहाय्यानें तिला नेस्तनाबूद करून टाकावी असा ब्रिटिशांचा डाव आहे, म्हणूनच या सांपळ्यांत कॉंग्रेसनें स्वतःला अडकवून घेऊं नये असें आम्हांला वाटत होतें. तथापि देशाच्या स्वातंत्र्यासाठीं ज्या अर्थीं कॉंग्रेसनें हा प्रचंड जबाबदारीचा आणि संकटाचा पर्वत स्वतःच्या डोक्यावर उचलावयाचें ठरविलें त्या अर्थीं आतां कॉंग्रेसला या कामीं मनापासून सहाय्य करणें हेंच सर्व स्वातंत्र्यप्रेमी जनतेचें कर्तव्य ठरतें. काय वाटेल तें झालें तरी कॉंग्रेसला अपयश येतां कामा नये. कॉंग्रेसचा पराभव झाला तर तो देशाच्या स्वातंत्र्याचा पराभव झाला असें होईल. म्हणून उद्यांपासून दिल्ली येथें स्थापन होणारें कॉंग्रेसचें 'नेहरू सरकार' जास्तींत जास्त यशस्वी कसें करून दाखवितां येईल याचाच आपण विचार केला पाहिजे. कॉंग्रेस सरकारला विरोध करण्यासाठीं मुस्लिम लीग, आंबेडकरी 'शे. का. फे.' आणि कम्युनिस्ट लालभाई हे पक्ष हातांत विस्तव घेऊन उभे राहिले आहेत. साम्राज्यशाही सरकार त्यांना आंतून सहाय्य करण्यासाठीं एका पायावर तयार आहे. तशात आंतरराष्ट्रीय परिस्थिति अधिकाधिक चिघळत चाललेली आहे. तिसरें महायुद्ध कधी सुरू होईल, याचा नेम नाहीं. दारिद्र्यानें आणि दुष्काळानें देशांतील जनता संत्रस्त होऊन गेलेली आहे. संपाची विलक्षण सांथ कामगारांमध्यें आणि मजुरांमध्यें पसरू पाहात आहे. अशा दुस्तर परिस्थितींत देशाच्या राज्यकारभाराची कांटेरी धुरा खांद्यावर वाहण्यास पंडित नेहरू तयार झाले याबद्दल त्यांना जेवढे धन्यवाद द्यावेत तेवढे थोडेच आहेत !

**व्हाइसरॉयांनीं** दैनंदिन राज्यकारभारांत नेहरूंना कितीही स्वातंत्र्य द्यावयाचें कबूल केलें तरी प्रत्यक्ष व्यवहारांत त्या देशामध्यें पदोपदीं खटके

उडतील आणि एकाही पेक्षां एक बिकट पेंचप्रसंग निर्माण होतील! इराकमध्यें व्हाइसरॉयांनीं हिंदी लष्कर जें नुकतेंच पाठविलें आहे तीच कदाचित् या नव्या स्वराज्याची पहिली कसोटी ठरण्याचा संभव आहे. असो. साठ वर्षांच्या अहर्निश झगड्यानंतर कॉंग्रेस उद्यां दिल्लीच्या सिंहासनावर आरूढ होत असलेली बघून स्वातंत्र्ययुद्धाचा एक मोठा टप्पा आपण गांठला या भावनेनें हिंदी जनतेच्या नेत्रामध्यें कृतार्थतेचे आनंदाश्रु उभे राहतील यांत संशय नाहीं. तथापि, देशाचें मध्यवर्ति राज्ययंत्र कॉंग्रेसच्या हातीं आलें याचा अर्थ देशाला स्वातंत्र्य मिळालें असा मात्र कोणीही करू नये. जनतेचें खरें स्वातंत्र्य अद्यापिही यावयाचें आहे. देशामधल्या दारिद्र्याचा आणि अन्नाचा प्रश्न मिटविण्याचें सामर्थ्य जनतेच्या अंगीं ज्या दिवशीं येईल त्या दिवशी देशाला स्वातंत्र्य मिळालें असें म्हणावयाला हरकत नाहीं. चाळीस कोटी जनतेमध्यें चैतन्य उत्पन्न करणारा तो स्वातंत्र्याचा सूर्य या स्वराज्याच्या अरुणोदयानधून लौकरच उदय पावावा हेंच आमची उत्कट इच्छा आहे. नेहरू सरकार झिंदाबाद! आझाद हिंद झिंदाबाद!



# कुलकर्णी ग्रंथागार, पुणें

## ललित साहित्य (प्रकाशित)

| | | |
|---|---|---|
| १ | **अमृतकण** : वि. वि. बोकील | ३ |
| २ | **ठिगळ** : वि. वि. बोकील | ४ |
| ३ | **चंद्रज्योति** : सौ. मालती दांडेकर | २ |
| ४ | **विझती ज्योत** : शान्ता ज. शेळके | ५ |
| ५ | **भूकंप** : गं. भा. निरंतर एम्. ए. | २॥ |
| ६ | **पहिलें चुंबन** : ग. ल. ठोकळ | ३ |
| ७ | **त्रिवेंद्रमची सफर** : सौ. कमला फडके | ३ |
| ८ | **मोपल्यांचें बंड** : स्वा. वि. दा. सावरकर | २। |
| ९ | **भेळ** : य. गो. जोशी | २ |
| १० | **मालकंस** : गोपीनाथ तळवलकर | ३॥ |
| ११ | **स्वराज्याचा अरुणोदय** : आचार्य प्र. के. अत्रे | ३ |